# A HIGHER
# MARATHI GRAMMAR.

BY

RAMCHANDRA BHIKAJI JOSHI,
TEACHER, NEW ENGLISH SCHOOL, POONA.






Poona.
*Printed at the Ambaprasad Press.*
1889.
*Price One Rupee and Four Annas.*

# प्रौढबोध मराठी व्याकरण.

ग्रंथकार

रामचंद्र भिकाजी जोशी,

पुणें न्युइंग्लिशस्कुलांतील शिक्षक.

'मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः'।

कालिदास

पुणें बुधवारपेठः

'अंबाप्रसाद' छापखान्यांत छापिलें.

सन १८८९. शके १८११.

---

किंमत सव्वा रुपया.

याच ग्रंथकारांनीं केलेलें, लहान विद्यार्थ्यांकरितां,

**बालबोध मराठी व्याकरण**

लौकरच छापून तयार होईल.

# प्रस्तावना.



कोणत्याही भाषेचें व्याकरण व भाड्यानें दिलेल्या घराची भाडेचिठ्ठी यांची व्यवस्था एकच आहे. भाडेचिठ्ठी वारंवार नवीन करून घेतली पाहिजे, नाहींतर भाडेकरी वहिवाट सांगेल! त्याचप्रमाणें दर दहा दहा वर्षांनीं तरी व्याकरणाचे कुंवलीनें भाषेची शुद्धता झाली पाहिजे; नाहींतर जुनें झालेलें व्याकरण व नवीन उपयोगांत आलेली भाषापद्धति यांत तंटे लागतील. मराठी भाषेचे मुख्य व्याकरणग्रंथ म्हटले म्हणजे पहिला व विशेष महत्वाचा रा० ब० दादोबा पांडुरंग यांचा. दादोबांनीं भाषेच्या प्रथमावस्थेंत तिला व्याकरणाची व्यवस्था लावून दिली, हे त्यांचे मराठी भाषेवर मोठेच उपकार झाले. परंतु त्यांचें व्याकरण होऊन ९२ वर्षें झालीं. इतक्या वर्षांत भाषेच्या स्थितींत विलक्षण फेरफार झाले असून त्या मानानें दादोबांनीं आपल्याव्याकरणांत बदल केला नाहीं. प्रथम ज्या व्यवस्था उत्तम वाटल्या, त्यांचा दोष पुढें अनुभवानें दिसूं लागला; परंतु त्यांनीं त्यांत सुधारणा केली नाहीं. आता तर ते विद्वान् ग्रंथकार आपल्यास अंतरलेच. त्यांचें व्याकरण एरव्हीं कितीही चांगलें असलें तरी भाषेच्या सध्याच्या सुधारत जाणाऱ्या स्थितीस तेंच वर्षोंवर्ष आपलें उपयोगीं पडेल, हें म्हणणें चुकीचें आहे. मराठी भाषेचें दुसरें व्याकरण रे० कृष्णशास्त्री गोडबोले यांचें. या व्याकरणाचा नंबर सर्वप्रकारें जरी दादोकृत व्याकरणाच्या वर न लागला, तरी ह्यांत जे शोध व भाषेसंबंधी जी अनेक प्रकारची माहिती आहे, तिच्या संबंधानें त्याचा नंबर पहिला आहे. परंतु हें व्याकरण हायस्कुलें व उच्चप्रतीच्या मराठी शाळा, यांतील प्रौढ विद्यार्थ्यांसही शिकण्यास फार कठीण आहे. मराठी भाषेचा आपल्या सुरेखपणें कधींकाळीं वर सुनेवर-

मिटार युनिव्हर्सिटीनें प्रवेश होईल, तर हें पुस्तक कालेजांतील विद्यार्थ्यांस फार उपयोगी पडेल. आज उपलब्ध असलेल्या दोन्ही मराठी व्याकरणांत दुसरा मोठा दोष असा आहे कीं, त्यांत वाक्यरचना, भाषापद्धती व भाषाविशेष यांचे संबंधाचा विचार फार कमी आहे. भाषेच्या आद्यस्थितींत रचलेल्या व्याकरणांची तशी स्थिति जरी असली, तरी आतां भाषा बहुतेक स्थिरावल्यानंतरही व्याकरणांत या गोष्टींचा विशेष विचार कां नसावा!

के० दादोबा पांडुरंग यांचें व्याकरण झाल्यानंतर के० कृष्ण-शास्त्री चिपळूणकर यांनीं विशेषतः त्यांचे व्याकरणावर, व साधारणतः मराठी भाषेच्या व्याकरणव्यवस्थेवर माजी मराठी शाळापत्रकांत निबंध लिहिले, ते सर्वप्रसिद्ध आहेत. या निबंधांत व्याकरणाच्या सर्व गोष्टींचे संबंधानें पोक्त रीतीनें विचार करून अनेक नवीन व्यवस्था सुचविल्या होत्या. परंतु आमच्या नेहमींच्या अलगर्जीपणाप्रमाणें हे निबंध सध्या माहितही नाहींत-सें झाले आहेत! या निबंधांच्या आधारानें खुद्द त्यांचे हातून किंवा दुसऱ्या कोणा विद्वानाचे हातून जर व्याकरणाची रचना झाली असती, तर केवढी बहार झाली असती! परंतु दुर्दैवेंकरून असलें फार कठीण, महत्वाचें व प्रचंड काम प्रस्तुत सारख्या ग्रंथकारावर पडलें आहे! तथापि वरील सर्वमान्य विद्वानांचें स्मरण करून, त्यांनीं रंध्र पाडून ठेवलेल्या भाषारूप रत्नांत हा ग्रंथकार यःकश्चित् सूत्रासारखा प्रवेश करीत आहे. वरील दृष्टां-तांतल्या सूत्राचें तें करणें धाष्टर्याचें आहे असें ज्या प्रमाणें कोणी म्हणणार नाहीं, त्याप्रमाणे माझेवरही कोणी धाष्टर्याचा आरोप आणणार नाहींच !

हा ग्रंथ रचितांना के० चिपळूणकर शास्त्रीबुवा यांचे निबंधां-तील सूचनांचा पूर्ण विचार केला आहे. त्यांतील कित्येक व्यवस्था त्यांच्या तशाच ठेवल्या आहेत, व कित्येक ठिकाणीं योग्य फेरफार केले आहेत. दादोबा पांडुरंग यांच्या व्याकरणांत आज जे प्रकार

लोकांस अडचणीचें वाटूं लागले आहेत, त्यांत सुधारणा केल्या आहेत. नुसत्या गद्याचा विचार न करितां गद्य व पद्य दोहींचाही त्यांत पूर्ण विचार केला आहे. वाक्यवि-चार व भाषापद्धति यांचा विचार विस्तृत रीतीनें केलेला आहे. हा परिपूर्ण झाला, असें मी मुळींच ह्मणत नाहीं. परंतु हा लोकांस आवडला व उपयोगाचा आहे असें दिसून आलें, ह्मण-जे पुढल्या आवृत्तींत ती व्यवस्था पूर्णत्वास नेण्याचा माझा विचार आहे. आजपर्यंतच्या व्याकरणाचे पद्धतींत व व्यवस्थेंत जे अनेक कठीण व घोटाळ्याचे प्रकार वाटले, ते जितके सोपे व साधे करवतील तितके करण्याचा यत्न केला आहे. प्रस्तुत ग्रंथांत ज्या नवीन गोष्टी व नवीन व्यवस्था आहेत, त्यांचे संब-धानें ग्रंथांत जेथच्या तेथें थोडक्यांत सांगितलेंच आहे. परंतु कित्येक मुख्य मुख्य गोष्टींविषयीं येथें विशेषतः सांगितलें पाहिजे. त्या गोष्टी अशा:—

(१) नामांचें सामान्यरूप करणें व त्यास विभक्ती लावून तीं चालवून दाखविणें या संबंधानें त्यांचे वर्ग बांधून नामें नियमबद्ध होतील असें करण्याचा यत्न केला आहे. नामां-च्या अन्त्यस्वरांवरून हे वर्ग बांधून त्यांचे पोटीं त्यांचे आणखी होणारे पोटभेद, अपवाद, प्रत्यवाद वगैरे सांगि-तले आहेत. हें प्रकरण लिहितांना मला रेव्ह० टामस कँडीस यांच्या इंग्रजींत लिहिलेल्या मराठी व्याकरणाचा उपयोग झाला.

(२) विभक्ती कारकांप्रमाणें वाटून दिल्या आहेत. कर्ता व कर्म त्यांची एकच विभक्ति मानण्याची सध्याची व्यवस्था आहे, ती माझे मतें चुकीची आहे. एकतर दोहींचा जो क्रियापदाशीं संबंध असतो, ज्याला कारक असें म्हणावयाचें, तो एकच प्रकारचा असतो, असें कोणीही कधीं म्हणणार नाहीं. दुसरें, आपण जर सहा सात निरनिराळ्या विभक्ती मानितों, तर कर्ता व कर्म हीं जीं सर्व कारकांत अर्थात महत्वाचीं कारकें, त्यांची अशी

व्यवस्था करून आपल्यास काय लाभ आहे? दादोबाच्या पूर्वी-च्या व्याकरणांत अशी व्यवस्था नव्हती. प्रत्ययांवरून विभक्ती मानण्याचा विचार करून त्यांनीं ही नवीन व्यवस्था काढिली, पण त्यांना आपल्या उद्देशाप्रमाणेंही व्यवस्था करितां आली नाहीं, कारण तसें करणें अशक्यच होतें. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं दादोबांची व्यवस्था अधीक पूर्ण करण्याचा यत्न केला आहे. गोडबोले यांना पुनः तो प्रकार घोटाळ्याचा वाटून त्यांनीं कर्ता असता प्रथमा व कर्म असतां द्वितीया, अशी व्यवस्था सुचविली. वरील सर्व प्रकार मनांत आणून सांप्रत सोपी असून व्यवस्थेशीर अशी विभक्तींची रचना केली आहे.

(२) दादोबा पांडुरंग यांच्या ग्रंथांत क्रियापदें चालविण्याची व्यवस्था फार कठीण व घोटाळ्याची झाली आहे. याचें कारण मराठी आख्यात प्रत्ययांचा मूळ पाया कोणचा आहे, हें पाहण्या-चा त्यांनीं यत्न केला नाहीं. मराठी कवितेंत व जुन्या मराठी भाषेंत सांपडणारे जे वर्तमानकाळाचे प्रत्यय (पहा क० २३५) हे मराठींतील सर्व आख्यातप्रत्ययांचें मूळ आहे. त्याच्या पायावर मराठींतील क्रियापदाचीं सर्व काळांचीं रूपें चालवि-ण्याची इमारत बांधिली असतां तें प्रकरण फारच सोपें व व्यवस्थे-शीर होईल. ही व्यवस्था कै० चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधांत सुचविली; तिचें अनुकरण प्रस्तुत पुस्तकांत केलें आहे. शिवाय यांत अर्थ, भेद, इत्यादि संबंधाचे कित्येक प्रकार, ज्यांचा क्रियापदांचीं रूपें करण्यामध्यें संबंध मुळींच नसून त्यापासून शिकणाराचा घोटाळा मात्र होत असे, ते काढून टाकिले आहेत. • या गो-ष्टींचा वाक्यरचनेशीं संबंध आहे. तेथेंही त्यांचा विचार करून थोडक्यांत केला आहे. यामुळें बरीच भानगड कमी होऊन शिकणारास सुलभ जाईल.

(३) मराठींत जशी प्रयोगरचना आहे, तिचा वास्तविक

उद्देश एकीकडे राहून ती केवळ नावाला राहिली आहे. आणि मग प्रथमान्त कर्ता, चतुर्थ्यन्त कर्ता, षष्ठ्यन्त कर्ता, असे अनेक प्रकार अनेकजण सुचवितात. अशा प्रकारचीं भिन्न मतें होण्याचें कारण 'कर्ता' शब्दाची व्याख्या नीट करीत नाहींत, हें होय. व्याकरणांत 'कर्ता' म्हणजे क्रियापदाचा नायक;—म्हणजे ज्याच्या धोरणानें क्रियापदाचीं लिंगादि बदलतात तो शब्द, अशी व्याख्या केली असता कर्तरि, कर्मणि व भावी ही जी प्रयोग-रचना, तिला सार्थकता येईल. कर्तरीप्रयोग म्हणजे कर्त्याच्या लिंग-वचनानुरूप क्रियापदाचा प्रयोग (स्थिति); 'कर्मणिप्रयोग' म्हणजे कर्माच्या लिंगवचनाप्रमाणें क्रियापदाचा प्रयोग (स्थिति), --अर्थात् कर्मदर्शक शब्द क्रियापदाचा कर्ता असणें; व 'भावी प्रयोग' म्हणजे क्रियापदावर 'कर्ता' व 'कर्म' यांतून कोणाचीच सत्ता नसून तें स्वतंत्र असणें. अशी व्यवस्था मानल्यावरही 'कर्ता' या पदाच्या संबंधानें पुनः घोटाळा राहील; तो दूर व्हावा म्हणून मामत 'कर्तृपद' व 'कर्ता' असे दोन पारिभाषिक शब्द काढिले आहेत. 'कर्तृपद' म्हणजे कर्तृस्थानीं असणारा किंवा क्रिया करणाराचा दर्शक शब्द; व 'कर्ता' म्हणजे व्याकरणांतला क्रियेचा नायक. असें एकवार ठरविल्यावर कित्येक ठिकाणी 'कर्तृपद' चतुर्थ्यन्तही असलें तरी चालेल. या व्यवस्थेच्या योगानें सर्व भिन्नमतें व वादस्थळें यांची एकवाक्यता होईल, असा ग्रंथकारास पूर्ण भरवसा आहे.

(५) मराठी भाषेंतला व्याकरणाचे संबंधाचा दुसरा घोटाळ्याचा प्रकार संयुक्तक्रियापदें व त्यावरून संयुक्तकाळ मानण्याची रीत, हा होय. धातुसाधितें व क्रियार्थदर्शक नामें, विशेषणें आणि अव्ययें. या सर्वांवरूनच क्रियार्थाची निष्पत्ति होणार. पण एकीकडेच 'क्रियापद' अशी संज्ञा दिली व काळ कोणता हें ठरवीत बसलें, तर मराठींत संयुक्तक्रियापदें व संयुक्तकाळ पर्यवसान होतील. या व्याकरणांत काळांचे स्वाभाविक भेद तेवढे ठेवून

वाक्यांच्या संयुक्त क्रियापदांस जरी अर्थावरून 'संयुक्त' म्हटलें आहे, तरी त्यांतून नामें, विशेषणें व अव्ययें निराळीं काढण्याची नवीन व्यवस्था केली आहे. या नव्यारीतीस नीट जुळण्यासाठीं यात्रावक्र नामें' मानण्याचा नवीन प्रकार या ग्रंथांत घालावा लागला आहे. तथापि ही तऱ्हा अगदीं नवीन नसून के० कृष्णशास्त्री चिपळूणकर व दादोबा यांची तिला संमति आहे, हें त्यांचे लेखांवरून दिसून येईल. या नवीन तऱ्हेपासूनही बराच घोटाळा कमी होईल.

याशिवाय कित्येक किरकोळ नवीन प्रकार प्रस्तुत ग्रंथांत आणिले आहेत, परंतु ग्रंथांत ठिकठिकाणीं त्यांचा उल्लेख केला आहे, तितका पुरे आहे. इंग्रजी तऱ्हेवर वाक्यमीमांसेची व्यवस्था मराठी व्याकरणांत असणें जरूर आहे. तें प्रकरण संक्षिप्त रीतीनें कारणापुरतें घातलें आहे. या विषयावर माझे विद्वान् मित्र प्रोफेसर गोपाळ गणेश आगरकर यांनीं नुकताच एक निराळा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. यामुळें या पुस्तकांत या विषयाच्या संबंधानें जास्त विस्तार केला नाहीं. मराठी भाषेचें मूळ, तिची संस्कृतापासून उत्पत्ति, तिचें स्वयंभूत्व व तिचा इतिहास, या विषयांवर एक निराळा निबंध लिहिला होता, व तो या पुस्तकास परिशिष्टरूपानें जोडण्याचा विचार होता. पण ग्रंथविस्तार फार झाला. विद्यार्थ्यांस थोड्या किंमतींत ग्रंथ देण्याचा विचार मागें पडतो कीं काय, अशी भीति वाटूं लागली. दुसरें असें कीं या विषयाचे संबंधानें सांप्रत एक मोठा महत्त्वाचा वाद सुरू आहे. त्याचा निकाल होऊन भाषाभिज्ञांत ऐकमत्य होईपर्यंत वरील प्रकरण या ग्रंथांत घालणें उचित 'दिसलें नाहीं; म्हणून तें लिहिलेलें प्रकरण सध्या ठेऊन दिलें. तरी येथें एवढें सांगून ठेवणें उचित आहे, कीं मराठी भाषा सर्व प्रकारें संस्कृतापासून झाली आहे, असें माझें मत नाहीं. तींत नामें, विशेषणें, क्रियापदें, अव्ययें वगैरे सर्व जातींचे

पुष्कळ शब्द असे आहेत, कीं त्यांचें मूळ संस्कृतांत सांपडत नाहीं; व कित्येक विशेष भाषापद्धतीचे प्रकार ही निर्विवाद स्वतःसिद्ध आहेत, असें ह्मणावें लागतें.

साधितशब्दांचा विचार, हें प्रकरण कै० गोडबोले यांनीं आपल्या पुस्तकांत इतकें पूर्णत्वास आणून सोडिलें आहे, कीं त्यांत आतां ज्यास्त कांहीं करावयाचें राहिलेंच नाहीं! प्रस्तुत पुस्तकांत हें प्रकरण घातलें आहे, तें गोडबोले यांच्या व्याकरणांतील त्या प्रकरणांना विद्यार्थ्यांस उपयोगी पडेल अशा रीतीचा संक्षेप करून घेतलें आहे. दादोबा व गोडबोले यांच्या ग्रंथाप्रमाणेंच नवलकर यांचें इंग्रजी भाषेंत लिहिलेलें मराठी व्याकरण प्रसिद्ध आहे. तें मराठी भाषा शिकणाऱ्या इंग्रज वगैरे परकी लोकांस फार उपयोगी आहे. प्रस्तुत पुस्तक लिहितांना वाक्यरचनेची व्यवस्था कशी करावी, याची पद्धत ठरविण्यास मला त्या ग्रंथाचा बराच उपयोग झाला.

याप्रमाणें हें पुस्तक जितकें उपयुक्त करवेल, तितकें करण्याचा यत्न केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे हें पाहण्याचें काम विद्वानांचें आहे. पुस्तक तयार करितांना मागील सर्व व्याकरण-ग्रंथांची मदत अर्थात् घेतली आहे. पूर्व व्याकरणकारांनीं जें करून ठेविलें आहे, तें विद्यार्थ्यांकरितां एकत्र करून त्यांत थोडेफार व्यवस्थेचे प्रकार मात्र नवीन घातले. यापेक्षां ज्यास्त कांहीं केल्याचा अभिमान मी धरीत नाहीं. सरते शेवटीं

'मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः'।

असें सांगून सर्व प्रकारें ज्यांच्या ग्रंथांचा मी उपयोग केला आहे, त्या सर्वांचे येथें आभार मानितो. विद्यार्थिमंडळीसाठीं हा प्रयत्न मीं केला आहे; त्यांना त्याचा अल्पस्वल्प उपयोग झाला असें मीं ऐकलें, ह्मणजे आपल्या श्रमाचें सार्थक झालें असें मानीन! हा ग्रंथ दुसरे आवृत्तीचे वेळीं

वढेल तितका पूर्णतेस नेण्याचा माझा विचार आहे. वाक्यरचनेच्या संबंधाचा भाग, ज्याचा विचार आजपर्यंत फार- सा झालेला नाहीं, त्याची पूर्णता करावी अशी माझी फार इच्छा आहे. यासाठीं या संबंधानें कोणीं सूचना पाठविल्यास त्यांचा मी फार आभारी होईन.

रा० भि० जो.



# अनुक्रमणिका.

## वाक्यरचना.

# मराठी व्याकरण.

## व्याख्या व विभाग.

१ मनुष्यें आपल्या मनांतील भाव एकमेकांस शब्दघटित उद्गारांचे योगानें समजावितात. या उद्गारांस **भाषा** असें म्हणतात.

२ सुशिक्षित लोक कोणचीही भाषा कोणच्या रीतीनें बोलतात किंवा लिहितात हें ज्या शास्त्रांत सांगितलें असतें, त्यास त्या भाषेचें **व्याकरण** असें ह्मणतात.

३ व्याकरणाचे मुख्य विभाग दोन आहेत;

१. शब्दविचार, २ वाक्यरचना.

## शब्दविचार.

### वर्ण.

४ भाषेचे मूळ ध्वनी आहेत; हे ध्वनी ज्या चिन्हांनीं दाखवितात, त्यांस **वर्ण** असें ह्मणतात.

५ वर्ण दोन प्रकारचे आहेत ;—१ स्वर आणि २ व्यंजनें.

ज्या वर्णांचा स्वतंत्रपणें पूर्ण उच्चार होतो, ते

७ स्वर चौदा आहेत. ते असे:—

ऱ्हस्व स्वर—अ, इ, उ, ऋ, लृ;

* दीर्घस्वर—आ, ई, ऊ, ॠ, ॡ;

संयुक्तस्वर—ए, ऐ, ओ, औ;

८ ज्या वर्णांचा उच्चार पूर्ण होण्यास स्वरांचें साह्य घ्यावें लागतें, तीं व्यंजनें.

९ व्यंजनें चौतीस आहेत :—

क्, ख्, ग्, घ्, ङ्;—(क वर्ग)
च्, छ्, ज् झ्, ञ्;—(च वर्ग)
ट्, ठ्, ड् ढ्, ण्;—(ट वर्ग)
त्, थ्, द्, ध्, न्;—(त वर्ग)
प्, फ्, ब्, भ्, म्;—(प वर्ग)
य्, र्, ल्, व्: अर्धस्वर, किंवा अंतस्थवर्ण;
श्, ष्, स्; उष्मवर्ण.
ह्, आणि ळ्.

१० वरील वर्णांपैकीं ऋ, ॠ, लृ, ॡ, हे स्वर व ङ् आणि ञ् हीं व्यंजनें शुद्ध मराठी शब्दांत येत नाहींत; व ळ् हें व्यंजन फक्त मराठींतच येतें.

११ व्यंजनास स्वतंत्र उच्चार आहेत. परंतु त्यांत स्वर मिळाल्याखेरीज त्यांचा उच्चार तोंडाबाहेर येत नाहीं; उदा॰

---

* दीर्घ स्वराचा उच्चार करण्यास ऱ्हस्व स्वराचे दुप्पट वेळ लागतो, असें मानिलें आहे. किंवा एकाच जातीचे दोन ऱ्हस्व स्वर मिळून एक दीर्घ होतो, असें समजावें.

'क्' याचा उच्चार तोंडाबाहेर पडून दुसऱ्यास ऐकूं येण्यास स्वराचें साह्य पाहिजे; जसें क्+अ=क; ग्+आ=गा; ज्+इ=जि; त्+ऋ=तृ; इ०.

१२ पुष्कळ वेळा एकापेक्षां अधिक व्यंजनें एकत्र मिळून मग त्यांत स्वर मिळतो; त्यांस **जोडाक्षरें** किंवा **संयुक्त व्यंजनें** असें म्हणतात; उदा० क्त, प्र, र्ग, क्ष, म्र, ध्म, ट्र, इ०.

१३ वर जीं व्यंजनें सांगितलीं, त्यांत **कठोर** व **मृदु** असे दोन भेद आहेत. प्रत्येक वर्गांतील पहिलीं दोन अक्षरें व ऊष्म व्यंजनें हीं **कठोर** व्यंजनें आहेत; व बाकीचीं **मृदु** होत.

१४ त्याचप्रमाणें वरील पांच वर्गांमध्यें प्रत्येकीं दुसरीं व चवथीं व्यंजनें आणि ह यांस **महाप्राण**, व बाकीच्यांस **अल्पप्राण** असें म्हणतात

१५ पांच वर्गांतील शेवटलीं व्यंजनें, ज्यांचा उच्चार नाकांतून होतो, त्यांस **अनुनासिक व्यंजनें** म्हणतात. त्यांच्या उच्चाराचा संक्षेप दाखविण्याकरितां ( ं ) या चिन्हाची योजना करितात, त्यास **अनुस्वार** म्हणतात; उदा० कां, तूं, तळें, तंटा, पंक्ति; इ०.

१६ अनुस्वाराचा उच्चार निरनिराळ्या प्रकारचा होतो. संस्कृत शब्दांत त्याचा उच्चार करण्याची रीत अशी आहे कीं अनुस्वाराचे पुढलें जें अक्षर असेल, तें कवर्गादि पहिल्या पांच वर्गांपैकीं असल्यास त्या अनुस्वाराचा उच्चार त्या पुढल्या अक्षराच्या वर्गांतील शेवटच्या अनुनासिक व्यंजनाप्रमाणें होतो; उदा० गंगा (गङ्गा), संचार (सञ्चार), मंडन (मण्डन), बंधन (बन्धन), संपत्ति (सम्पत्ति) इ०.

१७ अनुस्वाराचे पुढें जर य्, व्, ह्, श्, ष् किंवा स् हीं

अक्षरें असतील, तर त्याचा उच्चार अनुनासिक व् सारखा होतो; उदा० संरक्षण ( संव्‌रक्षण ) संहार, संसार, इ०.

१८ परंतु अनुस्वारापुढें जर य् किंवा ल् असेल, तर त्याचा उच्चार अनुक्रमें अनुनासिक य् किंवा ल् सारखा होईल; उदा० संयमन ( सँय्यमन ) संवाद ( सँव्वाद ) इ०.

१९ शुद्ध मराठी शब्दांत अनुस्वाराचा उच्चार केवळ नाकांतून होतो; जसें कां, तूं, तळें, जों, इ०.

२० परंतु कित्येक ठिकाणीं शुद्ध मराठी शब्दांतही अनुस्वाराचा उच्चार संस्कृताप्रमाणें करितात; उदा० चंग, गुंज, खुंट, बंब, इ०.

२१ शब्दोच्चार करितांना मध्यें मध्यें सकारयुक्त किंवा हकार-युक्त जो उच्चार होतो, तो **विसर्ग** होय; जसें, निःसार, धिःकार, दुःख, इ०. विसर्ग संस्कृत शब्दांत मात्र आहे; परंतु तो शुद्ध मराठी शब्दांत ही क्वचित् आढळतो; जसें, छिः थुः अंः, इ०.

२२ वर्णमालेंतील वर्णांचे उच्चार मुखाच्या निरनिराळ्या भागांत उत्पन्न होतात. त्यांवरून वर्णांचीं खालीं लिहिल्याप्रमाणें स्थानें मानिलीं आहेत :—

अ, आ, कवर्ग ह् आणि विसर्ग यांचें कंठस्थान—हे **कंठ्यवर्ण**.

इ, ई, चवर्ग आणि य्, श्, यांचें तालुस्थान—हे **तालव्यवर्ण**.*

---

* मराठी भाषेंत च छ इ०. वर्णांचा उच्चार दोन प्रकारचा होतो; एक शुद्ध संस्कृताप्रमाणें; म्हणजे, चमत्कार, छाया, जन्म, यांत होतो तसा; व दुसरा शुद्ध मराठी, म्हणजे चांदणें, जांच, खाज, झारी, चावडी इ०. शब्दांत होतो तसा. पहिला उच्चार तालव्य व दुसरा दंततालव्य होय. शुद्ध मराठी शब्दांत दोन्ही प्रकारचा उच्चार आढळतो.

ऋ, ॠ, टवर्ग आणि र्, ष्, ळ्, यांचें मूर्द्धास्थान; हे **मूर्द्धन्यवर्ण.**

ऌ, ॡ, तवर्ग आणि ल्, स् यांचें दंतस्थान; हे **दंत्यवर्ण.**

उ ऊ, पवर्ग यांचें ओष्टस्थान; हे **ओष्ठ्यवर्ण.**

ए ऐ यांचें कंठतालुस्थान; ओ औ यांचें कंठोष्टस्थान; आणि व यांचें दंतौष्ठस्थान. याशिवाय ङ्, ञ्, ण् न् म् आणि अनुस्वार ( ‑ ) यांचें नासिकास्थानही आहे.



## संधी.

२३ दोन वर्ण एका जागीं आले असतां त्या दोहोंच्या जागीं दोहोंपैकीं एक किंवा अगदीं निराळाच वर्ण येतो, त्यास **संधी** असें म्हणतात.

संधी संस्कृत शब्दांत मात्र होतात; व केव्हां केव्हां शुद्ध मराठी शब्दांतही संधी होतात.

२४ दोन स्वर एकत्र आले असतां जो संधी होतो, तो **स्वरसंधी**; व दोन व्यंजनें एकत्र येऊन जो संधी होतो, तो **व्यंजनसंधी** होय.



## स्वरसंधी.

२५ संस्कृत भाषेंत स्वरास 'अच्' अशी संज्ञा आहे, म्हणून यास अच्संधी असेंही म्हणतात. या संधींचे मुख्य नियम असे आहेत:—

(१) संयुक्तस्वर शिवाय करून कोणचेही दोन सजातीय स्वर एका पुढें एक आले असतां, ते ऱ्हस्व

असोत किंवा दीर्घ असोत, त्यांचा संधी त्यांच्याच दीर्घ स्वरांत होतो. उदाहरणें:—

| | |
|---|---|
| भाषा + अंतर = भाषांतर; | सिंह + आसन = सिंहासन; |
| क्रीडा + आरंभ = क्रीडारंभ; | विद्या + अर्थी = विद्यार्थी; |
| भानु + उदय = भानूदय; | हरि + इच्छा = हरीच्छा; |
| गुरु + उत्कंठा = गुरूत्कंठा; | घर + अनघर = घरानघर; |
| कुंभ + आर (कार) = कुंभार; | जा + आवें = जावें. |
| पितृ + ऋण = पितॄण; | राम + अर्थ = रामार्थ; |
| इ०. | इ०. |

(२) अ किंवा आ यांच्यापुढें जर इ, उ किंवा ऋ हे (ऱ्हस्व किंवा दीर्घ) स्वर आले, तर दोहोंच्या जागीं अनुक्रमें ए, ओ अथवा अर् येतात. उदाहरणें :—

| | |
|---|---|
| गज + इंद्र = गजेंद्र; | राम + ईश्वर = रामेश्वर; |
| सूर्य + उदय = सूर्योदय; | गंगा + उद्गम = गंगोद्गम; |
| देव + ऋषि = देवर्षि; | ब्रह्मा + ऋषि = ब्रह्मर्षि; |
| वसंत + ऋतु = वसंततु; | इ०. इ०. |

(३) अ किंवा आ यांच्यापुढें जर ए, ऐ किंवा ओ, औ हे स्वर आले, तर दोहोंबद्दल अनुक्रमें ऐ किंवा औ होतात. उदाहरणें :—

| | |
|---|---|
| सर्वथा + एव = सर्वथैव; | सुख + ऐश्वर्य = सुखैश्वर्य; |
| गंगा + ओघ = गंगौघ; | रक्त + ओष्ठ = रक्तौष्ठ; |
| मम + औदार्य = ममौदार्य; | इ०. इ०. |

(४) ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ यांच्या पुढें कोणताही विजातीय स्वर आला असतां त्यांच्याबद्दल अनुक्रमें य्, व् आणि र् हे वर्ण येऊन मग त्यांत पुढील स्वर मिळतो. उदाहरणें :—

प्रीति + अर्थ = प्रीत्यर्थ; गुरु + आज्ञा = गुर्वाज्ञा;
मासू + आंनीं = मास्वांनीं; नदी + आंनीं = नद्यांनीं;
भी + आवें = भ्यावें; पितृ + आज्ञा = पित्राज्ञा;
इ०. इ०.

(९) ए, ऐ, ओ किंवा औ यांच्या पुढें कोणताही स्वर आला असतां, त्यांच्या जागीं अनुक्रमें अय्, आय् अव्, किंवा आव्, होऊन मग तो स्वर त्यांत मिळतो. उदाहरणें :—

क्रे + अ = क्रय; गे + अन = गायन; गो + ईश्वर = गवीश्वर; नौ + इक = नाविक; इ०.

हे जे संधीनियम सांगितले, त्यांस अपवाद फार आहेत; परंतु मराठी शिकणारास त्यांचा तादृश उपयोग नाहीं. हे संधी संस्कृत शब्दांत होतात. तथापि मराठींत संधियुक्त संस्कृत शब्द वारंवार येतात व मराठींतही संस्कृतांचे अनुकरणानें संधी आले आहेत, म्हणून त्यांचे मुख्य नियम दिले आहेत.

२६ शुद्ध मराठी शब्दांस विभक्त्यादिकांचे प्रत्यय लागतांना कित्येक संधी होतात. (१) केव्हां केव्हां पूर्वीचा स्वर कायम राहून पुढल्याचा लोप होतो; त्यास **पूर्वरूपसंधी** असें म्हणतात; उदाहरणें:—

खिडकी + आंतून = खिडकींतून; केलें + असें = केलेंसें;
सेवे (सेवा शब्दाचें सामान्यरूप) + आंत = सेवेंत;
किती + एक = कितीक; इ०.

(२) कित्येक वेळा मागील स्वराचा लोप होऊन पुढला स्वर कायम राहतो, त्यास **पररूपसंधी** असें म्हणतात; उदाहरणें:—

कर + ऊन = करून; घर + ई = घरीं;

जन + (तृतीयेचा प्रत्यय) ऐं = जनें; पाखरूं + एं (अनेकवचनी प्रत्यय) = पांखरें.

२७ या संधीस शेषसंधी असेंही नांव देतात. जेथें पूर्वस्वर कायम राहतो, तो पूर्वशेषसंधी; व जेथें पर म्ह० पुढला स्वर कायम राहतो, तो परशेषसंधी.



## व्यंजनसंधी.

२८ संस्कृतांत व्यंजनास 'हल्' अशी संज्ञा आहे, म्हणून या संधीस हलसंधी असें म्हणतात. शुद्ध मराठी शब्दांत या संधीचें कारण पडत नाहीं; तथापि हे संधी झालेले संस्कृत शब्द मराठी भाषेंत येतात, म्हणून व्यंजनसंधीचे मुख्य नियम सांगतों:—

(१) कोणच्याही व्यंजनापुढें (अनुनासिक शिवाय) कठोर व्यंजन आलें असतां पूर्व व्यंजनाबद्दल त्याच्या वर्गांतलें पहिलें व्यंजन येतें; उदा०.

ककुभ् + प्रांत = ककुप्प्रांत; सरिद् + प्रवाह = सरित्प्रवाह; शरद् + काल = शरत्काल; इ०.

(२) च् किंवा ज् यांच्यापुढें कठोर व्यंजन आलें असतां त्यांचे बद्दल 'क्' होतो, व मृदु व्यंजन आलें असतां 'ग्' होतो; जसें.

वाच् + पति = वाक्पति; वाच् + गुरु = वाग्गुरु; इ०.

(३) अनुनासिक व्यंजनाशिवाय कोणात्याही व्यंजनापुढें मृदु व्यंजन किंवा शब्दाचे ( प्रत्ययाच्या नव्हे ) आरं-

पीचा स्वर आला असतां पहिल्या व्यंजनाबद्दल त्याचे वर्गांतलें तिसरें व्यंजन येतें; जसें,

सरित् + अंबु = सरिदंबु; सरित् + भवन = सरिद्भवन;
वाक् + वर = वाग्वर; अप् + अंग = अबंग;
तत् + आश्रम = तदाश्रम; अप् + द = अब्द;
षट् + रिपु = षड्रिपु; पन + अनि (प्रत्यय)=पनानि.
इ०. इ०.

(४) कोणत्याही व्यंजनापुढें अनुनासिक व्यंजन आलें असतां पहिल्याचे जागीं विकल्पें त्याच्या वर्गांतलें अनुनासिक व्यंजन येतें; उदा०:—

वाक्+मन = वाङ्मन किंवा वाग्मन;
षट् + मास = षण्मास किंवा षड्मास;
जगत् + नाथ = जगन्नाथ किंवा जगद्नाथ.
इ०. इ०.

(५) स् किंवा दंत्यवर्ण व श् किंवा तालुस्थानचे वर्ण हे सन्निध आले असतां स् व दंत्य वर्ण यांचे जागीं श् व तालुस्थानचे वर्ण, त् बद्दल च्, थ् बद्दल छ्, अशा अनुक्रमें येतात; उदा०.

सत् + जन = सज्जन; सद् + चरित्र = सच्चरित्र;
शरद् + झंझावात = शरज्झंझावात; इ०.

(६) स् किंवा दंत्य वर्ण आणि ष् किंवा मूर्धन्य वर्ण हे सान्निध आले असतां वरील नियमाप्रमाणेंच दंत्य वर्णांचे जागीं मूर्धन्य वर्ण येतात; उदा०.

तत् + टीका = तट्टीका; भगवत् + डमरु = भगवड्डमरु;
भूभृत् + टका = भूभृट्टका; इ०.

(७) ग, ड, द, ब, यांच्या पुढें ह् आल्यास विकल्पें-करून ह् बद्दल अनुक्रमें मागील अक्षराच्या वर्गांतील चौथीं अक्षरें (घ, ढ, ध, भ,) येतात; जसें:—

वाग् + हरि = वाग्घरि किं० वाग्हरि.
ईषद् + हीन = ईषद्धीन किं० ईषद्हीन; इ०.

(८) विसर्गामागें अ असून पुढें स्वर किं० मृदुवर्ण आला असतां विसर्गाचा ओ होतो उदा०.

मनः + राज्य = मनोराज्य; मनः + वृत्ति = मनोवृत्ति;
अधः + मुख = अधोमुख; इ०.

(९) विसर्गामागें अ किंवा आ शिवाय स्वर असून पुढें स्वर किंवा मृदुवर्ण आला असतां विसर्गाचा 'र्' होतो; उदा०.

बहिः + द्वार = बहिर्द्वार;
निः + अंतर = निरंतर; इ०.

(१०) विसर्गापुढें च्, छ्, आले तर त्याचा श् होतो; ट् ठ् असले तर ष् होतो व त् थ् आले असतां स् होतो. उदा०.

अधः + तल = अधस्तल; शनैः + चर = शनैश्चर; इ०.

(११) शब्दाचे शेवटीं स् असेल तर त्याचा विसर्ग होतो, म्हणून वरील सर्व नियम 'स्' लाही लागू आहेत. त्याचप्रमाणें र् च्या पुढें कठोर वर्ण आला असतां त्याचा विसर्ग होतो. उदा०.

प्रातर् + काल = प्रातःकाल;
पुनर् + पतन = पुनः पतन; इ०.



## व्याकरणांत येणारे कित्येक पारिभाषिक शब्द.

२९ **गुण**—इ, उ, ऋ, ऌ, (ऱ्हस्व किंवा दीर्घ) यांचे जागीं ए, ओ, अर्, अल्. हीं अक्षरें येणें.

३० **वृद्धि**—अ, इ, उ, ऋ आणि ऌ (ऱ्हस्व किंवा दीर्घ) यांचे जागीं अनुक्रमें आ, ऐ, औ, आर्, आणि आल् येणें.

३१ **संप्रसारण**—इ, उ, ऋ, आणि ऌ यांचे अंतस्थ वर्ण अनुक्रमें य्, व्, र्, ल्, हे आहेत. य् व्, र्, ल्, यांचे जागीं इ, उ, ऋ, ऌ झाले असतां त्यास **संप्रसारण** असें म्हणतात.

३२ **आगम**—प्रत्यय लावण्याचे पूर्वी मूळ शब्दांत जें एकादें अक्षर किंवा अक्षरें मिळवितात, त्यास आगम असें म्हणतात.

३३ **आदेश**—एकादें अक्षर जाऊन त्याबद्दल दुसरेंच येणें.

३४ **विकल्पेंकरून**—असें म्हटलें असतां असें समजावें कीं जी गोष्ट होते म्हणून सांगितलें असेल, ती होऊन खेरीज दुसरी अन्य नियमानें होणें असेल तीही होते.

३५ **विशेषकरून** कोणचीही गोष्ट होते असें सांगितलें असतां त्या स्थळीं दुसरा प्रकार होणार नाहीं असें समजावें.

३६ प्रत्यय लावितांना अमुक प्रत्यय लागतो असें सांगितल्यावर तो प्रत्यय जर स्वरादि (स्वर ज्याचे आरंभीं आहे असा) असेल तर विशेष प्रकार सांगितला नसल्यास ज्या शब्दास प्रत्यय लावावयाचा, त्याचा अंत्यस्वर असेल तो नाहींसा होतो; किंवा **पररूप संधी** होतो असें साधारणतः समजावें. तसा प्रकार जेथें होत नसेल, तेथें स्पष्ट उल्लेख केला आहे.

---

# शब्दविचार.

## शब्दांच्या जाती.

३७ एक किंवा अनेक वर्णांचा समुदाय, ज्यापासून कांहीं अर्थ समजतो, त्यास **शब्द** असें म्हणतात.

३८ कांहीं शब्द स्वतः सिद्ध असून चालत आलेल्या रूढीनें त्या त्या अर्थाचा बोध करितात, त्यांस **रूढ** किंवा **सिद्ध शब्द** असें म्हणतात. उदा० घोडा, बैल, झाड, इ०.

३९ कांहीं शब्द स्वतः सिद्ध नसून त्यांच्या अवयवांच्या अर्थाचे जुळणीनें त्यांचा अर्थ उत्पन्न होतो; अशा शब्दांस **यौगिक शब्द** असें म्हणतात. उदा० प्राणी, मनुज, सुहृद् सेवक, लोहार, इ०.

४० कित्ती एक यौगिक शब्द असे असतात कीं त्यांचा अवयवार्थ व्यापक असून ते नियमित व्यक्तींस मात्र लावितात; अशा शब्दांस **योगरूढ शब्द** असें म्हणतात उदा० तरंग, दंती, करिणी कुंभार, हिमालय, चक्रपाणि, इ०.

४१ यौगिक शब्द व योगरूढ शब्द यांचा एकच वर्ग करून त्यास **साधित शब्द** असें नांव दिलें असतां चालेल.

४२ हे शब्दांचे भेद त्यांच्या रचनेवरून झाले; परंतु व्याकरणांत उपयोगावरून शब्दाचे भेद तीन आहेत:—

(१) **प्रातिपदिकें** (२) **क्रियापदें** आणि (३) **अव्ययें**.

४३ ज्या शब्दांनीं संख्या, लिंग म्हणजे स्त्रीत्व किंवा पुरुषत्व यांनीं युक्त अशा वस्तूंचा बोध होतो, त्यांस **प्रातिपदिकें** असें म्हणतात; जसें, झाड, झाडें, कुळंबी, कुळंबीण, नदी, चांगला, काळा, तो, मी, तूं, ते, इ०.

४४ ज्या शब्दांवरून काळाचे संबंधानें पदार्थांच्या स्थितीचें किंवा कृतीचें ज्ञान होतें, त्यांस क्रियापदें असें म्हणतात. उदा॰ जातो, जाई, केलें, धांवेल, इ०.

४५ ज्या शब्दांस कोणच्याही प्रकारचा व्यय ह्मणजे विकार होत नाहीं, व जे वाक्यांत नेहमीं जसेचे तसेच उपयोगांत येतात, त्यांस अव्ययें असें म्हणतात;उदा०:– पुढें, जर, आंत, कड, अहाहा ! इ०.

## प्रातिपदिकें.

४६ प्रातिपदिकांच्या तीन जाती आहेतः—**नामें, विशेषणें** व **सर्वनामें**.

(१) ज्या प्रातिपदिकांवरून स्वतंत्र रीतीनें पदार्थांचा बोध होतो, व ज्यांचा अर्थ विशेष्य असतो, त्यांस **नामें** असें म्हणतात, (२) त्यांचा अर्थ गौण असून त्यांचा दुसऱ्या प्रातिपदिकांशीं संबंध असला, ह्मणजे त्यांस **विशेषणें** म्हणतात; आणि (३) ज्या प्रातिपदिकांस स्वतः-चा अर्थ नसून तीं दुसऱ्या प्रातिप्रदिकांबद्दल प्रतिनिधी-दाखल योजितात, त्यांस **सर्वनामें** असें म्हणतात.

## नामें.

४७ ज्या शब्दांपासून संख्या, लिंग ( स्त्रीपुरुषभेद ) इत्यादिकांनीं युक्त अशा पदार्थांचा बोध होतो, व ज्यांस विभक्त्यादिकार्यें होऊन क्रियापदाशीं त्यांचा संबंध असतो, त्यांस **नामें** असें ह्मणतात. जसें, पोथी, लेखणी, झाड जनावर, राग, मन, इ०.

हें जें लक्षण सांगितलें हें सर्वनामें, व विशेषणें यांवर ही

लागू पडेल. परंतु हे दोन्ही प्रकारचे शब्द स्वतंत्रपणानें उपयोगांत येत नाहींत. सर्वनामें हीं नामांचे प्रतिनिधी आहेत. विशेषणें हीं विशेष्यावर अवलंबून असतात. विशेषणाचा विशेष्याप्रमाणें उपयोग झाल्यास त्यास स्वतंत्रपणें नाम मानण्यास चिंता नाहीं.

४९ नामांचे भेद दोन आहेत–१ **सामान्यनामें**–व २ **विशेषनामें**.

५० ज्या नामांवरून जातीचा किंवा गुणाचा बोध होऊन त्या जातीच्या किंवा तद्गुणविशिष्ट पदार्थांचा बोध होतो, त्यांस **सामान्य नामें** असें ह्मणतात्; जसें, घोडा, घर, झाड, मनुष्य, गलबत, राजा, धैर्य, चाकर, शिपाई, इ.

५१ पदार्थमात्रांचीं किंवा व्यक्तिमात्रांचीं स्वतःचीं नामें, ज्यांच्यावरून जाती किंवा गुण यांचा बोध न होता केवळ त्या त्या व्यक्तीचा मात्र बोध होतो, त्यांस **विशेष नामें** असें म्हणतात; जसें, रामा, गोविंदा, कर्ण, चंद्र, कालिदास इ०.

५२ सामान्यनामें व विशेषनामें यांतला मुख्य भेद असा आहे कीं, सामान्यनामापासून जातीचा किंवा धर्माचा बोध होतो; जसें, गाय म्हणजे अमुक एक जातीचा प्राणी; एका प्राण्यास एकदां 'गाय' हें नांव दिलें कीं, त्या जातीचे व गुणांचे जेवढे प्राणी आढळतील त्यांस गायच म्हणावयाचें; तसेंच चाकर म्हटला म्हणजे सेवाधर्मानें युक्त असा मनुष्य; परंतु विशेषनाम हें ज्या व्यक्तीस ठेवावें तीचें तें स्वतःचें असतें. एका व्यक्तीस 'रामा' असें नांव दिलें कीं, मग दुसरी व्यक्ती जरी त्या व्यक्तीच्या गुणांनीं युक्त असली, तरी तिला 'रामा'च म्हटलें पाहिजे असा नियम घालितां येणार नाहीं.

**५३ सामान्यनाम व विशेषनाम** हे भेद नामाच्या अर्थावरून केले आहेत; कित्येक नामें मुळचीं सामान्यनामें असून

विशेषनामें बनतात. उदा० हिमालय; या नामाचा अर्थ कोणचाही हिमयुक्त पर्वत असा होईल; परंतु सध्या तो शब्द एका विशेष पर्वतासच लावितात; त्याचप्रमाणें, पंचवटी, पंजाब, मध्यप्रांत, स्वतंत्रसंस्थानें इ०. शब्द जाणावे,

५४ तसेंच 'तो केवळ कर्ण आहे' या वाक्यांत कर्ण हें मुळचें विशेषनाम असतां त्याचा उपयोग सामान्यनामाप्रमाणें केला आहे. कर्ण हें एका व्यक्तीचें नांव आहे, परंतु येथें कर्ण म्हणजे कर्णाच्या दातृत्वादि गुणांनीं युक्त असा कोणीही मनुष्य; त्याचप्रमाणें 'तो केवळ **जमदग्नि** आहे,' 'तूं काय एवढा **रुस्तुम** लागून गेला आहेस!' 'मोठा आला **बाजीराव!**' 'कालिदास हा आमच्या देशांतला **शेक्सपियर** होय' इ० वाक्यांत जाड टाईपांत घातलेले शब्द मूळचीं विशेषनामें असून त्यांचा उपयोग सामान्यनामांप्रमाणें केला आहे. व त्यांचा अर्थ त्या त्या व्यक्तींच्या अंगीं असणाऱ्या गुणांनीं युक्त असा मनुष्य हा होय.

५५ उपयोगावरून सामान्यनामांचे अनेक पोटभेद मानितां येतील, परंतु त्यांतले १ **गुणवाचकनामें**, २ **भाववाचकनामें**, ३ **द्रव्यवाचकनामें** व ४ **समुदायवाचकनामें** हे मुख्य आहेत.

५६ ज्या नामांवरून पदार्थांच्या गुणाचा किंवा प्रकृतीचा बोध होतो, तीं **गुणवाचक** नामें होत; उदाहरणें राग, लोभ, उजेड, काळोख, सावट, प्रकाश,इ०.

५७ पदार्थांचा भाव किंवा धर्म यांचीं दर्शक जीं नामें तीं **भाववाचकनामें**; उदा० मनुष्यपण, मित्रत्व, माधुर्य, क्रूरता, लुच्चेगिरी, इ०.

५८ भाववाचकनामें हीं विशेषणांपासून साधतात; त्यांचे प्रत्यय व हीं साधण्याची रीत यांचें विवरण साधितनामांच्या विचाराखालीं केलें आहे.

५९ ज्या नामांवरून द्रव्यांचा व वस्तूंचा बोध होतो, —अशा रीतीनें कीं तें नाम घेतलें असतां तें द्रव्य जितकें अस्तित्वांत आहे तेवढें सर्व मनांत येतें—त्यांस **द्रव्यवाचकनामें** असें म्हणतात; उदा० सोनें, लांकूड, पाणी, वाळू, इ०.

६० ज्या नामांवरून समुदायाचें ज्ञान होऊन तो समुदाय एकच व्यक्ती आहे असा बोध होतो, त्या नामांस **समुदायवाचकनामें** असें म्हणतात. उदा० वर्ग, फाज, सैन्य, मंडळी, सभा, माणूस,इ०.

६१ नामांस लिंग, विभक्ति व वचन हीं लागतात.



## लिंगें.

६२ लिंग म्हणजे पदार्थाचा पुरुषभाव किंवा स्त्रीभाव.

६३ लिंगें तीन आहेत, पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग.

६४ जें नाम किंवा प्रातिपदिक अर्थाचे ठायीं पुरुषत्वाचा बोध करितें किंवा तसा बोध करण्यास समर्थ असतें, तें नाम किंवा प्रातिपदिक पुल्लिंगी होय; जसें, रामा, देश, पलंग, खांब, वाघ, धक्का, चांगला, असा, इ०.

६५ जें नाम किंवा प्रातिपदिक अर्थाचे ठायीं स्त्रीत्वाचा बोध करितें किंवा तसा बोध करण्यास समर्थ असतें, तें नाम किंवा प्रातिपदिक स्त्रीलिंगी जाणावें; जसें, रमा, गंगा, नदी. खुर्ची, वाघीण, धक्काबुक्की, चांगली, अशी, इ०,

६६ ज्या नामांपासून किंवा प्रातिपदिकांपासून पुरुषत्वाचा किंवा स्त्रीत्वाचा बोध होत नाहीं, किंवा तो बोध करण्याची ज्यांस योग्यताही असत नाहीं त्यांस **नपुंसकलिंगी*** म्हणावें; उदा० घोडें, जनावर, टेबल, बुक, आसन, चांगलें, असें, इ०.

६७ बहुतेक भाषांचा असा नियम आहे कीं, त्यांमध्यें प्राणिवाचकनामांस मात्र लिंग असतात; अप्राणिवाचकनामांस लिंगें नाहीत, व त्यांस सरसकट नपुंसकलिंगी नामें असें म्हणतात. प्राणिवाचकनामांत पुरुषत्व व स्त्रीत्व यांवरून पुल्लिंग किंवा स्त्रीलिंग यांचा निर्णय करितात; व जेथें निर्णय करितां येत नाहीं, तेथें त्यांस नपुंसकलिंगी नामें म्हणतात. संस्कृत व मराठी या भाषांत असा

---

*कित्येक मराठी व्याकरणांत 'सामान्यलिंग' म्हणून एक चौथा लिंगाचा प्रकार मानिला आहे. ज्या नामांचें लिंग कोणचें हें निश्चित करितां येत नाहीं, ते सामान्यलिंगी नाम. परंतु मराठींत नपुंसकलिंग म्हणजे सामान्यलिंग व आहे. नामाच्या पुरुषत्वाचा किंवा स्त्रीत्वाचा जेव्हां निर्णय करितां येत नाहीं, तेव्हांच आपण त्यास नपुंसकलिंगी असें म्हणतों. नपुंसकलिंग म्हणून आणखी निराळा प्रकार नाहीं. उदाहरणार्थ, आपलेकडे कोणी आलें आहे, परंतु कोण याचा निर्णय जेव्हां होत नाहीं, तेव्हां 'कोण तें?' असा नपुंसकलिंगाचा उपयोग करूनच आपण नेहमीं प्रश्न करितों. सामान्यलिंग म्हणून चौथा प्रकार भाषेंत नाहीं, याचें मुख्य प्रमाण हें आहे कीं ज्या क्रियापदांस लिंगें लागतात, त्यांचे निरनिराळ्या लिंगांचे फक्त तीनच प्रकारचे, म्हणजे पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी प्रत्यय आहेत. यावरून चवथें लिंग भाषेंत नाहीं, हें उघड आहे. लिंगाचा निर्णय खुद्द नामावरून न झाल्यास क्रियापदाचे रूपावरून किंवा विशेषण, सर्वनाम वगैरे जवळच्या शब्दांवरून करावा. त्यांवरून ही जेथें निर्णय करितां येणार नाहीं, तेथें व्याकरण चालवितांना त्या नामाचें लिंग सांगूं नये.

कांहीं नियम बांधितां येत नाहीं. प्राणीवाचकनामांत लिंगनिर्णय पुरुषत्व किंवा स्त्रीत्व यांवरून करून जेथें तसा निर्णय करितां येत नाहीं, तेथें त्या नामांस नपुंसकलिंगी समजतात. परंतु अप्राणिवाचकनामांस पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, व नपुंसकलिंगी समजण्याविषयीं कांहीं नियम नसून तत्संबंधानें भाषेंत जशी पूर्वापार चाल चालत असेल त्याप्रमाणें निर्णय करावा लागतो. मराठीभाषा ज्यांची स्वतःची आहे, त्यांस तसा निर्णय करणें सोपें आहे. आम्हा मराठी बोलणारांस संशय उत्पन्न झाल्यास, 'तो' हें सर्वनाम ज्या नामामागें लावितां येतें तीं पुल्लिंगी नामें, जेथें 'ती' लावितां येते, तीं स्त्रीलिंगी व जेथें 'तें' लागतें तीं नपुंसकलिंगी असें साधारणतः म्हणतां येईल. परंतु परकीयांस तो, ती, किंवा तें कोठें लावावें हें व मुळीं समजणार नाहीं. कित्येक प्राणीवाचकनामांसंबंधानें ही असाच घोटाळा पडेल. उदाहरणार्थ, पक्षी, मुंगी, साळुंकी, माशी, पाल, सरडा, घूस, पाकोळी इत्यादि शब्दांचीं लिंगें पुंस्त्व किंवा स्त्रीत्व यांवरून न मानितां केवळ लोकव्यवहारावरून मानिलीं आहेत. कित्येक शब्द तर असे आहेत कीं त्यांचीं निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळी लिंगें मानतात. जसें तपकिर, तमाखु, मध, इ०. तेव्हां लिंगनिर्णय करण्याकरितां कोणचाही नियम बांधितां येणार नाहीं. लिंगें हीं लोकव्यवहार, कोश किंवा भाषाभिज्ञ विद्वान् यांपासूनच समजून घेतलीं पाहिजेत.

६८ मराठी भाषेंत जे शब्द संस्कृत भाषेंतून आले आहेत त्यांचीं लिंगें बहुधा संस्कृतांतीलच कायम असतात; संस्कृत भाषेंत अकारांत शब्द सर्व पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी असतात. आकारांत, (दीर्घ) ईकारांत किंवा (दीर्घ) ऊकारांत शब्द बहुधा स्त्रीलिंगी असतात. बाकीच्या शब्दांच्या लिंगांच्या संबंधानें कोशावरून माहिती करून घेतली पाहिजे.

६९ मराठींत हिंदुस्थानी, फारशी व आरबी भाषेंतून किंवा इंग्रेजी वगैरे दुसऱ्या भाषांतून जे शब्द आले आहेत, त्यांचीं त्या त्या भाषेंतली लिंगें असतात; अथवा त्या अर्थाचा दुसरा शब्द

जर मराठी भाषेंत असेल, तर त्याचें लिंग त्या शब्दास लावितात. तसेंच या शब्दांस लिंग लाविणें तें क्वचित् त्याच्या अंत्यस्वरावरून त्या अंताच्या इतर मराठी शब्दांप्रमाणें ही लावितात, परंतु या संबंधानें कांहीं नियम बांधतां येत नाहीं.

७० शुद्ध मराठी शब्दांचीं लिंगें ओळखण्यासाठीं खालील नियम बांधितां येतील. परंतु हे नियम पूर्णपणें व्यापक आहेत असें समजूं नये.

(१) मराठी, आणि बहुतेक हिंदुस्थानी आकारान्तनामें, व संस्कृत नामांपासून मराठींत आकारांत करून घेतलेलीं नामें हीं बहुधा पुल्लिंगी असतात; जसें सोटा, बडगा, लोटा, बटाटा चंद्रमा, कर्ता, भर्ता, दुर्वासा, पिता, आत्मा, पेशा, बाजा, कारखाना, रोजनामा, इ०.

(२) ईकारान्त कर्तृदर्शकनामें पुल्लिंगी असतात; जसें, बिगारी, वाटाडी, कामकरी, भाडेकरी, इ०. परंतु ईकारान्त वस्तुवाचक नामें स्त्रीलिंगी असतात; जसें, पेटी, गाडी, पाटी, वाटी, गोणी, इ०. या नियमास अपवादक असे पाणीं, लोणीं, चित्रवणीं, इ० कित्येक शब्द आहेत. परंतु त्यांच्या अंत्यस्वरावर अनुस्वार द्यावा असें विद्वानांचें मत आहे. या शिवाय बाकीचे सर्व ईकारान्त शब्द स्त्रीलिंगी आहेत.

(३) एकारान्त आणि ऐकारान्त नामें स्त्रीलिंगी असतात; उदा० आते, सवे, विल्हे, सै, तिवै, कटै, इ०.

(४) ओकारान्त मराठी शब्दांत बायको, बायो, बयो, इ० कित्येक स्त्रीलिंगी शब्दांशिवाय बाकी सर्व पुल्लिंगी जाणावे; जसें, लाहो, टाहो, डोहो, मोहो, इ०.

(५) भाववाचक नामांमध्यें जीं नामें पण, त्व किंवा य प्रत्यय लागून होतात तीं नपुंसकलिंगी असतात; जसें, मनुष्यपण, क्रौर्य, धीरत्व, इ०. परंतु जीं पणा प्रत्यय लागून होतात तीं पुल्लिंगी असतात; जसें,—मनुष्यपणा इ०. परंतु जीं ई, की, ता, गिरी, हे प्रत्यय लागून होतात तीं स्त्रीलिंगी असतात. उदा० लुच्चाई, पाटिलकी, गुरुता, लुच्चेगिरी, इ०.

(६) शब्दाची अथवा शब्दावयवाची द्विरुक्ती होऊन जे अनुकरणवाचक शब्द सिद्ध होतात ते स्त्रीलिंगी असतात; यानां पुष्कळदां 'ई' प्रत्यय लागतो; जसें, मारामार, मारामारी, पळापळ, पळापळी, तोडातोडी, इ०. परंतु त्या अनुकरणाचा अतिशयपणा दाखविणारे शब्द जे आड, आट, किंवा आण प्रत्यय लागून होतात, ते पुल्लिंगी असतात; उदा० सुळसुळाट, दणाण, कडाड इ०.

(७) व्यापारद्योतक नान्त किंवा णान्त नामें नपुंसकलिंगी असतात; जसें, दळण, कांडण, पोषण, कंदन, भूषण, रंजन, भंजन, इ०.

(८) व्यापारार्थक ण्यन्त नामें व णूक प्रत्ययान्त नामें स्त्रीलिंगी असतात; जसें. भाजणी, कापणी, करणी, लावणी, ओढणी, चालणूक, वागणूक, अडणूक, नांदणूक, इ०.

(९) व्याप्तिदर्शक आकारान्त धातुसाधित नामें पुल्लिंगी असतात; जसें, ठेवा, साठा, भरडा, वेंचा, रांधा, हिसका, आंसडा, इ०.

(१०) मूल्यदर्शक 'णावळ' प्रत्ययान्त नामें स्त्रीलिंगी असतात; जसें दळणावळ, भुणावळ, इ

(११) सुवर्णादि धातूंची नामें नपुंसकलिंगी आहेत; उदा० सोनें, रुपें, तांबें, पितळ, जस्त, इ०.

टीप—पितळ हा शब्द स्त्रीलिंगी सुद्धां आहे.

(१२) ज्यांच्या अंतीं अनुनासिक वर्ण आहे, अशीं सर्व मराठी नामें नपुंसकलिंगी असतात. यांत गहूं हा शब्द अपवादक आहे. वस्तुतः सर्व नपुंसकलिंगी नामांचे अत्याक्षरावर नेहमीं अनुस्वार द्यावा. ( नामाच्या अन्त्याक्षराविषयीं विचार, हें प्रकरण पहा.)

७१ मराठींत कित्येक शब्द प्राणिवाचक नामें असून ही त्यांचीं लिंगें विपरीत असतात : उदा० कुटुंब, कलत्र, इ० शब्द स्त्रीवाचक असून नपुंसकलिंगी आहेत ; दार हा शब्द संस्कृताप्रमाणें पुल्लिंगी मानितात ; केव्हां केव्हां त्याचा उपयोग नपुंसकलिंगी आढळतो. त्याचें स्त्रीलिंगी रूप दारा असें आहे. उदा०

"आमंत्रुनि सत्यैनें सर्व श्रीकृष्ण**दार** (पु.) जेवविलें।"

"छळिलें दशाननें परि झालें **प्रभुदार** (नपुं.) काय कातर तें।"

मोरोपंत.

७२ त्याचप्रमाणें 'काबिला' हा शब्द स्त्रीवाचक असून पुल्लिंगी आहे. लांडोर, बटकूर इ० शब्द स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगीही मानितात ; रांडरूं हा शब्द नपुंसकलिंगी आहे.

७३ वस्तु, शपथ, स्वप्न, हे शब्द संस्कृताप्रमाणें पहिला नपुंसकलिंगीं व दुसरे दोन पुल्लिंगी असून पहिले दोन स्त्रीलिंगी व शेवटचा नपुंसकलिंगीही मानितात. व मित्र हा शब्द पुल्लिंगी मानून खेरीज संस्कृताप्रमाणें नपुंसकलिंगी मानितात. मूल , पोर, इ० शब्द तिन्हीं लिंगी आहेत.

७४ तपकीर, मांजर, स्त्रीलिंगीं किंवा नपुंसकलिंगी; वाग, जागा, तमाखू, गुडाखू, मध, इ० पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी; मुंगूस, डुकर इ० पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी आहेत.

मांस अपवादही पुष्कळ आहेत. परंतु ते येथें सांगण्याची जरूर नाहीं. संस्कृताच्या नियमानें स्त्रीलिंग करण्याचा किंवा तसे स्त्रीलिंगी शब्दांचा मराठींत उपयोग करण्याचा प्रसंग वारंवार येतो, म्हणून हे साधारण नियम सांगितले आहेत.

७९ शुद्ध मराठी शब्दांचे स्त्रीलिंगी प्रत्यय 'ई' आणि 'ईण' हे आहेत; व नपुंसकलिंगी प्रत्यय 'एँ' हा आहे. हे प्रत्यय लावण्याचे संबंधानें कांहीं नियम बांधितां येत नाहींत. परंतु साधारणतः खालचे नियम बांधिले तरी चालेल.

८० प्राणिवाचक नामें व मनुष्यांतील प्रतिष्ठासूचक नामें यांचें स्त्रीलिंग ई लागून होतें उदाहरणें:—

| पु. | स्त्री. | नपुं. |
| --- | --- | --- |
| मुलगा | मुलगी | मुलगें. |
| कुत्रा | कुत्री | कुत्रें. |
| घोडा | घोडी | घोडें. |
| कोल्हा | कोल्ही | कोल्हें. |
| पोरगा | पोरगी | पोरगें. |

काका काकी. आजा आजी. मामा मामी.

| | | | |
| --- | --- | --- | --- |
| हरण | हरिणी, हरणी. | उंदीर | उंदरी. |
| बेडूक | बेडकी. | गोचीड | गोचडी. |

८१ मनुष्यांतील जातिवाचक नामें, धंद्यावरून वगैरे पडलेलीं नामें व आडनांवें यांचें स्त्रीलिंग 'ईण' लागून होतें. जसें,

| | | | |
| --- | --- | --- | --- |
| अतीत | अतितीण. | अहीर | अहिरीण, अहीरीण. |
| वकील | वकिलीण. | माहुत | माहूतीण. |
| मास्तर | मास्तरीण. | शाहीर | शाहरीण, शायरीण. |
| फकीर | फकिरीण. | गवळी | गवळीण (उपयोगांतलें गवळण) |

| | | | |
|---|---|---|---|
| पंतोजी | पंतोजीण. | गाडगीळ | गाडगिळीण. |
| सुनार | सुनारीण. | जोशी | जोशीण. |
| रजपूत | रजपुतीण. | देशपांड्या | देशपांडीण. |
| भट | भटीण. | शेटया | शेटीण. |
| | इ०. | | इ०. |

८२ कित्येक नामांचीं पुल्लिंगें व स्त्रीलिंगें निराळीं व ठरलेलीं आहेत, तीं अशीं :—

पुरुष.—स्त्री, बायको.

| | |
|---|---|
| नवरा—बायको. | खोंड—कालवड. |
| दीर—जाऊ. | बैल—गाय. |
| भाऊ— { बहीण. भावजय (भावाची बायको.) | एडका—मेंढी. बोकड—शेळी, शेरडी. |
| बाप—आई. | काळवीट—हरिणी. |
| वडील—मातोश्री. | बोका—भाटी, मांजरी. |
| पिता—माता. | वाघ्या—मुरळी. |
| साहेब—मडम, साहेबा. | उंट—सांड. |
| मोर—लांडोर. | रेडा—म्हैस. |
| पाडा—पाडी, पारडी. | सासरा—सासू. |
| नर—मादी. | राजा—राणी. |
| इ०. | इ०. |

८३ प्राणिवाचक नामांचें नपुंसकलिंग केलें असतां सामान्यतः सर्व जातीचा समुच्चयेंकरून बोध होतो. घोडें, माणूस, कुत्रें, इ० म्हटलें म्हणजे त्या त्या प्राण्याची सर्व जात घ्यावयाची.



## विभक्तिविचार.

८४ प्रातिपदिकांचा क्रियापदाशीं जो संबंध असतो,

त्यास **कारक** असें म्हणतात; आणि तो संबंध दाखविण्यासाठीं नामाचें जें रूप करितात, त्यास **विभक्ति** असें म्हणतात.

८५ हा विभक्तिसंबंध नेहमींच क्रियापदाशीं असतो असें नाहीं; केव्हां तो इतर नामांशीं किंवा दुसऱ्या शब्दांशींही असतो उ० 'तो मनानें मोकळा आहे' 'तो उंचीनें ठेंगणा आहे' 'तो घरांत तेवढा जमदग्नि, बाहेर अगदीं गाय' इ०.

८६ ह्या विभक्ति सहा आहेत :—प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, आणि सप्तमी.

८७ संबोधन ही एक सातवी विभक्ति मानण्यास चिंता नाहीं, परंतु या विभक्तीचा संबंध क्रियापदाशीं नसतो.

८८ हल्लीं मराठींत षष्ठी विभक्ति मानितात. परंतु तद्घटित शब्द केवळ विशेषणें असल्यामुळें तशा शब्दांचा विचार पुढें योग्यस्थळीं केला आहे. त्यांस विभक्ति मानणें प्रशस्त दिसत नाहीं.

८९ मराठींत सर्व विभक्तिरूपें नामांस प्रत्यय लागून सिद्ध करितात. हे प्रत्यय लावण्याचे पूर्वीं नामांच्या मुळच्या रूपांत फेरफार होऊन जें रूप होतें, त्या रुपास **सामान्यरूप** असें म्हणतात.

९० नामांचीं सामान्यरूपें निरनिराळीं होतात, त्यांवरून त्यांचे सात गण बांधिले आहेत, ते असे:—**१ बापाचा गण २ घोड्याचा गण ३ गऱ्हाचा गण ४ कवीचा गण ५ साधूचा गण ६ मातेचा गण** आणि **७ बायकोचा गण**.

हे गण सामान्यनामांचे संबंधाचे आहेत असें समजावें.

### १ बापाचा गण.

९१ या गणांतील नामांचे सामान्यरूपाचे अंतीं

'आ' हा स्वर असतो. या गणांत नामें येतात तीं :—

(१) सर्व अकारांत पुल्लिंगीं व नपुंसकलिंगी नामें, यांच्या 'अ'चा आ होतो; उदाहरण—बाप, बापा—सुतार, सुतारा—पिंपळ, पिंपळा—पाप, पापा—शेण, शेणा—इत्यादि.

टीप—या नामांचें सामान्यरूप कवितेंत कधीं कधीं 'आ' असें न होतां 'ए' असें होतें; उदा०.

'तेथ **गुणेशीं** उपमा उपडे। **भेदेशीं** वाद बुडे।
**मुळेशीं** अज्ञान खुडे। चोहींकडेची आनंदु'।
एकनाथ.

'तनुमन **घनेशीं** अनन्य। स्वामी तुज आलों शरण'।
श्रीधर.

तेणें, येणें, जेणें, इत्यादि सर्वनामांचीं सामान्यरूपें अशाच प्रकारचीं होत. विशेषणाचे सामान्यरूपांत चालू भाषेंत सुद्धा दोन्ही प्रकार चालू आहेत. जसें, चांगल्या माणसानें, चांगले माणसानें, इ०.

(२) कित्येक आकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामें; यांचा अंत्यस्वर तसाच राहतो. यांत खालीं लिहिलेलीं नामें येतात.

(अ) मानाकरितां दिलेलीं पुल्लिंगी नामें; जसें, दादा, बाबा, अप्पा, तात्या, आबा, नाना, अण्णा, इ०.

(ब) नात्याचे वाचक पुल्लिंगी शब्द; जसें काका, व मामा; (या प्रकारचे दुसरे शब्द मेहुणा, चुलता वगैरे दुसऱ्या म्हणजे वोड्याच्या गणांत येतात).

(क) ज्यांचे उपांत्य 'च्' किंवा 'ज्' आहेत, अशीं आकारान्त नामें; जसें; चमचा, राजा, माचा, आजा, कुंचा, भाचा, इ०.

(या नामांचें सामान्यरूप झाल्यावर 'च' व 'ज' यांचा जो दंततालव्य उच्चार, तो जाऊन तालव्य उच्चार होतो.)

(ड) ज्यांचा उपांत्य 'स्' आहे अशीं आकारान्त नामें; यांच्या 'स्' ला 'श्' आदेश होतो; जसें, ससा, मासा, खासा, फांसा, आरसा, इ०.

(इ) णान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी भाववाचक नामें; जसें, चांगलेपण–णा, भलेपण–पणा, इ०.

(फ) भविष्यकाळवाचक धातुसाधित नामें व विशेषणें; जसें, करणार, करणारा, इ०.

(ग) ज्यांचें उपांत्याक्षर य् आहे अशीं आकारान्त पुल्लिंगी नामें; जसें, वाटाड्या, नांगऱ्या, जोत्या, इ०.

(३) कित्येक ऊकारान्त पुल्लिंगी नामें, व ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें यांचें सामान्यरूप आकारान्त होतें; त्यांची याद :—

(अ) ऊकारान्त पुल्लिंगीं–(विकल्पेंकरून)–तट्टू, भट्टू, परमू आणि वाटसरू; यांचीं दुसरीं रूपें साधु शब्दाप्रमाणें होतात; (विशेषेंकरून) पुंडू.

(आ) ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें (विशेषेंकरून) करडूं, गुरूं, घुंगरूं, निंबूं, परसूं, मांजरूं, मेंढरूं, म्हसरूं, रताळूं, रांडरूं, लेंकरूं, वाघरूं, वासरूं, शिंगरूं, शेरडूं, इ०.

(इ) ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें (विकल्पेंकरून) पाचेरूं, फाळटूं, सुकाणूं–यांचीं दुसरीं रूपें साधूच्या गणाप्रमाणें होतात.

टीप—सुकाणूं याचें रूप तिसऱ्या गणाप्रमाणेंही होतें.

## २ घोड्याचा गण.

९२ या गणांतील नामाचें सामान्यरूप आकारान्तच असतें; परंतु तें होण्यापूर्वीं मूळ नामास 'य' लागतो, अथवा सामान्यरूपच 'या' लागून होतें; जसें—घोडा, घोड्या,इ.

या गणांत जीं नामें येतात तीं:—

(१) पहिल्या गणांत न आलेलीं अशीं सर्व आकारान्त पुल्लिंगी नामें; जसें घोडा, गोटा, चुलता, मेहुणा, वाडा, सरडा, उंचवटा, इ०.

(२) दीर्घ ईकारान्त पुल्लिंगी नामें, जीं शुद्ध मराठी आहेत किंवा संस्कृतांतून येऊन ईकारान्त झालेलीं आहेत:—त्रिगारी, गडी, विद्यार्थी, वाढपी, न्हावी, तेली, साळी, रंगारी, काची, मोची, इ०.

अपवाद—हत्ती, मुनशी, काजी, मशालजी-शी-ची, नगारजी, आसामी, पाव्री, आणि पंतोजी हीं कवीच्या गणांत जातात. (कवीचा गण नियम (१) टीप पहा.)

(३) एंकारान्त आणि ईंकारान्त नपुंसकलिंगी नामें, जसें—नाणें, सोनें, केळें, पाणीं, लोणीं, इ०. करणें, बोलण इ० धातुसाधित नामें याच वर्गांत येतात.

## ३ गव्हाचा गण.

९३ या गणांतील नामांच्या सामान्यरूपाच्या अंतीं 'आ'च असतो, परंतु त्याचे पूर्वीं मूळ नामास 'व' लागतो ; अथवा यांचें सामान्यरूप 'वा' लागून होतें. या गणांत नामें येतात तीं:—

(१) कित्येक पुल्लिंगी ऊकारान्त नामें, ज्यांना विशेषें-

(ब) या नामांचे संबंधानें साधारण नियम असा आहे कीं, जे शब्द मूळचे संस्कृत इकारान्त किंवा ईकारान्त असून मराठींत अकारान्त झाले आहेत, त्यांचें सामान्यरूप 'ई' लागून होतें. उ० गोष्ट (सं. गोष्टी) सामा०—गोष्टी, पापीण (सं० पापिणी) सामा०—पापिणी; पोर (सं० पुत्री) सामा०—पोरी. श्रुति (न बदललेला) श्रुती केळ (सं० कदली), सामा०—केळी; मूठ (सं० मुष्टि) सा० मुठी. इ०.

(क) परंतु जीं नामें मूळचीं जीं संस्कृत आकारान्त नामें त्यांवरून झालीं आहेत, त्याचें सामान्यरूप एकारान्तच होतें. उदा० जीभ (सं० जिव्हा) सामा० जिव्हे; वेळ (सं० वेला) सामा— वेळे; भूक (सं० बुभुक्षा) सामा० भुके; शेज (सं० शय्या) सामा० शेजे—लाज (सं० लज्जा) सा० लाजे—सून (सं० स्नुषा) सा० सुने इ०.

(४) ज्यांचा उपांत्य य् आहे अशा अकारान्त स्त्रीलिंगीं नामाच्या 'य' बद्दल 'इ' (संप्रसारण) होऊन सामान्यरूप होते; जसें गाय, गाईस; चोय, चोईस; पोय, पोईस; डोय, डोईस; इ०.

(५) ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें—तिवै, खै, गै, जिव्है इ०. हीं तिवई, जिव्हई अशीं ही लिहितात.

(६) गण २ रा नियम (२) यांतील हत्ती वगैरे अपवादक नामें.

टीप—सन्मानार्थ 'जी' प्रत्यय लागून होणारीं भावोजी, रावजी, शेटजी, आयतोजी वगैरे नामें अशींच चालतात.

## ५ साधूचा गण.

९९ या गणांतील नामांच्या सामान्यरूपाच्या शेवटीं 'ऊ' असतो. यांत नामें येतात तीं:—

(१) ऱ्हस्व उकारान्त सर्व नामें; जसें साधु, वस्तु, धेनु, मधु (पु० किंवा न०) इ०.

(२) कांहीं ऊकारान्त पुल्लिंगीनामें, ज्यांचें सामान्यरूप विकल्पें करून 'आ' किंवा 'ऊ' होतें:—तट्टू, भट्टू, परभ वाटसरू इ० ( गण १ ला नियम ३ (अ) पहा. )

(३) कांहीं ऊकारान्त पुल्लिंगी नामें, ज्यांचें सामान्य-रूप विकल्पें करून 'वा' किंवा 'ऊ' होतें; जसें, नारू, पणतू, चाटू, भाऊ, आणि वेळू ( पहा तिसरा गण नि-यम २).

(४) पहिल्या व तिसऱ्या गणांत न येणारे सर्व ऊका-रान्त पुल्लिंगी शब्द; जसें, चाकू, धाकू, टेंकू, इ०.

(५) सहाव्या गणांत विशेषेंकरून चालणारीं जीं ऊकारान्त नामें, त्यांच्या खेरीज सर्व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें; उ० बाजू, वेणू, सासू, टाळू, इ० ( पहा ६ वा गण (४).

(६) ऊंकारान्त नपुंसकलिंगी कित्येक नामें, ज्यांच्या सामान्यरूपांत विकल्पेंकरून 'ऊ' किंवा 'आ' होतो:— पोचेरूं, फाळेटूं, सुकाणूं इ०. ( पहा १ ला गण, नियम ३ (इ).

(७) ऊंकारान्त नपुंसकलिंगी कित्येक नामें ज्यांना सामन्यरूपांत विकल्पेंकरून 'ऊं' किंवा 'वा' होतो:— बाळकडूं, सुकाणूं, जिवाणूं इ०. (पहा गण ३ नियम ४.)

(८) ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें, ज्यांमध्यें विशेषें-करून 'ऊं' च कायम राहतो तीं:—आगरूं, उठाणूं, उठाळूं, छांछूं, माचेरूं, हूंतूं, अवाळूं इ०.

### ६ मातेचा गण.

९६ या गणांतील नामांच्या सामान्यरूपाच्या शेवटीं 'ए' असतो ; यांत नामें येतात तीं:—

(१) मूळचीं संस्कृत आकारान्त स्त्रीलिंगी नामें (कथा सिकता, आपगा, जिव्हा इ० ) व मराठींत आकारान्त झालेली स्त्रीलिंगी नामें, माता, दुहिता वगैरे.

(२) कित्येक अकारान्त स्त्रीलिंगीं नामें, ज्यांना विशेषें करून 'ए' होतो ( पहा ४ था गण नियम ३रा, टीप ) यांतील मुख्य नामांची याद खालीं देतों :—

| | | | |
|---|---|---|---|
| अटक | चिंच | पेळव | रीझ |
| अडक | चीज | फिरंग | रीफ |
| अलभ | चीप | फौज | रेघ |
| ईड | चीर | बाग | रेंव |
| ईद | जीभ | बाज | रोंथ |
| उणीव | टिंच | डांक | लटक |
| ऊब | टीच | बीज | लवंग |
| कड | डेंग | भाज | लाख |
| कंबर | ढेलच | भाष-क | लाज |
| कमर | तिकूळ | भीक | लीख |
| कांच | तोफ | भेर | वस्त |
| कान | नमाज | मसूर | वळव |
| कास | नाव | माठ | वाट |
| कैद | नेणीव | मांद | वाफ |
| खडाव | पाश्चिम | मान | टीक |
| खांक | पहार | माय | वाव |
| खूण | पाच | माव | विंच |
| खेप | ढांक | माशुक | वीज |
| गरज | पोहोंच | माळ | वीट |
| गुंज | तूळ | मोहर | वीण |
| गुंफ | पुनव | मौज | वीळ |
| चपळ | पूर्व | रांड | वेंग |
| जट | पेंठ | रीघ | वेळ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शाक-ख | शेंग | ससीध | साण | सून |
| शाळ-साळ | शेज | सव | साद | सोंड |
| शिऊळ | सकाळ | साकर-खर | साव | हाक |
| शिक | सडक | सांज | सींव | हाव |
| शींव | सदर | सांड | सूज | हुरूप. |

(३) कित्येक अकारान्त स्त्रीलिंगी नामें, ज्यांच्या सामान्यरूपाचे शेवटीं विकल्पेंकरून 'ए' किंवा 'ई' स्वर होतात. (पहा ४ था गण नियम ३, टीप) जसें शेप, शिप, बटीक, बाईल, फींद, हद्द, परात, वरात, खबर, इजार, कटार इ०.

हीं नामें फार असल्यामुळें यांची याद दिली नाहीं; व यांचें सामान्यरूप ईकारान्तही होतें, यामुळें यांचीं रूपें करण्यास अडचण पडणार नाहीं.

(४) कित्येक ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें, ज्यांचे सामान्यरूपाचे शेवटीं विशेषेंकरून 'अवे' किंवा 'वे' असतो, किंवा विकल्पेंकरून ज्यांचा 'ऊ' स्वर कायम राहतो.

विशेषें करूनः—ऊ, जाऊ, दुरू.

विकल्पेंकरूनः—जळू, टाळू, सू, दारू, पिसू, पेळू, बाजू, वाळू आणि सासू.

(५) एकारान्त स्त्रीलिंगी शब्द; हे फारच थोडे आहेतः—विल्हे, सवे इ०.

## ७ बायकोचा गण.

९७ या गणांतील नामांच्या सामान्यारूपाच्या शेवटीं 'ओ' हा स्वर असतो.

९८ सर्व ओकारांत नामें या गणांत येतातः—बायको, टाहो, आहो, डोहो इ०.

टीप—वरील नियमांत 'कित्येक' 'वगैरे' 'इत्यादि' हे शब्द जरी घातले आहेत, तरी प्रत्येक नियमाखालीं येणारीं सर्व नांवें ठिकठिकाणीं सांगण्याचा झाला तितका यत्न केला आहे.



## विशेषनामांचें सामान्यरूप.

९९ वर जे सामान्यरूपाचे नियम सांगितले,त्यांपासून विशेषनामांचे संबंधाचे नियम थोडे भिन्न आहेत. या संबंधानें नियम असा आहे कीं, मनुष्यवाचक विशेषनामांचें सामान्यरूप अंत्यस्वर ऱ्हस्व असल्यास तो दीर्घ होऊन होतें; अंत्यस्वर दीर्घ असल्यास दीर्घच राहतो. उ० राम–रामा, हरी–हरी, नरसू–नरसू, गंगा–गंगा इ०.

१०० आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांपैकीं जीं संस्कृतांतून मराठींत येऊन विशेष प्रचारांतील झालीं आहेत, त्यांचें सामान्यरूप 'आ' किंवा 'ए' असें दोन्हीं प्रकारचें होतें; जसें रमा–रमास–रमेस,यशोदा–यशोदास–यशोदेस, सिता–सितास–सितेस, नर्मदा–नर्मदास–नर्मदेस इ०.

१०१ परंतु जीं नामें अजून मराठींत विशेष प्रचारांत आलीं नाहींत, त्यांचें सामान्यरूप एकारान्त असतें; जसें चंद्रकला–चंद्रकलेस, गिरिजा,–गिरिजेस, रत्नप्रभा–रत्नप्रभेस, शकुंतला–शकुंतलेस, मेनका–मेनकेस इ०.

१०२ कित्येक आकारान्त स्त्रीलिंगी नामें मराठींत ईकारान्त होतात; जसें गंगी (गंगा), दुर्गी (दुर्गा) इ०. यांचीं सामान्यरूपें ईकारान्त स्त्रीलिंगी नामांप्रमाणेंच होतात. परंतु हीं नामें व त्यांचीं मुळचीं आकारान्त नामें हीं निराळीं आहेत असें समजावें.

१०३ स्थळांचीं, देशांचीं, पर्वतांचीं, नद्यांचीं, शहरांचीं

गैरे भूगोलविद्येसंबंधी नामें हीं त्यांच्या सजातीय सा-
ान्यनामांप्रमाणें चालतात; उदा०-पु० कर्नाटक-कर्ना-
कास, सातारा-साताऱ्यास, सह्याद्री-सह्याद्रीस; इ०.
त्री० मद्रास-मद्रासेस, लंका-लंकेस, काशी-काशीस
ानवेल-पनवेलीस इ०. नपुं० सोलापूर-सोलापुरास पुणें-
ुण्यास, कारलें-कारल्यास इ०.

१०४ सामान्यरूपाचे संबंधानें मागें जे नियम सांगितले हे
कवचनी सामान्यरूपाबद्दल आहेत. अनेकवचनी सामान्यरूप
ासें करावें याविषयीं पुढें वचनविचारांत सांगितलें आहे.



## नामांच्या अंत्यस्वराविषयीं.

१०५ शुद्ध मराठी शब्दांत व्यंजनान्त शब्द नाहींत. संस्कृत
यंजनान्त शब्द मराठींत येतांना त्यांची साधारणतः खालीं लिहि-
याप्रमाणें व्यवस्था करितात :—

(१) वत्, मत्, वस्, अन् आणि इन् या अंतांचे जे संस्कृत
ाब्द आहेत, ते मराठींत आले असतां त्यांचें संस्कृतांतील जें
थमेचें एकवचन तें मराठींतलें मूळचें नाम समजावें. जसें,
ाक्तिमान्, बलवान्, विद्वान्, आत्मा, मेधावी इ०.

(२) स्कारान्त संस्कृत शब्दांस ही वरील नियम लागेल.
र्से, दुर्वासा, कृत्तिवासा ('कृत्तिवासा गरा न पी तरि कसें घडे
हत करा दयासागरा' मोरो०) इ०. परंतु यांचीं मराठीं
ूपें अंतींच्या 'स्' चा लोप करून ही करितात; उ० दुर्वास,
ृत्तिवास इ०.

(३) इतर अन्तांचे व्यंजनान्त संस्कृत शब्द मराठींत आले
ासतां त्यांच्या अन्त्याक्षरामध्यें 'अ' स्वर मिळवून त्यांस स्वरान्त

करून घेतात. परंतु ते विशेष प्रचारांत आले नसल्यास असेच्या तसेच मराठींत लिहितात.

टीप—वरील नियम अक्षरशः पाळले जातात, असें नाहीं; चांगल्या ग्रंथकारांची जी रीत आहे, ती सांगितली आहे. व तिजा अनुसरण्याचा प्रयात पाडावा, हें भाषेंत एक नियम असण्यास फार सोयीचें आहे.

१०६ शुद्ध मराठी शब्दांचे शेवटीं नेहमीं दीर्घ स्वर असतो. संस्कृत शब्द मराठींत आले असतां ते ऱ्हस्व लिहावे किंवा दीर्घ लिहावे या संबंधानें भिन्न मत आहे, व दोन्ही प्रघात सुरू आहेत. परंतु ते शब्द विशेष प्रचारांत आले असतां मराठीचे रीतीप्रमाणें त्यांचा अन्त्य दीर्घ समजावा, हा मार्ग प्रशस्त दिसतो. तथापि सध्या दोन्ही रीती चालू असल्यामुळें प्रथमेच्या एकवचनीं दोन्हीं प्रकार शुद्ध मानावे; अनेकवचनीं मात्र एकच दीर्घरूप शुद्ध समजावें.

१०७ शुद्ध मराठी नपुंसकलिंगी शब्द असल्यास अकारान्त व आकारान्त शिवायकरून बाकीच्या सर्व शब्दांचे अंत्यस्वरावर नेहमीं अनुस्वार द्यावा. पाणी, लोणी, चिंचवणी इ० शब्दांचे अंत्यावर आपण अनुस्वार देत नाहीं, याचें कारण त्याचे अंत्याक्षरांत अनुनासिक व्यंजन असल्यामुळें अनुस्वाराचा उच्चार स्वाभाविक होतो; परंतु ते शब्द लिहितांना सानुस्वार लिहावे.

१०८ शुद्ध संस्कृत शब्दांचे संबंधानें हा नियम लागू पडत नाहीं. उ० दधि, वारि, अस्थि इ०.



## नामांच्या उपान्त्याविषयीं.

१०९ मराठींत कित्येक नामांच्या उपान्त्यस्वरांस त्या नामांस कोणताही प्रत्यय लाविला तरी फेरफार होतो. उ० तारीख—तारिखेस–तारखेस: उदीम–उदमी; कापूर–कापुरास–कापरास इ.

येथें उपान्त्य स्वर म्हणजे उपान्त्य अक्षराचा स्वर असें समजावें.

११० या नामांपैकीं मुख्य मुख्य नामांची याद खालीं देतों :—

(१) ज्यांचा उपान्त्य स्वर दीर्घ 'ई' असल्यास तो ऱ्हस्व होतो किंवा 'ई' चा 'य' होतो तीं नामें :—

| | | |
|---|---|---|
| आईन | कुईट | बाईल |
| (आइनास, आयनास) | कुईरी | बिछाईत |
| आईस | गाईर | सुईण |
| कवाईत | ताईस | हिमाईत |
| काईल | पंचाईत | |

(२) ज्यांचा उपान्त्य स्वर दीर्घ 'ई' ऱ्हस्व होतो किंवा त्याचा 'अ' होतो :—

उदीम (उदिमास-उदमास)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| उडीद | उंदीर | उंडीण | आठीळ | कणीक |
| कणीस | कथील | कमळीण | कामीण | कातीन |
| कांबीट | कावीळ | काळीज | कुपीन | कुसळीण |
| कुळीण | कोथिंबीर | कांशिबीर | खारीक | खोगीर |
| गोंधील* | गोचीड | जिलीब | जोखीम | तखील |
| ताजीम | तारीख | तालीम | तीडीक | तिरीप |
| बटीक | बहीण* | भरीत | भावीण | भोरीप |
| रंजीम | रेशीम | लेजीम | शेतीक | सुगरीण |

(३) ज्यांचा उपान्त्य 'ऊ' ऱ्हस्व होतो ते शब्द :—

अंकूर (अंकुरास).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अमसूल | असूड | खजूर | गांडूळ | न्राहूर |
| चिमूट | ताबूद | निगूड | माजूम | वारूळ |
| विभूत | | | | |

*या शब्दांच्या उपान्त्यास 'अ' होत नाहीं.

(४) ज्यांचा उपान्त्य 'ऊ' ऱ्हस्व होतो किंवा त्याबद्दल 'व' होतो:—

अऊत (अवतास-अउतास).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | कऊल | दऊत | देऊळ | पाऊल | पाऊस |
| बाऊट | बाऊस | बाऊळ | राऊळ | शिऊळ | साऊळ |

(५) ज्यांचा उपान्त्य 'ऊ' ऱ्हस्व होतो, किंवा त्याबद्दल 'अ' होतो ते शब्द:—

अंगुळ (अंगुळास-अंगळास)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| इटकूर | काडूक | कापूर | कुडूक | कुसरूड |
| खरूज | खांडूक | घुंगरूड | चुणूक | चेटूक |
| जांबूळ | जुगूळ | जुलूम | झुडूप | टेंगूळ |
| ठाकूर | ढेंकूण | ताटूक | तांदूळ | निंबूण |
| परूस | पाळूक | पुरूळ | पेटूळ | पेंडूक |
| बाटूक | बापूस | बाभूळ | बुडूख | बुरूज |
| बुरूम | बेडूक | बोटूक | बोंडूक | भोरूप |
| माणूस | मुंगूस | मुरूम | मेडूक | रेडूक |
| लसूण | लांकूड | लालूच | लेंडूक | वाघूळ |
| वाळूक | शेंदूर | शेपूट | शेंबूड | साबूण |
| हडूक | हुकूम | | | |



## वचनविचार.

१११ शब्दाच्या एकत्वाचा किंवा अनेकत्वाचा जो बोध त्यास **वचन** असें म्हणतात; वचनें दोन आहेत; **एकवचन** आणि **अनेकवचन**.

११२ शब्दापासून एकच वस्तूचा किंवा अनेक वस्तू असल्या तरी त्यांमिळून एकच समुदाय आहे असा बोध

होणें, त्यास **एकवचन** असें म्हणतात. उदा० मूल, मनुष्य, पाखरूं, फौज, वर्ग, देश, इ०.

११३ शब्दापासून एकापेक्षां जास्ती वस्तूंचा किंवा समुदायांचा बोध होणें, यास **अनेकवचन** असें म्हणतात. उदा० मुलें, मनुष्यें, पाखरें, फौजा, वर्ग, देश, इ०.

टीप—अनेवचनास **बहुवचन** असेंही म्हणतात.

११४ एकवचनी शब्द अनेकवचनांत आणतांना त्यांच्या लिंगभेदाप्रमाणें अंत्याक्षरांत फेरफार होतात. अनेकवचन करण्याच्यासंबंधाचे नियम खालीं दिले आहेत.

एकवचनाचें अनेकवचन करितांना लिंगविचारांत प्रत्यय लावण्याचे संबंधानें दिलेले नियम व विभक्तिविचाराचे शेवटीं सांगितलेले उपान्त्याचे नियम लक्षांत ठेवावे.

(१) आकारान्त शिवाय करून बाकीच्या सर्व पुल्लिंगी नामांचें एकवचन आणि अनेकवचन सारखेंच असतें. उ० सुतार, सुतार; तेली, तेली; शत्रु, शत्रू; इ०.

(२) आकारान्त पुल्लिंगी नामांचें बहुवचन 'ए' लागून होतें; उ० घोडा, घोडे; इ० परंतु आकारान्त विशेष नामें आणि बापाच्या गणांतील आकारान्त पुल्लिंगी नामें यांचें एकवचन व अनेकवचन सारखेंच असतें. उ० बाबा, तात्या, रामा, गोविंदा, इ०.

(३) आ—ए—इ आणि उकारान्त स्त्रीलिंगी नामांचें एकवचन आणि अनेकवचन हीं सारखींच असतात. उ० माता, विल्हे, रुचि, धेनु, इ०.

(४) अकारान्त स्त्रीलिंगी नामांत ज्यांचें सामान्यरूप

'ए' लागून होतें, त्यांचें अनेकवचन होतांना 'आ' प्रत्यय लागतो; ज्यांचें सामान्यरूप 'ई' लागून होतें, त्यांचे अनेकवचनीं 'ई' प्रत्यय लागतो; व ज्यांचें सामान्यरूप विकल्पेंकरून, होतें त्यांचें अनेकवचनही विकल्पेंकरून होतें. उदा० वीट, विटा; झेप, झेपी; तरवार, तरवा-री–रा; इ०.

(५) ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचें बहुवचन होतांना 'ई'च्या जागीं 'या' होतो; जसें नदी याचें नद्या; शब्द जर एकाक्षरी असला, किंवा ईच्या पूर्वीं स्वर असला तर अंतींचा या निराळा जोडतात; जसें स्त्री, स्त्रिया; बाई, बाया; आई, आया; कुई, कुया; परंतु, बाई, आई; इ० शब्द जर आदरार्थी असले, तर त्यांचें अनेकवचन एक-वचनाप्रमाणेंच असतें; उदा० 'रमाबाई आल्या;' 'या बाई श्रीमंत दिसतात,' इ०.

(६) ज्या स्त्रीलिंगी नामांचे शेवटीं 'य' असतो त्यांचे अनेकवचनीं यच्या जागीं ई स्वर होतो. जसें, गाय, गाई इ०;या प्रकारचीं नामें, कोय. चोय, डोय,तोय, साय, सवय, इ० थोडकींच आहेत. चोय याचें अनेकवचन चोया असेंही होतें. हीं नामें कोई, डोई, सोई, अशींही लि-हितात.

(७) ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें ईकारान्त समजून ५ वे नियमांखालीं चालावीं; जसें तिवै-तिवई-तिवया.

(८) ओकारान्त स्त्रीलिंगी नामांचें बहुवचन आका-रान्त होतें. उ० बायको, बायका.

(९) इ–उ-कारान्त संस्कृत नपुंसकलिंगी नामांचीं उ-

भय वचनें सारखीं असतात. उ० दधि, मधु, दधी, मधू; इ० (पहा नि० १०६).

(१०) अकारान्त नपुंसकलिंगी नामांचें अनेकवचन एंकारान्त होतें; एंकारान्त नामांचें इंकारान्त होतें; आणि ईंकारान्त नामांचें एंकारान्त होतें. उ० कुरणें, नाणीं, मोत्यें, इ०.

(११) ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामांमध्यें ज्यांचें सामान्यरूप आकारान्त होतें, त्याचें अनेकवचन एंकारान्त असतें; व ज्याचें समान्यरूप 'वा' किंवा 'ऊं' लागून होतें, त्याचें अनेकवचन 'वें' लागून होतें. उ० करडें, तावें, उठाण्वें, जिवाण्वें, इ०.

(१२) अनेकवचनाचे संबंधानें साधारणतः हें सांगितलें पाहिजे कीं, संस्कृत र्‍हस्व स्वरान्त नामें एकवचनीं जरी र्‍हस्व व दीर्घ दोन्हीं प्रकारें लिहितात, तरी अनेकवचनीं अंत्यस्वर र्‍हस्व असल्यास दीर्घ करावा. उ० हरि, कवि, मति, श्रुति, या शब्दाचीं अनेकवचनें हरी, कवी, मती, श्रुती हीं होत.

११९ हे जे अनेकवचन करण्याचे नियम सांगितले, ते प्रथमा व अंशतः द्वितीया या विभक्तींच्या संबंधाचे आहेत. इतर विभक्तींचें बहुवचन विभक्तीप्रत्यय लागून व त्यांचे पूर्वी सामान्यरूप होऊन होतें. अनेकवचनी सामान्यरूप करण्याचे संबंधानें खालचे नियम ध्यानांत ठेवावे.

(१) बापाचा गण, घोड्याचा गण, गव्हाचा गण, कवीचा गण, व साधूचा गण यांचें अनेकवचनी सामान्यरूप करितांना एकवचनी सामान्यरूपाचे अंत्यस्वरावर अनुस्वार द्यावा.

(२) या नियमास ईकारान्त स्त्रीलिंगी नामें अपवादक आहेत. यांचे अनेकवचनी सामान्यरूप प्रथमेच्या अनेक वचनाचे अंत्यस्वरावर अनुस्वार देऊन करितात. जसें, नदी, अने० नद्या—नद्यांस इ०.

(३) परंतु हीं ईकारान्त स्त्रीलिंगी नामें संस्कृत असून विशेष प्रचारांतील नसल्यास, किंवा आई, काकी, मामी इ० प्रतिष्ठासूचक नामें असल्यास त्यांचें अनेकवचनी सामान्यरूप एकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार देऊन करितात; उदा० नारींस, साध्वींस, देवींस आईंस इ०.

आई हा शब्द आदरार्थी नसल्यास अने० सामान्यरूप 'आया' असें होतें.

(४) जिभेचा गण व बायकोचा गण यांतील नामांचें अनेकवचनी सामान्यरूप करितांना प्रथमेच्या बहुवचनावर अनुस्वार द्यावा. जसें, जिभांस, बायकांस, इ०.

११६ मर्जी, स्तुति, कलंक, गति, बुद्धि, उजेड, अंधार, सावट, प्रकाश, काळोख, हवा, काळ, इत्यादि गुणवाचक, प्रकृतिवाचक व धर्मवाचक नामें, याचें अनेकवचन होत नाहीं.

११७ चांगलेपण, महत्व, गुरुत्व, धैर्य, गुलामगिरी, इत्यादिक भाववाचक नामें, यांचेंही बहुवचन होत नाहीं.

११८ परंतु वरील दोन्ही कलमांत सांगितलेल्या नामांचे भिन्न भिन्न प्रकार दाखववयाचे असल्यास त्यांचीं अनेकवचनें होतात. असें, "सोनें आणि कथील यांचीं विशिष्टगुरुत्वें;" "सुनेस, सासू, नणंद, दीर, जाऊ, या सर्वांच्या मर्ज्या राखावयाच्या असतात," इ०.

११९ विशेषनामांस बहुवचन नाहीं. तथापि बहुमानास्तव

त्यांचें बहुवचन करणें असल्यास त्यांचे पुढें पंत, राव, साहे भाऊ, इत्यादि शब्द योजून बहुवचन करितात. जसें, बाळा, बाळाजीपंत, बाळासाहेब, बाळाभाऊ, इ०.

१२० मराठींत मनुष्यप्राणिवाचक विशेषनामें व सामान्यनाम हीं जरी एकच व्यक्ति दाखवीत असलीं, तथापि मानाकरितां त्यास अनेकवचनी समजण्याची चाल आहे. यास **आदरार्थी बहुवचन** असें म्हणतात; उदा० 'यजमान आले'. 'गोविंदराव त्यांचे वडील'. या वाक्यांत 'यजमान' व 'गोविंदराव' जरी एकेक व्यक्ती असल्या तरी बहुमानास्तव तीं अनेकवचनें समजलीं आहेत.

१२१ दाढी हा शब्द निरंतर एकवचनीं असतो. कांहीं सामान्यनामें निरंतर अनेकवचनीं असतात त्यांचीं उदाहरणें:— वडील (अर्थ बाप), केंश, मिशा, मुस्क्या, हाल, ख्याल, खडावा, वर्स्से, आळेपिळे, आट्यापाट्या, देवी, कांजण्या (रोग) इ०.

१२२ सामान्यरूप व अनेकवचन यांसंबंधानें जे नियम वर दिले आहेत त्यांचे समजुनीकरितां कोष्टक देतों:—

| लिंग. | अंत्य. | अनेकवचन. | एकवचनी सामान्यरूप | अनेकवचनी सामान्यरूप. |
| --- | --- | --- | --- | --- |
| पुल्लिं. | अ | अ | आ | आं |
| ,, | आ | ए | या, आ, वा | यां, आं, वां |
| ,, | इ | ई | ई | ई |
| ,, | ई | ई | या | यां |
| ,, | उ | ऊ | ऊ | ऊं |
| ,, | ऊ | ऊ | ऊ, वा, आ | ऊं, वां, आं |
| ,, | ओ | ओ | ओ | ओं |
| स्त्री. | अ | ई, आ | ई, ए | ई, आं |
| ,, | आ | आ | ए | आं |
| ,, | इ | ई | ई | ई |
| ,, | ई | या | ई, या | ई, यां |
| ,, | उ | ऊ | ऊ | ऊं |
| ,, | ऊं | ऊ, वा | ऊं, वे | ऊ, वां |
| ,, | ऐ | आ | ओ | आं |
| नपुं. | अ | एं | आ | आं |
| ,, | इ | ई | ई | ई |
| ,, | इ, ई | यें | या | ई, यां |
| ,, | उ | ऊ | ऊ | ऊं |
| ,, | ऊं | एं, वें, ऊं | वा, आ, ऊं | वां, आं, ऊं |
| ,, | ए, एं | ई | या | यां |
| ,, | ओ | ओ | ओ | ओं |

## नामें चालविणें.

१२३ मराठींतील सात विभक्तींचे प्रत्यय खालीं दिल्याप्रमाणें आहेत :—

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा | अ, ओ, ऊ | ए, आ, एं, ईं |
| द्वितीया | [प्रथमेप्रमाणें व शिवाय—] स, ला, तें | [नामाचें अनेकवचन तेंच प्रथमेचें अनेकवचन] स, ला, तें, ना. |
| तृतीया | नें, एं, शीं | नीं, हीं, ईं, शीं |
| चतुर्थी | स, ला, तें | स, ला, तें, ना. |
| पंचमी | ऊन, हून | ऊन, हून |
| सप्तमी | ईं, आं | ईं, आं |
| संबोधन | [प्रथमेप्रमाणें] व आ | नो [हा प्रत्यय लावण्याचें पूर्वी अनेकवचनी सामान्यरूप होतें] |

हे प्रत्यय लावतांना खुद्द नामाला किंवा प्रत्ययांना ज्या विशेष गोष्टी घडतात त्यांचें विवरण करितों.

### प्रथमा.

१२४ या विभक्तीचा प्रत्यय 'अ' हा नामांस लागतांना त्या प्रत्ययाचा लोप होतो.

१२५ प्रत्यय 'ओ' व 'ऊ' हे कवितेंत येतात; रावो, उपायो, दिवाकरू, सागरू, वसंतू, इत्यादि रूपें कवितेंत फार येतात. हे प्रत्यय संस्कृतांतील विसर्ग किंवा त्यांचीं प्रातिरूपें 'उ' व 'ओ' यांपासून झाले आहेत.

### द्वितीया.

१२६ स—हा प्रत्यय कवितेंत सि, किंवा सी, शी असा आढळतो. याचा प्रयोग सध्या कोंकणप्रांतांत बोलण्यामध्यें फार आहे. तथापि जुन्या मराठी कवितेंत

हाच प्रत्यय फार वेळ येतो. कोकणाशिवाय इतर प्रांतांत याचा उपयोग लिहिण्यांत मात्र करितात.

१२७ ला—हा प्रत्यय जुन्या कवितेंत फारसा आढळत नाहीं. देशावर याचा उपयोग विशेष आहे.

१२८ द्वितीया केव्हां प्रथमेप्रमाणें होते; व केव्हां स,ला,इ० प्रत्यय लावितात. पहिल्या प्रकारचे द्वितीयेस **अ-प्रत्यय द्वितीया** व दुसरीस **स-प्रत्यय द्वितीया** असें म्हणावें.

१२९ तें—हा प्रत्यय केवळ कवितेंत किंवा जुन्या गद्यग्रंथांत सांपडतो.

१३० केव्हां केव्हां या विभक्तीचे जागीं फक्त सामान्यरूपच घातलेलें आढळतें. जसें:—

'अगा प्रणतवत्सला, म्हणति त्या जनां पावलां
म्हणोनि तुमच्याच मी नमितसें सदा **पावलां**'।
मोरो०.

'**हंसा** धरूं जवळि जाय कृशोदरी ते' रघुनाथपंडित.

'जे का ज्ञानें लाधले **सद्विचारा**' वामन.

१३१ चतुर्थी विभक्ति कर्तव्य असतांही फक्त सामान्यरूप करितात. जसें, 'तो घरा आला' इ०. ही चाल कवितेंत विशेष आहे; उदा०:—

'**आम्हां** न दिसेचि दुजा सुखदायक शत्रुनाशसम यज्ञ'. मोरो.
'विपत्तियोगें पडले जरी कां। तें स्थैर्य नोहे तरि **साधुलोकां**।'
वामन.

## तृतीया.

१३२ या विभक्तीच्या प्रत्ययांतील 'एँ' हा एकवचनी प्रत्यय व बहुवचनीं ई व हीं हे प्रत्यय कवितेंत मात्र

येतात. हे प्रत्यय अकारान्त पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी नामांस लागतात. जसें:—

'व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गाइला
तो नामें नळ, तत्कथीच लिहिला तो पाहिजे पाहिला'।
रघुनाथपण्डित.

## चतुर्थी.

१३३ द्वितीया विभक्तीच्या स-ला-दि प्रत्ययांच्या संबंधाचे सर्व नियम येथें समजावें.

## पंचमी.

१३४ ऊन—हा प्रत्यय कित्येक अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दांस मात्र लागतो; जसें, घरून, हातून इ०. हा प्रत्यय लागताना पररूप संधी होतो; सामान्यरूप होत नाहीं.

## सप्तमी.

१३५ ईं हा प्रत्यय कित्येक अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामांस मात्र लागतो. याचा उपयोग कवितेंत फार आढळतो. उदाहरणें:—

'हस्तीं करी वलय उंच, अगा उपायीं
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं'।
'द्वारीं झुलोत गजसंघ हिंसोत वाजी'। रघुनाथपण्डित.
'विलासिनींच्या हस्तीं तेथें कमळें; कुंदकळ्याही।
शिरीं शोभती; मुखीं पाण्डुता येई लोधरजाहीं। मेघदूत.
कर्णीं लोंबति चामरें ——— कृष्णशास्त्री.

१३६ व्यावहारिक भाषेंतही घरीं, दारीं, गावीं, पदरीं, इ०

ठिकाणीं हा प्रत्यय लागतो. साधारणतः हा प्रत्यय स्थलवाचक व कालवाचक नामांस लागतो.

१३७ आं हा प्रत्यय कित्येक आकारान्त पुल्लिंगी शब्दांस मात्र लागतो. उ० पायां पडला, गळां पडला, इ.

१३८ कवितेंत याचा प्रयोग फार होतो; उ०.

कर्णीं लोंबति चामरें झळकती माळा **गळां** साजिऱ्या ।

कृष्णशास्त्री.

त्याचे **माथां** जटा असो नसो ।　　तुकाराम.

१३९ हे दोन्हीं प्रत्यय शब्दांस लागतांना पररूप संधी होतो. सामान्यरूप होत नाहीं.

१४० मराठी व्याकरणांत आणखी 'त' हा एक सप्तमीचा प्रत्यय सांगितला आहे. परंतु वस्तुतः तें आंत हें शब्दयोगी अव्यय असून, तें नामांस लागतांना पूर्वरूपसंधी होतो. हा प्रत्ययच मानणें झाल्यास नुसता 'त' हा प्रत्यय न समजतां अनुस्वारपूर्वक त (ंत) हा प्रत्यय आहे, असें मानावें लागेल. परंतु हा प्रत्यय मानणें प्रशस्त दिसत नाहीं.

१४१ वर जे नियम सांगितले त्यांप्रमाणें प्रत्येक जातीचे मुख्य मुख्य शब्द चालवून दाखवितों.

(१) अकारान्त पुल्लिंगी 'भाव' शब्द.

| | एकवचन. | बहुवचन. |
|---|---|---|
| प्र० | भाव, भावो, भावू | भाव. |
| द्वि० | भाव, भावो, भावू<br>भावास, भावाला, भावातें; | भाव, भावांस, भावांला, भावांतें, भावांना. |
| तृ० | भावानें, भावें, भावाशीं | भावांनीं, भावांहीं, भावीं, भावांशीं. |
| च० | भावास, भावाला, भावातें | भावांस, भावांला, भावांते, भावांना. |

| | | |
|---|---|---|
| पं० | भावाहून | भावांहून. |
| स० | भावीं | भावीं. |
| सं० | भाव, भावा | भावांनो. |

(२) अकारान्त नपुंसकलिंगी 'घर' शब्द.*

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | घर | घरें. |
| द्वि० | घर, घरास, घराला, घरातें | घरें, घरांस, घरांला, घरांना, घरांतें. |
| तृ० | घरानें, घरें, घराशीं | घरांनीं, घरीं, घरांहीं, घरांशीं. |
| च० | घरास, घराला, घराते | घरांस, घरांला, घरांना, घरांतें. |
| पं० | घराहून, घरून | घरून, घरांहून. |
| स० | घरीं | घरीं |
| सं० | घर, घरा | घरांनो. |

(३) आकारान्त पुल्लिंगी 'मामा' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | मामा | मामा. |
| द्वि० | मामा, मामास | मामा, मामांस. |
| तृ० | मामानें | मामांनीं, |
| च० | मामास | मामांस. |
| पं० | मामांहून | मामांहून. |
| स० | (रूपें नाहींत) | |

---

* पुढें जीं नामें चालवून दाखविलीं आहेत, तीं अगदीं पूर्णपणें चालविलीं आहेत असें नाहीं. मुख्य मुख्य रूपें दिलीं आहेत. कित्येक महत्वाचीं नामें पूर्णपणें चालविलीं आहेत.

(४) आकारान्त पुल्लिंगी 'घोडा' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | घोडा | घोडे. |
| द्वि० | घोडा | घोडे. |
| | घोड्यास, घोड्याला | घोड्यांस, घोड्यांला. |
| तृ० | घोड्यानें | घोड्यांनीं, घोड्यांहीं. |
| च० | घोड्यास, घोड्याला-ते | घोड्यांस, घोड्यांला. |
| पं० | घोड्याहून | घोड्यांहून. |
| सं० | घोड्या | घोड्यांनो. |

(५) आकारान्त पुल्लिंगी 'राजा' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | राजा | राजे. |
| द्वि० | राजा | राजे. |
| | राजा-स-ला-तें | राजां-स-ला-ना-तें. |
| तृ० | राजानें | राजांनीं. |
| च० | राजा-स-ला-तें | राजां-स-ला ना-तें. |
| पं० | राजाहून | राजांहून. |
| सं० | राजा | राजांनो. |

(६) इकारान्त पुल्लिंगी 'कवि' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | कवि, कवी * | कवी. |
| द्वि० | कवि, कवी | कवी. |
| | कवी-स-ला-तें | कवीं-स-ला-ना-तें. |
| तृ० | कवीनें | कवींनीं, कवीं-हीं-शीं. |
| च० | कवी-स-ला-तें | कवींस-ला इ०. |
| पं० | कवीहून | कवींहून. |

* पहा, नियम १०६.

| | | |
|---|---|---|
| सं० | कवी, कवे (संस्कृत) | कवींनो. |

(७) ईकारान्त पुल्लिंगी 'माळी' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | माळी | माळी. |
| द्वि० | माळी, माळ्यास-ला-तें | माळी, माळ्यांस-ला-ना-तें. |
| तृ० | माळ्यानें-शीं | माळ्यांनीं-हीं-शीं. |
| च० | माळ्यास-ला तें | माळ्यांस-ला-ना-तें. |
| पं० | माळ्याहून | माळ्यांहून. |
| सं० | माळ्या | माळ्यांनो. |

(८) अकारान्त स्त्रीलिंगी 'घार' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | घार | घारी. |
| द्वि० | घार, घारीस-ला-तें | घारी, घारींस-ला-ना-तें. |
| तृ० | घारीनें | घारींनीं |
| च० | घारीस-ला तें | घारींस-ला-ना-तें. |
| पं० | घारीहून | घारींहून. |
| सं० | घारी | घारींनो. |

(९) अकारान्त स्त्रीलिंगी 'तरवार' शब्द.

| | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | तरवार | तरवारा, तरवारी. |
| द्वि० | तरवार<br>तरवारे-स,-ला,-तें<br>तरवारी-स,-ला,-तें | तरवारा, तरवारी,<br>तरवारांस, तरवारींस. |
| तृ० | तरवारीनें, तरवारेनें | तरवारांनीं, तरवारींनीं. |
| च० | तरवारेस, तरवारीस | तरवारांस, तरवारींस. |
| पं० | तरवारीहून, तरवारेहून | तरवारींहून, तरवारांहून. |
| सं० | तरवारी | तरवारींनो. |

(१०) इकारान्त स्त्रीलिंगी 'मुक्ति' शब्द.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | मुक्ति, मुक्ती | मुक्ती. |
| द्वि० | मुक्ति, मुक्ती<br>मुक्तीस, मुक्तीला-तें | मुक्ती.<br>मुक्तींस-ला-ना-तें. |
| तृ० | मुक्तीनें, मुक्तीशीं | मुक्तींनीं-शीं. |
| च० | मुक्तीस, मुक्तीला-तें | मुक्तींस-ला-ना-तें. |
| पं० | मुक्तीहून | मुक्तींहून. |
| | इ०. | इ०. |

(११) ईकारान्त स्त्रीलिंगी 'नदी' शब्द.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | नदी | नद्या. |
| द्वि० | नदी, नदीस-ला | नद्या, नद्यांस-ला-ना. |
| तृ० | नदीनें-शीं | नद्यांनीं-शीं. |
| च० | नदीस-ला | नद्यांस-ला-ना. |
| पं० | नदीहून | नदींहून. |
| | इ०. | इ०. |

(१२) ईकारान्त स्त्रीलिंगी 'स्त्री' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | स्त्री | स्त्रिया. |
| द्वि० | स्त्री, स्त्रीला-स,<br>स्त्रियेला-स | स्त्रिया<br>स्त्रियांना-ला-स. |
| तृ० | स्त्रीनें-शी, स्त्रियेनें-शीं, | स्त्रियांनीं-हीं-शीं. |
| च० | स्त्रिस-ला, स्त्रिये-स-ला; | स्त्रियांना-ला-स. |
| पं० | स्त्रीहून, स्त्रियेहून; | स्त्रियांहून. |
| सं० | स्त्री, स्त्रिये, | स्त्रीयांनो. |

(१३) उकारान्त पुल्लिंगी 'वायु' शब्द.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | वायू, वायु | वायू. |
| द्वि० | वायू, वायु<br>वायूस-ला | वायू.<br>वायूंस-ला-ना. |
| तृ० | वायूनें-शीं | वायूंनीं-शीं. |
| च० | वायूस-ला | वायूंस, वायूंला-ना. |
| पं० | वायूहून | वायूंहून. |
| | इ०. | इ०. |

(१४) ऊकारान्त पुल्लिंगी 'भाऊ' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | भाऊ | भाऊ. |
| द्वि० | भाऊ, भाऊस-ला<br>भावास-ला | भाऊ, भाऊंस-ला.<br>भावांस-ला-ना. |
| तृ० | भाऊनें, भावानें | भाऊंनीं, भावानीं. |
| च० | भाऊस, भावास | भाऊंस-ला, भावांस-ला. |
| पं० | भाऊहून, भावाहून | भावांहून, भाऊंहून. |
| सं० | भाऊ, भावा | भावांनो. |

(१५) ऊंकारान्त नपुंसकलिंगी 'सुकाणूं' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | सुकाणूं | सुकाणें. |
| द्वि० | सुकाणूं<br>सुकाणास-ला<br>सुकाणूस, सुकाण्वास* | सुकाणूं.<br>सुकाणांस-ला. |
| तृ० | सुकाणानें-शीं | सुकाणांनीं-शीं. |

* याचीं 'सुकाणूस' 'सुकाण्वास' 'सुकाणूनें' 'सुकाण्वानें' इ० अशींही रूपें होतात.

| | | |
|---|---|---|
| च० | सुकाणास-ला | सुकाणांस-ला. |
| पं० | सुकाणाहून | सुकाणांहून. |
| | इ०. | इ०. |

(१६) उकारान्त स्त्रीलिंगी 'धेनु' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | धेनु, धेनू | धेनू |
| द्वि० | धेनु, धेनू<br>धेनूस-ला | धेनू.<br>धेनूंना-स-ला. |
| तृ० | धेनूनें | धेनूंनीं. |
| च० | धेनूस-ला | धेनूंस-ला-ना. |
| पं० | धेनूहून | धेनूंहून. |
| | इ०. | इ०. |

(१७) ऊकारान्त स्त्रीलिंगी 'सासू' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | सासू | सास्वा. * |
| द्वि० | सासू, सासूस-ला<br>सास्वेस-ला | सास्वा.<br>सास्वांस-ला-ना. |
| तृ० | सासूने, सास्वेनें | सास्वांनीं, सास्वांशीं. |
| च० | सासूस, सास्वेस | सास्वांस-ला-ना. |
| पं० | सासूहून, सास्वेहून | सास्वांहून. |
| | इ०. | इ०. |

(१८) ऊकारान्त नपुंसकलिंगी 'धनू' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | धनू | धनू. |
| द्वि० | धनू, धनूस | धनू, धनूंस-ला. |

---

* या नामाचीं आणखी 'सासुसं', 'सासूनीं' अशीं ही अनेकवचनीं रूपें होतात.

| | | |
|---|---|---|
| तृ० | धनूनें | धनूंनीं. |
| च० | धनूस | धनूंस-ला. |
| पं० | धनूंहून | धनूंहून. |
| | इ०. | इ०. |

(१९) ऊंकारान्त नपुंसकलिंगी 'गळूं' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | गळूं | गळवें. |
| द्वि० | गळूं, गळ-गळ्वास-ला | गळवें, गळवांस-ला. |
| तृ० | गळवानें, गळ्वानें | गळवांनीं-शीं, गळ्वांना. |
| च० | गळवास, गळ्वास | गळवांस-ला, गळ्वांस. |
| पं० | गळवाहून, गळ्वाहून | गळवांहून, गळ्वांहून. |
| सं० | गळवा | गळवांनो. |

(२०) एंकारान्त नपुंसकलिंगी 'सोनें' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | सोनें | सोनें. |
| द्वि० | सोनें, सोन्यास-ला | सोनीं, सोन्यांस-ला ना. |
| तृ० | सोन्यानें | सोन्यांनीं. |
| च० | सोन्यास-ला | सोन्यांस-ला. |
| पं० | सोन्याहून | सोन्यांहून |
| सं० | सोन्या | सोन्यांनो. |

(२१) ओकारान्त स्त्रीलिंगी 'बायको' शब्द.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र० | बायको | बायका. |
| द्वि० | बायको, बायकोस-ला | बायका, बायकांस-ला-ना. |
| तृ० | बायकोनें | बायकांनीं. |
| च० | बायकोस | बायकांस-ला. |

| पं० | बायकोहून | बायकांहून |
|---|---|---|
| | इ०. | इ०. |

१४२ सप्तमी विभक्तीचे प्रत्यय जे 'ई' व 'आं' ते ज्या नामांस लागत नाहींत, त्यांस सप्तमीचीं रूपें होत नाहींत. त्यांची सप्तमी शब्दयोगी अव्ययें लागून होते.



## विभक्त्यर्थक शब्दयोगी अव्ययें.

१४३ वर जे प्रत्यय सांगितले त्यांशिवाय कित्येक शब्दयोगी अव्ययें लागूनही विभक्तीचीं रूपें बनतात. हीं शब्दयोगी अव्ययें लागण्यापूर्वीं मूळच्या शब्दाचें सामान्यरूप होतें. हीं अव्ययें अशीं आहेत:—

| विभक्ति. | अव्ययें. |
|---|---|
| द्वितीया | —प्रत, लागीं, लागोनी, इ. |
| तृतीया | —करून, मुळें, सह, कडून, बराबर, करवीं, हातें, कून, सेंवें, इ |
| चतुर्थी | —प्रत, लागीं, लागोनी, प्रति, निमित्त, कारणें, करितां, साठीं, स्तव, अर्थ, इ. |
| पंचमी | —पेक्षां, वांचून विना, खेरीज, शिवाय, पासून, पासाव, विणें, वीण, परीस, इ. |
| सप्तमी | —आंत, मध्यें, मधीं, मधें, माजी, माजारीं, भीतरीं, विषयीं, विसीं, ठायीं, ठायां, इ. |



## सर्वनामें.

१४४ ज्या प्रातिपदिकांस स्वतःचा अर्थ नसून तीं दुसऱ्या प्रातिपदिकांबद्दल संज्ञांप्रमाणें योजितात, त्यांस **सर्वनामें** म्हणतात. जसें, 'तो आला' ह्यांत तो या श-

ब्दास स्वतःचा अर्थ नसून तो शब्द मनुष्य किंवा पुरुष याबद्दल संज्ञे दाखल योजिला आहे.

१४५ सर्वनामांस नामांप्रमाणें लिंग, वचन, आणि विभक्ती हीं असतात.

१४६ सर्वनामांचे पांच भेद आहेत. १ **पुरुषवाचक सर्वनामें; २ दर्शक सर्वनामें; ३ संबंधी सर्वनामें; ४ प्रश्नार्थक सर्वनामें;** व ५ **अनिर्दिष्ट सर्वनामें** किंवा **सामान्य सर्वनामें.**

१४७ पुरुषवाचक सर्वनामें दोन आहेत; 'मी' हें प्रथम पुरुष सर्वनाम व 'तूं' हें द्वितीय पुरुष सर्वनाम.

१४८ तो याच्यापुढें त्याचें नाम नसतां त्यास तृतीयपुरुषवाचक सर्वनाम म्हणण्याची चाल आहे. परंतु वस्तुतः वरील दोन सर्वनामांशिवाय सर्व प्रातिपदिकें तृतीय पुरुषींच आहेत, म्हणून त्या निराळा भेद करण्याचें कारण दिसत नाहीं.

१४९ जो बोलणारा तो प्रथमपुरुष; ज्याच्याजवळ बोलावयाचें तो द्वितीयपुरुष; व ज्याचेंविषयीं बोलावयाचें तो तृतीयपुरुष. यावरून मी व तूं यांशिवाय बाकीचीं सर्वनामें तृतीयपुरुषीं मानावीं.

१५० **पुरुषवाचक सर्वनामें** तिन्ही लिंगीं सारखींच चालतात.

१५१ **दर्शकसर्वनामें** हीं पदार्थ किंवा व्यक्ती हीं दर्शवितात म्हणजे दाखवितात, म्हणून त्यांस **दर्शकसर्वनामें** असें म्हणतात. हीं 'तो' व 'हा' अशीं दोन आहेत; लिंगांवरून प्रत्येकाचे तीन तीन भेद झाले आहेत. ते असेः—

| पु. | स्त्री. | नपुं. |
|---|---|---|
| तो | ती | तें |
| हा | ही | हें |

१५२ असा व तसा ह्या दोन सर्वनामांसही **दर्शकसर्वनामें** म्हणावें. यांचीं तिन्ही लिंगी रूपें असा, अशी, असें व तसा, तशी, तसें, अशीं होतात. यांस विशेषणें मानणें चांगलें असें कित्येकांचें मत आहे. व त्यांस **प्रकारार्थक विशेषणें** म्हणतात.

१५३ जीं सर्वनामें दर्शकसर्वनामांशीं संबंध ठेवितात, तीं **संबंधीसर्वनामें** होत; हीं जो, जी, जें, हीं आहेत.

१५४ प्रश्न करावयाचा असतां जीं सर्वनामें योजितात तीं **प्रश्नार्थकसर्वनामें** होत; हीं कोण, काय, कसा-सी-सें, कोणता-ती-तें, केवढा-ढी-ढें, किती, कितीक, हीं आहेत. यांतील शेवटच्या दोहोंस विशेषणें मानण्यास हरकत दिसत नाहीं.

१५५ ज्या सर्वनामांचें मूळ नाम स्पष्ट होत नाहीं, त्यांस **अनिर्दिष्टसर्वनामें** म्हणतात. हीं कांहींएक, कोणीएक, जोकोणी, कोणता, अमका, भलता, फलाणा, इ० आहेत. यांस **सामान्यसर्वनामें** असेंही म्हणतात. यांसही विशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं.

१५६ सर्वनामें नामाप्रमाणें विभक्ती लावून चालवितां येतात. परंतु यांतील बरींच अनियमित आहेत. यासाठीं त्यांस विभक्ती लावून दाखवितों.

(१) मी, तिन्ही लिंगी.

| | ए. व. | अने. व. |
|---|---|---|
| सामान्यरूप | [म-मा-मज] | [आम्हा] |
| प्र. | मी | आम्ही. |
| द्वि. | मी, मला, मजला, मातें, मज | आम्ही, आम्हाला, आम्हांस, आम्हांतें. |
| तृ. | मीं, म्यां, मशीं, मजशीं | आम्हीं, आम्हांशीं. |

| | | |
|---|---|---|
| च. | मला, मजला, मातें, मज | आम्हांला, आम्हांस, आम्हांतें. |
| पं. | मजहून | आम्हांहून. |

(२) तूं, तिन्ही लिंगी.

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| सामा. | [तु-तू-तुज] | [तुम्हां] |
| प्र. | तूं | तुम्ही. |
| द्वि. | तुला इ. | तुम्हांला. |
| तृ. | तूं, त्वां इ. | तुम्हीं, इ. |

[ इत्यादि मी शब्दाप्रमाणें ]

१५७ हे दोन्हीं शब्द जेव्हां विशेषणें असतात, तेव्हां विशेष्यास विभक्ति लागली असतां त्यांचें सामान्यरूप होतें. व पुष्कळदां विशेष्याची विभक्ति त्यांस लागते; उदा० 'मज चाकरास काय पाहिजे?'

'तुह्मीच मग आतरास्तव मला सुदीना विका'। मोरोपंत.

'आम्हां कुळब्यांना कष्ट केले पाहिजेत,' 'आम्हीं पुरुषांनीं कष्ट करावे, व तुम्हीं बायकांनीं रिकामें बसून खावें,' इ०.

(३) तो सर्वनाम, पु.

| | | |
|---|---|---|
| प्र. | तो | ते. |
| द्वि. | तो, त्यास, त्याला<br>त्यातें, त्याजला | ते, त्यांस, त्यांला, त्यांतें,<br>त्यांना, त्यांजला. |
| तृ. | त्यानें, तेणें, त्याशीं | त्याहीं, त्यांनीं. त्यांशीं. |
| च. | त्यास, त्याला, त्यातें, त्याजला. | त्यांस,त्यांला,त्यांतें,त्यांजला. |
| पं. | त्याहून, त्याजहून, | त्यांहून, त्यांजहून. |

(४) जो सर्वनाम, पुल्लिंगी.
(तो सर्वनामाप्रमाणें.)

१५८ ती, जी, हे स्त्रीलिंगी शब्द 'नदी' शब्दाप्रमाणें चालतात; व तें व जें हे नपुंसकलिंगी शब्द 'भांडें' शब्दाप्रमाणें चा-

लतात; कवितेंत कधीं कधीं त्या व ज्या यांचे जागीं 'तया,' 'जया' अशीं सामान्यरूपें होऊन तयास, तयातें, जयातें, तयांना, जयांना अशीं रूपें होतात; व स्त्रीलिंगी तयेनें, तयेला, जियेतें, जियेनें, जियेला, अशीं रूपें होतात.

(५) हा सर्वनाम.

पुल्लिंग व नपुं०;—याचीं एकवचनी सामान्यरूपें 'ह्या' व 'या' आणि अनेकवचनीं 'ह्यां' व 'यां' हीं आहेत. यांचे पुढें क्वचित् 'ज' हें अक्षर येतें. एरव्हीं हा शद्ब आकारान्त पुल्लिंगी शद्बाप्रमाणें चालतो. स्त्रीलिंग; सामान्यरूपें एकवचनीं 'हीं' व 'ई' व अने० ह्यां व यां अशीं दोन होतात. बाकी हा शद्ब यथासंख्य ती या सर्वनामाप्रमाणें चालतो.

(६) कोण व काय.

कोण हें सर्वनाम पुल्लिंगी व स्त्रीलिंगी आहे. काय हें नपुंसकलिंगी आहे. कोण याचें रूप कवितेंत 'कवण' असें आढळतें.

(७) कोण, पु. व स्त्री.

| | | |
|---|---|---|
| प्र. | कोण | कोण. |
| द्वि. | कोण, कोणास | कोण, कोणांस, इ. |
| तृ. | कोणीं, कोणाशीं | कोणीं, कोणांशीं. |
| च. | कोणास, इ. | कोणांस, इ. |
| | इ. | इ. |

१५९ काय शद्बास प्रथमेचीं मात्र रूपें आहेत; बाकीच्या विभक्तींचीं रूपें करणें असल्यास कसा या शद्बाच्या रूपांचा उपयोग करितात.

१६० बाकीचीं सर्व सर्वनामें त्यांच्या त्यांच्या स्ववर्गीय नामांप्रमाणें चालतात.

१६१ ह्या बहुतेक सर्वनामांचा विशेषणाप्रमाणें उपयोग होतो. यामुळें यांस सर्वनामें ह्मणावें किंवा विशेषणें म्हणावें याचा निर्णय, उपयोगावरून करावा.

## विशेषणें.

१६२ जीं प्रातिपदिकें दुसऱ्या प्रातिपदिकांच्या अर्थाला मर्यादित करितात, त्यांस विशेषणें असें म्हणतात; जसें, 'घोडा' म्हटलें म्हणजे कोणताही तज्जातीय प्राणी; परंतु 'काळा घोडा' म्हटलें, कीं अमुकच अशी मर्यादा झाली.

१६३ विशेषणांची मुख्य खूण अशी आहे, की यांस विभक्ति वगैरे लागल्याखेरीज दुसऱ्या प्रातिपदिकांशीं त्याचा अन्वय होतो. वस्तुतः विशेषण व नाम यांचा भेद इतकाच, कीं नामाचा स्वतंत्र रीतीनें उपयोग होतो, परंतु विशेषणांचा अन्वय दुसरे नामाकडे असतो. यावरून विशेषणांचा स्वतंत्र रीतीनें उपयोग असला, तर त्यांस नाम म्हणावें; उदा. 'पृथ्वी **गोल** आहे,' यांत '**गोल**' हें विशेषण आहे. परंतु 'आकाशांत असंख्य '**गोल**' फिरतात,' या वाक्यांत तोच शब्द नाम आहे. 'गरीबास कोण ओळखितो,' येथें गरीब नाम आहे, परंतु 'गरीब मनुष्याची दया येते,' यांत गरीब हें विशेषण आहे.

> 'विठ्ठलावांचून **आणीक** जे वाणी
> नायकें मी कानीं आपुलीया ।
> तुका ह्मणें माझें जाणें तीची हीन,
> **आणीकाच्या** चित्त नाहीं बोला ॥' तुका.

यांत पहिलें 'आणीक' विशेषण असून दुसरें नाम आहे. याप्रमाणें '**गोऱ्याला काळें** चांगलें शोभतें' '**शाहाण्यास** मार शब्दांचा' इ.—वाक्यांत समजावें.

१६४ ज्या नामाचे अर्थाला विशेषण मर्यादित करितें, त्या नामास त्या विशेषणाचें विशेष्य असें ह्मणतात. जसें 'चांगला मुलगा' यांत 'मुलगा' हें विशेष्य होय.

१६५ विशेषणांस केव्हां केव्हां लिंग, वचन, व विभक्ति यांचा विकार होतो.

१६६ ज्या विशेषणांस पुल्लिंगी 'आ' हा प्रत्यय लागतो, त्यांना तिन्ही लिंगें लागतात; व विशेष्याचें अनेकवचन झालें, अथवा त्यास विभक्ति लागली, तर या विशेषणांचें सामान्यरूप होतें; जसें, 'काळ्या घोड्यास,' 'शहाण्या माणसानें,' इ०.

१६७ या विशेषणांचे तिन्ही लिंगी प्रत्ययः—

| एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|
| आ, ई, ए. | ए, या, ई. |

१६८ सामान्यरूप तिन्ही लिंगी व दोन्ही वचनीं सारखेंच असतें. तें विकल्पें 'या' किंवा 'ए' असतें. उदा. 'चांगल्या किंवा चांगले स्त्रीस किंवा स्त्रियांस,' 'चांगल्या किंवा चांगले फळास किंवा फळांस,' इ०.

१६९ कवितेंत अकारांत विशेषणेंही कधीं कधीं वचन व विभक्ति यांच्या योगानें बदलतात; जसें,

'संसाराब्धि-निमग्न जे जन तयां ज्याचीं पदें पारदें,
योगींन्दें अवलोकिलेंहि करुणालीलालयें नारदें,'
मोरोपंत.

१७० कवितेंत अकारान्त विशेषणास कधीं कधीं सामान्यरूपही होतें. याचें सामान्यरूप 'आ' होतें; जसें, 'सुंदरा नेत्रांनीं:'—
'रडे, जाय तो राघवा लोकपाळा'
वामन.

१७१ विशेषणांचे **गुणविशेषणें** व **संख्याविशेषणें**, असे दोन भेद आहेत; जीं विशेषणें गुण दाखवितात, तीं **गुणविशेषणें**, व जीं संख्या दाखवितात तीं **संख्या विशेषणें**. जसें, 'उंच मनुष्य' यांत 'उंच' हें गुणविशेषण; व 'चार मनुष्य' यांत 'चार' हें संख्याविशेषण.

१७२ **संख्याविशेषणास** लिंग, वचन व विभक्ति यांच्या योगानें विकार होत नाहीं; जसें, 'अकरा पुरूष,' 'अकरा बायका,' 'अकरा मुलांनीं,' इ०.

१७३ सर्व **संख्यावाचकविशेषणांचा** नामांप्रमाणें प्रयोग होतो; जसें, एकास, एकानें, इ०.

१७४ दोन, तीन व चार या शब्दांचीं सामान्यरूपें यथाक्रमें दोहों, तिहीं, चोहों, अशीं होतात; हे शब्द नेहमीं अनेकवचनी होत.

१७५ दोन, तीन, व चार हे शब्द संख्यावाचक विशेषणें असूनही विशेष्यास विभक्ति लागली असता यास विकल्पेंकरून सामान्यरूप होतें. जसें, 'दोन किंवा दोहों मनुष्यांस,' 'चार किंवा चोहों जणांस,' इ०.

१७६ दोन, तीन, व चार हे शब्द मनुष्यांस लाविले असतां किंवा त्या संख्या एकवार सांगून पुनः सांगावयाच्या असतां त्यांचीं अनुक्रमें दोघे, तिघे, व चौघे अशीं रूपें होतात. जसें, 'त्या गृहस्थास 'दोन' किंवा 'दोघी' मुली आहेत,' 'त्यास चार पुत्र झाले, पण चौघेही मूर्ख,' इ०.

१७७ दोघे, तिघे, व चौघे यांचा नामांप्रमाणें प्रयोग होऊन त्यांस नामांप्रमाणें विभक्तिप्रत्यय लागतात. व त्यांस लिंगभेद होतो. त्यांस स्त्रीलिंगी 'ई' व नपुंसकलिंगी 'एं' हा प्रत्यय लागतो; जसें, दोघी, दोघें, इ. यांचीं पुल्लिंगी व नपुंसकलिंगी सामान्यरूपें दोघां, तिघां व चौघां अशीं होतात; व स्त्रीलिंगामध्यें सामान्यरूपें मुळच्या रूपाप्रमाणेंच असतात.

१७८ नऊ याचें सामान्यरूप नवां असें होतें.

१७९ संख्यावाचक विशेषणांस 'वा' हा प्रत्यय लागून **क्रमवाचकविशेषणें** होतात; जसें पांचवा, सातवा, इ. परंतु एक,

दोन, तीन, व चार, यांचीं क्रमवाचक रूपें पहिला, दुसरा, तिसरा व चौथा अशीं आहेत.

१८० **क्रमवाचकविशेषणांचाही** नामांप्रमाणें उपयोग होतो. व त्यांस लिंग, वचन, विभक्ति, इत्यादि विकार तत्सदृश नामांप्रमाणें होतात. पुष्कळ विशेषणें सिद्ध शब्द असून पुष्कळ विशेषणें साधित शब्दही असतात. त्यांचा विचार साधित शब्दांखालीं केला आहे.

१८१ **संबंधीविशेषणः**—नामास 'चा-ची-चें' हे प्रत्यय जोडिल्यानें संबंधीविशेषणें होतात. यांना लिंगादि विकार होतात; उदा० 'रामाचा घोडा,' 'रामाचें घर,' 'रामाच्या घराचें दार,' इ०.

१८२ या विशेषणास षष्ठी विभक्ति म्हणतात. परंतु यांचा क्रियेशीं कांहीं संबंध नसतो, व यांस विशेषणांचे सर्व धर्म असतात; शिवाय हे शब्द संस्कृतांतील 'ईय' या विशेषणाचे प्रत्ययांनीं झाले आहेत. म्हणून यांस विशेषणें म्हणावें हें जास्त चांगलें दिसतें.

१८३ ह्या विशेषणाचा प्रत्यय जो 'चा' तो लागतांना नामाचें सामान्यरूप होतें. हा प्रत्यय क्वचित् 'ला' असाही आढळतो. 'आपण' सर्वनामास 'ला' लावून 'आपला असें रूप होतें. मी व तूं या सर्वनामांचीं एकवचनीं संबंधी विशेषणें 'झा' प्रत्यय लागून 'माझा-झी-झें,' 'तुझा झी झें' अशीं होतात.

१८४ स्थलवाचक नामें असतां हा प्रत्यय विकल्पें करून सामान्यरूप न होतां लागतो; जसें 'घराचा;' 'घरचा' 'हालंडचा,' 'इंग्लंडाचा,' 'शहराचा,' 'शहरचा,' इ०.

१८५ कालवाचक नामें असतां वेळ, सकाळ, दुपार संध्याकाळ इत्यादि नामांस सामान्यरूपें होत नाहींत; परंतु वर्ष, महिना, आठवडा यांस होतात; जसें, वेळचा, सकाळचा, संध्याकाळचा, वर्षाचा, आठवड्याचा, इ०. परंतु दिवसाचा, दिवसचा, अशीं दोन्हीं रूपें होतात.

१८६ स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्ययें व शब्दयोगी अव्ययें यांनाही हा प्रत्यय लागून विशेषणें होतात; उदा० वरचा, खालचा, तेव्हांचा, केव्हांचा, आतांचा, मधांचा, आंतला इ०.

१८७ शब्दयोगी अव्ययें या प्रत्ययानें युक्त असतां त्यांचे योगानें मागील शब्दाचे सामान्यरूप होतें; जसें, 'झाडावरचा,' 'दारावरचें,' 'देशांतलें,' इ०

१८८ सप्तमीचा प्रत्यय जो 'ई' तो लागल्यानंतर हा प्रत्यय लागून स्थलवाचक विशेषणें होतात; जसें, घरींचा, दारींचा, देशींचा, अंतरींचा, इ०.

१८९ क्रियापदाचीं विध्यर्थी नामें जीं करावें, बोलावें इ०, व वर्तमानकाळचीं नामें करणें, बोलणें, इ०, यांस हा प्रत्यय लागून विशेषणें होतात; जसें 'करावयाचें,' 'करण्याचें,' 'बोलावयाचें,' 'बोलण्याचें' इ०.

१९० परभाषेंतील विशेषनामें असल्यास क्वचित् सामान्यरूप न करितांही विशेषणें करितात; जसें, 'टॉमची टोपी,' 'बेनचें व्याकरण,' 'कूकचें ज्योतिःशास्त्र,' 'टाडची भूमिति,' 'अकबर चा मुलगा' इ०.

१९१ परंतु हीं परभाषेंतील नामें विशेष प्रचारांतलीं असल्यास सामान्यरूप करणेंच प्रशस्त होय; जसें, 'अकबराचा मुलगा सेलीम' औरंगजेबाचा शत्रु शिवाजी' इ०.

१९२ भूतकाळाच्या ला, ली, लें प्रत्ययान्त जें विशेषण, त्यालाही

हे प्रत्यय लागून 'केल्याचें,' 'गेल्याचें,' 'बोलल्याचें' इ० विशेषणें होतात.

१९३ कित्येक विशेषणें शब्दांपुढें आलीं असतां त्या शब्दांचें सामान्यरूप होतें; तीं सारखा, तुल्य, सदृश, जोगा, योग्य, तोलाचा, समान, सम, उलटा, विरुद्ध, इत्यादि किंवा अशा अर्थाचीं आहेत. उदा० 'तो माझ्यासारखा आहे,' तो हरीच्या तोलाचा आहे.' इ०.

१९४ 'असा' हें सर्वनामात्मक विशेषण लागूनही क्वचित् सामान्यरूप होतें; त्यावेळीं त्याचा अर्थ 'सारिखा' असा असतो; उदा०

'केतु च्छेदुनि पार्थ द्युमणिसुताचे हरावया प्राण ।
जोडी गांडीव गुणीं शत्रुहर हरायुधा असा बाण' ।
मोरो०.

# क्रियापदविचार.

१९५ ज्या शब्दांवरून काळाच्या संबंधानें पदार्थाच्या अस्थित्वाचें किंवा कृतीचें ज्ञान होतें, त्यास क्रियापद असें ह्मणतात; जसें, जाई, धांविल, करिजे, इ०

१९६ क्रियापदांचे मूलभूत शब्द, ज्यांस प्रत्यय लागून क्रियापदें होतात, त्यांस धातू असें ह्मणतात; जसें, जा, धांव, कर, इ०

१९७ आज्ञार्थी द्वितीय पुरुषीं एकवचनाचें जें रूप तें धातूचें रूप असें मानिलें आहे; जसें, कर, बोल, इ०. एरव्हीं धातू सांगणें म्हणजे त्यास 'णें' प्रत्यय लावून सांगतात; जसें, करणें, बोलणें इ०.

१९८ कांहीं क्रियापदें सिद्ध म्हणजे मुळचींच असतात, व कांहीं दुसऱ्या क्रियापदांवरून किंवा इतर शब्दांवरून साधिलेलीं असतात; जसें, जाणें, करणें, इ० हीं सिद्ध किंवा शुद्ध क्रियापदें होत; व जाववणें, मारविणें, माणसाळणें, डोकावणें, इ० हीं साधित क्रियापदें होत.

१९९ क्रियापदांचे मुख्य भेद दोन आहेत; एक **सकर्मक** क्रियापदें व दुसरीं **अकर्मक** क्रियापदें. ज्यांस कर्म असतें तीं **सकर्मक** व ज्यांस तें नसतें तीं **अकर्मक**. जसें, मारितो, खातो, हीं सकर्मक, व जातो, निजतो, बसतो, हीं अकर्मक होत.

२०० धात्वर्थ जो व्यापार म्हणजे क्रिया, तिचें फळ ज्या पदार्थावर घडतें, तो पदार्थ त्या क्रियापदाचें **कर्म** होय. जसें, 'वाघ हरीण मारितो' या उदाहरणांत मार धातूचा अर्थ प्राणवियोग करणें; त्याच्या व्यापाराचें फळ 'हरीण' या शब्दावर घडतें म्हणून तो शब्द **कर्म** होय.

२०१ वर जें कर्म याचें लक्षण सांगितलें तें सर्वदा अक्षरशः उपयोगीं पडेल असें नाहीं. कारण 'मी चित्र पहातों' 'तो गाणें गातो' इ० उदाहरणांत 'पहाणें,' 'गाणें' यांत क्रियेच्या व्यापाराचें अमुक फळ, 'चित्र' व 'गाणें' यांवर असतें, हें स्पष्टपणें सांगता येणार नाहीं.

२०२ यावरून ज्या धातूंवरून फलविशिष्ट व्यापाराचा बोध विवक्षित असतो, ते **सकर्मक** होत; व ज्यांवरून केवळ व्यापाराचाच बोध विवक्षित असतो, ते **अकर्मक** होत.

२०३ कित्येक धातु अर्थावरून कधीं कधीं सकर्मक असतात व कधीं कधीं तेच अकर्मकही असतात. जसें 'तो काम करितो'

व 'मला मळमळ करितें' यांत पहिल्या उदाहरणांत 'कर' धातु सकर्मक व दुसऱ्यांत तोच अकर्मक आहे. तसेंच 'तो पाणीं भरितो व 'त्यास हींव भरतें' त्यांतही 'भर' धातु दोन प्रकारचा आहे. अशा ठिकाणीं त्या त्या वाक्यांतील अर्थावरून निरनिराळ्या ठिकाणीं त्याच धातूस सकर्मक किंवा अकर्मक म्हणावें.

२०४ त्याच धातूस म्हणजे एकाच प्रकारच्या अक्षरांनीं लिहिलेल्या धातूस असें समजावें; कारण वस्तुतः अर्थ जर निराळा झाला, तर शब्दघटिका एक असली तरी तो धातु निराळाच मानिला पाहिजे.

२०५ अशा प्रकारच्या धातूंस **उभयविध** धातू म्हणण्याची चाल पडली आहे; म्हणजे जे धातू सकर्मक व अकर्मक दोन्ही प्रकारचे असतात ते. जसें, 'त्यानें आपलें घर **मोडलें** (स०)'व त्याचें घर **मोडलें** (अक०)' इ०. परंतु हा भेद अर्थावरून होतो. जो धातु सकर्मक आहे, तो त्याच वेळेस अकर्मक आहे, असें कधींही होणार नाहीं. या साठीं धातु सकर्मक किंवा अकर्मक ज्याप्रमाणें असेल, त्याप्रमाणें त्यास नांव द्यावें. तोच अन्यत्र अकर्मक होणारा आहे, एवढ्यावरून त्यास **उभयविध** असें निराळेंच एक नांव देणें बरोबर नाहीं. व तशी एकादी संज्ञा व्याकरणांत असण्याचें विशेष कारणही दिसत नाहीं.

२०६ धातु सकर्मक किंवा अकर्मक आहे, हें ओळखण्याविषयींचे नियम देण्याची खटपट कित्येक व्याकरणकारांनीं केली आहे, परंतु ती व्यर्थ होय. कारण सकर्मक धातूची अमुक एक खूण, व अकर्मक धातूची अमुक खूण असें रूपावरून ठरविणें अशक्य होय. धातु सकर्मक किंवा अकर्मक असतो, तो अर्थावरून असतो. यासाठीं जेथें धातूच्या रूपास 'काय?' हा प्रश्न करून सरळ उत्तर येईल, तेथें धातु सकर्मक मानावा, व जेथें तसें उत्तर न येईल तेथें तो अकर्मक समजावा. मागें सांगितलेंच आहे कीं, एकदा धातु एकादे वाक्यांत सकर्मक असेल, त्याचाच प्रयोग दुसऱ्या वा-

क्यांत अर्थ फिरवून केला कीं, तो अकर्मक होईल. 'तो काम करितो,' 'व' मला मळमळ करते' या वाक्यांत एकच 'कर' धातु दोन प्रकारचा आहे. तेव्हां 'काय?' ह्या प्रश्नास उत्तर मिळतें कीं नाहीं, हे पहाण्याखेरीज धातु सकर्मक आहे अथवा अकर्मक आहे हें ओळखण्यास दुसरा मार्ग नाहीं.

२०७ क्रियापदास वागविणारा शब्द, म्हणजे ज्याचेवर क्रियापद अवलंबून असतें, तो **कर्ता** होय; जसें, 'रामा काम करितो.' या वाक्यांत 'करितो' हें क्रियापद 'रामा' या शब्दाचे धोरणाप्रमाणें चालतें. कारण 'रामा' या शब्दाचें जें लिंग, जें वचन, व जो पुरुष, तेंच लिंग, तेंच वचन, व तोच पुरुष त्या क्रियापदाचाही असेल. ह्मणून 'रामा' हा शब्द कर्ता होय.

२०८ यावरून जो प्रत्यक्ष क्रिया करितो तोच कर्ता असतो असा अर्थ नाहीं; उदाहरणार्थ 'माझ्यानें काम करवत नाहीं' या वाक्यांत काम करणारा जरी 'मी' ह्या सर्वनामानें प्रदर्शित व्यक्ति आहे, तरी 'करवत नाहीं' या क्रियेचें नियमन करणारा शब्द काम आहे. कारण 'काम' या शब्दाचें अनेक वचन 'कामें' असें केलें असतां 'करवत नाहींत' असें क्रियापदाचेंही अनेकवचन करावें लागेल. यावरून व्याकरणांतला '**कर्ता**' व प्रत्यक्ष क्रिया करणारा यांतला भेद दिसून येईल.

२०९ कित्येक धातूंस जसें कर्म नसतें व ते अकर्मक असतात, त्याचप्रमाणें कित्येक धातूंस कर्ता नसतो; त्यांस **अकर्तृकक्रियापदें** ह्मणतात. जसें उजाडणें, मळमळणें, समजणें, सांजावणें, फावणें, इ०

२१० अशा क्रियापदांचा 'मळमळ होते,' 'उजेड होतो' इत्यादि रीतीनें पदच्छेद करून मग त्यांत कर्ता व क्रियापद मानण्यास चिंता नाहीं.

२११ मूळ धातूंवरून क्रियापदाचीं निरनिराळीं रूपें सिद्ध होण्यासाठीं धातूंस प्रत्यय लागतात; या प्रत्ययांस **आख्यात प्रत्यय** असें म्हणतात. हे प्रत्यय लावण्याचे पूर्वींचें जें क्रियापदाचें रूप त्यास धातू असें म्हणतात. व प्रत्यय लागून झालेल्या रूपास क्रियापद असें म्हणतात.

२१२ आख्यात प्रत्ययांवरून केव्हां कर्त्याचा व केव्हां कर्माचा बोध होतो; अथवा कित्येक ठिकाणीं दोहोंचाही बोध होत नाहीं. त्या मानानें त्यांस **कर्तरि, कर्मणि,** अथवा **भावी** आख्यातप्रत्यय म्हणतात; उदा० 'करि' 'करितो' 'धांवतो' यांतील प्रत्यय कर्तरि आहेत; 'करिजे' 'केला' 'करावा' यांतील **कर्मणि** आहेत; व 'उठिजे' 'जाईजे' 'निजावें' यांतील **भावी** आहेत.

२१३ कर्तरि व कर्मणि हे शब्द संस्कृतांतील सप्तमीचीं एक वचनें असून ह्यांचा अर्थ 'कर्त्याचे अर्थीं' व 'कर्माचे अर्थीं असा आहे. संस्कृतांत 'भावी' याबद्दल 'भावे' असा शब्द येतो. परंतु सध्या मराठींत 'भावी' हा शब्दच प्रचारांत असल्यामुळें तोच कायम ठेविला आहे. यास आतां विशेषण मानावें म्हणजे झालें.

२१४ क्रियापदांस कर्तरि, कर्मणि, किंवा भावी आख्यातप्रत्यय लागले असतील, त्याप्रमाणें त्यांस **कर्तरि क्रियापदें, कर्मणि क्रियापदें,** किंवा **भावी क्रियापदें** असें म्हणावें. व तीं तीं क्रियापदें वाक्यांत असतील; त्याप्रमाणें वाक्यास **कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग** किंवा **भावीप्रयोग** असें म्हणतात.

२१५ प्रयोग रचनेच्या संबंधानें ज्यास्त विचार वाक्य रचनेच्या विचारांत आहे.

२१६ क्रियापदाचें रूप क्रियापद कर्तरि, कर्मणि अ-

थवा भावी असण्यावरून जसें फिरतें, त्याचप्रमाणें त्याचें रूप **पुरुष, वचन, काळ** व **अर्थ**, व क्वचित् **लिंग** यांवरूनही फिरतें.

२१७ क्रियापदांतील आख्यात प्रत्ययाचा अन्वय जेव्हां मी किंवा आम्ही यांकडे असतो, तेव्हां तो प्रथम पुरुष; तूं किंवा तुम्ही यांकडे असतो तेव्हां द्वितीय पुरुष, व या दोहोंकडे नसून दुसऱ्याच शब्दांवर असतो, तेव्हां तृतीय पुरुष; जसें, 'मी किंवा आम्हीं असतों,' प्रथम पुरुष; 'तूं असतोस, किंवा तुम्ही असतां,' द्वि. पु.; व 'तो असतो, किंवा ते असतात,' तृ. पु.

२१८ क्रियापदांचें रूप वचनावरून फिरतें. परंतु ही गोष्ट क्रियापदें चालवितांना स्पष्ट होणार आहे, म्हणून जास्त विवरण करण्याची गरज नाहीं.

२१९ काळ तीन आहेत, **वर्तमान, भूत** आणि **भविष्य**. विवक्षित वाक्य बोलतांना जो काळ असतो, तो **वर्तमानकाळ;** त्याचे मागचा जो काळ तो **भूतकाळ;** आणि त्याच्या पुढील जो काळ तो **भविष्यकाळ**. यांचीं उदारहणें:—

'मत्सुत, मद्वनिता, हें **जाणें** मी परिजनासि कळवाया।
ऐसें निष्ठुर **वदलों** तुमची शंका अशेष पळवाया॥'
'ती त्यासि **म्हणे**, पूर्वी एकें मुनिनें **विचारिलें होतें**।
जें त्यातें मत्तातें कथिलें मद्गुन मागतें हो तें॥'
मोरोपंत.

'अदितिच्या उदरीं हरि **जन्मला**, म्हणुनि ये समयीं **कळलें** मला।
त्रिभवराज्य समस्त **हरील** रे, यशही होईल विस्तृत अस्त रे॥'
वामन.

२२० क्रियापद उच्चारण्याच्या वेळचा जो काळ तो क्रियापदाचा काळ. ही गोष्ट मुख्य क्रियापदाच्या संबंधानें योग्य आहे. परंतु क्रियापद संयुक्त असल्यास गौण भागाचा काळ प्रधान भागाच्या संबंधानें वर्तमानादि असतो. उदा० 'काल तूं आलास तेव्हां मी निजणार होतों.' यांत 'निजणार' या भविष्यकाळवाचक विशेषणानें दाखविलेला काळ 'होतों.' या क्रियापदाचे संबंधानें भविष्य होय; वाक्योच्चारणाचे वेळेचे संबंधानें नव्हे; याचप्रमाणें 'उद्यां तूं येशील तेव्हां मी निजलों असेन,' 'तो जेवून बाहेर गेला' इत्यादि वाक्यांत समजावें.

२२१ संयुक्त क्रियापदाचे काळाचे संबंधानें विशेष विचार पुढें केला आहे.

२२२ कित्येक प्रसंगीं क्रियापदाचे रूपांवरून काळाचा बोध न होतां आज्ञा, उपदेश, प्रार्थना, रीत, शक्यता, संकेत इ० गोष्टींचा बोध होत असतो. अशा रूपांस **अर्थ** अशी संज्ञा आहे. हे अर्थ दोन आहेत;—
१ आज्ञार्थ किंवा विध्यर्थ; व २ संकेतार्थ.

२२३ क्रियापदाचीं रूपें ज्यांत फिरतात, असे हे एवढेच दोन अर्थ आहेत. जेव्हां क्रियापदावरून वरील अर्थाचा बोध होत नाहीं, तेव्हां त्यास **स्वार्थ** असें म्हणतात. स्वार्थ याचा अर्थ क्रियापदाचें स्वतःचें किंवा स्वाभाविक रूप.

२२४ जेव्हां क्रियापदाच्या रूपांवरून आज्ञा, उपदेश, प्रार्थना, आशीर्वाद, रीत, कर्तव्य, संभव, शक्ति, इत्यादि अर्थ उत्पन्न होतात, तेव्हां **आज्ञार्थ** किंवा **विध्यर्थ** होतो. क्रियापद कर्तरि असलें म्हणजे आज्ञार्थ होतो, व तें कर्मणि किंवा भावी असलें म्हणजे विध्यर्थ होतो.

उदाहरणें–आज्ञार्थ.—

'मुला, हें काम **कर**,' 'ते **जावोत**;' 'देवा, राणीचें रक्षण **कर**.'
'**घेईं घेईं** माझे वाचे गोड नाम विठोबाचें.'
'**धांवें पावें** या अनंता, सर्वसाक्षी कृपावंता.' तुका०.
'**जा**, मांग पित्याला,' 'म्यां **सजिलें** वृषपर्व पुर.' मोरो०.
'हळु हळु **झडो** अहंता मन्ममनीं, वाधिकां जशी शेंडी।
**केंडू** विवेक विषया निस्पृहजन वस्तुतें जसा केंडी ॥'

मोरोपंत.

विध्यर्थ:—

'त्यानें **जावें**,' 'म्यां काम **करावें**,' 'मुलांनीं विद्या **शिकावी**,' 'त्यानें लहानपणीं **रडावें**.'

'**कांपावें** मन कुजनीं वृद्धपणीं कांपतें जसें शिर तें।
सत्संगांत **शिरावें**, बाळक जननीकडे जसें शिरतें।'
'सत्यानें **जोडावें** मुज्ञें, धर्मासि तिळ न **सोडावें**।'

मोरोपंत.

२२५ या अर्थांवरून कोणच्याही विवक्षित काळाचा बोध होत नाहीं, म्हणून यांस काळ नाहींत, व आज्ञार्थीं किंवा विध्यर्थीं क्रियापद असल्यावर काळ सांगण्याची गरज नाहीं.

२२६ जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून अमुक क्रियेची सिद्धि अमक्या क्रियेवर अवलंबून आहे असा सांकेतिक अर्थ निघतो, तेव्हां त्यास **संकेतार्थ** म्हणतात; उदा० 'तो जाता तर मी जातों,' इ०.

२२७ क्रियापदाचे रूपावरून हा अर्थ वर्तमानकाळीं मात्र होतो. भूत व भविष्यकाळीं या अर्थावरून क्रियापदाच्या रूपांत बदल होत नाहीं. त्याकाळीं वाक्यांत 'जर, तर' हे शब्द घालून

तो अर्थ करितात; उदा० 'तो गेला तर मी जाईन;' 'तुम्ही मला औषध द्याल तर मी बरा होईन,' इ०.

२२८ यासाठीं भूतकाळीं व भविष्यकाळीं क्रियापदाचे रूपास हा अर्थ नाहीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

२२९ क्रियापदास कधीं कधीं लिंगप्रयुक्त विकार होतो. पण सर्वच क्रियापदें लिंगाप्रमाणें बदलत नाहींत. उदा० जातों, जाता, गेला, इ० रूपें जशीं लिंगभेदानें बदलतात तशीं जाई, जाईल, करो, करी, वसे, धांवसी, इ० रूपें बदलत नाहींत.

२३० याचा साधारण नियम असा आहे कीं, जीं क्रियापदें संस्कृत क्रियापदांपासून झालीं आहेत, त्यांस लिंगविकार होत नाहीं; परंतु जीं संस्कृत कृदंतांवरून म्हणजे धातुसाधित विशेषणांवरून झालीं आहेत, त्यांस तो विकार होतो.

२३१ पुढील विवरणावरून दिसून येईल कीं, चालू भाषेंतला वर्तमानकाळ, भूतकाळ व संकेतार्थ, यांचीं रूपें संस्कृतांतील विशेषणांवरून झालीं आहेत, म्हणून तीं लिंगांवरून फिरतात. परंतु बाकीच्या काळांचीं रूपें फिरत नाहींत.



## क्रियापद चालवणें.

२३२ धातूस आख्यात प्रत्यय लावून निरनिराळे पुरूष, काळ, अर्थ वगैरे करून दाखविणें, यास **धातूचें किंवा क्रियापदाचें चालविणें** असें म्हणतात.

२३३ हे आख्यात प्रत्यय लागतांना मूळधातूंस केव्हां केव्हां विकार होऊन नामांच्या सामान्यरूपाप्रमाणें रूप बनतें; या धातूच्या सामान्यरूपास **अंग** अशी संज्ञा आहे.

२३४ हे काळांचे वगैरे सर्व प्रत्यय लागण्यापूर्वी धातूचा अंत्यस्वर व उपान्त्यस्वर (म्हणजे अंत्याक्षराच्या मागील अक्षराचा स्वर) दीर्घ असल्यास ऱ्हस्व होतो; उदा० नीघ, निघतो, निघाला, निघेल; भी, भितो, भिईल इ०.

२३५ आख्यात प्रत्यय; वर्तमानकाळ, कर्तरिप्रयोगः—

| | ए. व. | अ व. |
|---|---|---|
| प्रथम पुरूष | ई, एं. | ऊं, ओं. |
| द्वितीय ,, | सि. | आं. |
| तृतीय ,, | इ, ए, | ती. |

२३६ हे प्रत्यय संस्कृतांतील आख्यात प्रत्ययांवरून बालभाषेच्या द्वारें सिद्ध झाले आहेत. संस्कृतांतील वर्तमानकाळाचे परस्मैपदी* प्रत्यय असे आहेत :—

| | ए. व. | द्वि. व. | ब. व. |
|---|---|---|---|
| प्र. पु. | मि. | वस | मस् |
| द्वि. पु. | सि | थस् | थ. |
| तृ. पु. | ति | तस् | न्ति. |

२३७ यांची उदाहरणें :—हस् धातु.

प्र. पु. • हसामि हसावः हसामः

---

* संस्कृतांतील आख्यातप्रत्यय दोन प्रकारचे आहेत, एक परस्मैपदी व दुसरे आत्मनेपदी. कित्येक धातूंस दोन्हीं प्रत्यय लागून रूपें होतात; परंतु कित्येकांस फक्त एकाच पदाचे प्रत्यय लागतात.

| | | | |
|---|---|---|---|
| द्वि. पु. | हससि | हसथः | हसथ. |
| तृ. पु. | हसति | हसतः | हसंति. |

२३८ बालभाषेंतील रूपें (या भाषेंत द्विवचन नाहीं):—

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | हसम्मि | हसम्म. |
| द्वि. पु. | हससि | हसह. |
| तृ. पु. | हसदि, हसइ | हसंति. |

टीप.—हीं रूपें वर दिलेल्या वर्तमानकाळाचे आख्यात प्रत्ययांशीं ताडून पाहावीं.

२३९ प्रथम व तृतीय पुरुषाचे एकवचनी प्रत्यय 'एं' व 'ए' हे आत्मनेपदी प्रत्ययांवरून आले आहेत.

२४० हे प्रत्यय लावण्याचे संबंधानें लिंगविचारांत सांगितलेले प्रत्यय लावण्याचे नियम ध्यानांत ठेवून आणखी खालचे नियम ध्यानांत ठेवावे.

(१) ईं व ई हे प्रत्यय अकारान्त धातूंस लागतांना पररूपसंधी होतो.

(२) अकारान्त सर्व अकर्मक*धातूंस तृतीयपुरुषीं एकवचनीं 'ए' प्रत्यय लागतो.

---

* सकर्मक व अकर्मक म्हटलें, यावरून जे धातु अर्थावरून सकर्मक व अकर्मक दोन्ही प्रकारचे असतात, त्यांचीं रूपें कशीं होतात हा प्रश्न उत्पन्न होईल. त्याचा नियम असा आहे कीं, ते धातु मागाहून जरी अर्थावरून सकर्मक किंवा अकर्मक झाले, तरी त्यांस त्यांचे मुळच्या अर्थावरून सकर्मक किंवा अकर्मक म्हणावें. उदा० 'मी काम करितों,' व 'मला मळमळ करते,' या वाक्यांत 'कर' धातु एकदां सकर्मक व एकदां अकर्मक जरी आहे, तरी तो मुळचा सकर्मक असल्यामुळें येथें तो तसाच समजावा. परंतु द्वितीयपुरुषीं व तृतीयपुरुषीं जो सकर्मक

[पुढें चालू]

(३) धातु अकारान्त नसून त्याचा अंत्यस्वर जर 'आ,' 'ए' किंवा 'ओ' असेल, तर तो अकर्मक असतांही ई प्रत्यय लागतो.

(४) कित्येक धातु सकर्मक असतांही त्यांस 'ई' प्रत्यय न लागतां 'ए' प्रत्यय लागतो; ते धातुः—उमज, ओक, उतर, घड, खेळ, झगड, झोंब, प्रसव, पसव, पोंच, पाव, आंचव, बोल, भूल, मूत, म्हण (भूतकाळ म्हणाला) वी, विसंब, ले, विसर, शीक, शिव, समज, स्मर, हग, हुंग, हुक, इ०. या धातूंस उमजधातूचा गण असें म्हणावें.

(५) याचप्रमाणें आचर, उतर, भुंक, धू, नेस, पढ, पांघर, पी, ले, शिकर, हर, इत्यादी धातूंस विकल्पेंकरून 'ई' व 'ए' लागतात; यांस आचरधातूचा गण असें म्हणावें.

(६) सकर्मकधातु अकारान्त असतां त्यास आख्यात प्रत्यय लागतांना तृतीयपुरुषीं बहुवचनीं व द्वितीयपुरुषीं एकवचनीं 'इ' आगम होतो; जसें, करितो, करिसी, इ० परंतु उमजगणांतील धातूंस हा आगम होत नाहीं.

(७) सी व ती या प्रत्ययांचे अन्त्य कधीं ऱ्हस्व व कधीं दीर्घही लिहितात. सी प्रत्यय कधीं कधीं 'शी' असा होतो.

(८) प्रथमपुरुषाच्या एकवचनाचे प्रत्यय जे 'ई' व

---

[मागील पृष्ठावरून].
धातूंस प्रत्ययापूर्वी 'इ' आगम होतो, तो कर धातु अकर्मक असतांना होत नाहीं. उदा० तो काम **करितो** 'मला मळमळ **करते**' इ०. यावरून मुळचा सकर्मक धातू अकर्मक झाला असतां अकर्मकधातूंचे धर्म त्यावर येतात, हें दिसून येईल.

'एँ' त्यांचे संबंधानेंही वरीलच नियम समजावे; म्हणजे 'ईं' सकर्मकधातूंस लागतो, व 'एँ' अकर्मकधातूंस लागतो; इत्यादि.

(९) द्वितीयपुरुषाचा प्रत्यय 'आं' (हाच प्रत्यय रीति भूतकाळीं लागतो व आज्ञार्थीं हा प्रत्यय 'आ' होतो) हा लागतांना कित्येक फेरफार होतात ते:- (अ) अकारान्त, आकारान्त किंवा ईकारान्त धातूंशीं हा प्रत्यय संधिनियमाप्रमाणें संयोग पावतो; जसें, कर + आ = करा, धरा, जा, प्या, भ्या, न्या, इ०; (आ) परंतु ऊकारान्त धातूच्या 'ऊ'स 'उव' असें रूप होऊन धुवां. धुवा इ० रूपें होतात; (इ) एकारान्त व ओकारान्स धातूंस हा प्रत्यय लागतांना ते धातू अनुक्रमे ईकारान्त व ऊकारान्त होऊन मग त्यांत 'आं' किंवा 'आ' संधिनियमानें मिळतो; जसें, ध्या, ध्या, न्या, व्हा, इ०.

२४१ आतां हे प्रत्यय लावून धातूचीं रूपें करून दाखवितों:—

( १ ) करधातु, सकर्मक.

| | |
|---|---|
| मी करीं, | आम्ही करूं, करों. |
| तूं करिसी, | तुम्ही करां, अथवा करा. |
| तो करी, | ते करिती. |

( २ ) नीजधातु, अकर्मक.

| | |
|---|---|
| *मी निजें,* | *आम्ही निजूं, निजों.* |
| *तूं निजसी* | *तुम्ही निजां.* |
| *तो निजे* | *ते निजती.* |

२४२ हीं जीं रूपें सांगितलीं हीं चालू गद्यभाषेंत येत नाहींत; पण कवितेंत येतात. गद्यांत येणारीं रूपें निराळीं आहेत; परंतु

पद्यांत हीं रूपें फार येतात, यासाठीं कविता वाचणारास त्याची माहिती अवश्य पाहिजे; तसेंच संस्कृतावरून मराठी प्रत्यय कसे साधतात व इतर काळांचे प्रत्यय जे या प्रत्ययांवरून साधले आहेत ते कसे साधले आहेत, हें या रूपांवरून चांगले रीतीनें कळणार आहे; म्हणून या रूपांचें विशेष विवरण केलें आहे.

२४३ या रूपांचीं उदाहरणें:—

'साराया प्रभुची हे लीला **'गाती'** सदैव ही सुकवी।
**'सुकवी'** भवजलधींतें निरुपम सुख रसिकजनमनीं **'पिकवी'**॥

मोरोपंत.

'माझी कोण गती सांगा पंढरिनाथा
**'तारिसी'** अनाथा कव्हां मज ।
मनापासूनीयां सांगा मजप्रति,
**'पुसें'** काकुळती जीवाचीया ।

नामदेव.

अजांड शतकोटि ज्या उदरीं सर्वदा **'नांदवा'** ।

केकावली.

'सदाहि हित **'नायकों'** बहु उपाय केले करूं'

मोरोपंत.

२४४ मराठीं कवितेंत हीं रूपें येतात म्हणून सांगितलें, त्याचप्रमाणें हीं जुने मराठी लेख जे बखरी वगैरे, त्यांत ही फार अढळतात. जुन्या मराठी भाषेंतला हा वर्तमानकाळ आहे. याचें अस्तित्व चालू भाषेंत ही दिसून येतें. 'न' व 'ना' या निषेधार्थी क्रियाविशेषण अव्ययांचा उपयोग केला असतां चालू भाषेंतलीं वर्तमानकाळचीं रूपें न घालितां हींच रूपें घालितात; याचें कारण हीं रूपें व न आणि ना हीं अव्ययें मिळून एकत्र उपयोग करण्याची भाषापद्धतीच ठरली आहे. उदाहरणें:—'त्यास कांहीं बोलतां न ये'; 'त्यानें आज जाऊं **न ये'** 'त्याच्यानें **बोलवे ना;'** 'माझ्यानें हें काम **होई ना,** म्हणून मीं त्यास सांगितलें.' 'मी रामास ही गोष्ट वि-

चारली, पण तो काहींच **बोले ना.**' 'तो **येई ना,** त्याला मी काय करूं?' 'तो घटकाभर सुद्धां **बसे ना;**' मी त्यास ही गोष्ट करावयास सांगितली, पण तो **करी ना;**' 'त्यास सांगावयास न **लगे;**' 'मला तेथें कोणीच **दिसे ना** इ० इ०

२४५ न किंवा ना हीं निषेधार्थक अव्ययें नसतांही या रूपांचा कित्येक ठरींव भाषापद्धतींत व जुन्या म्हणींत उपयोग आढळतो; उदा० 'हें काम मीच करूं **जाणें;** 'कोण **जाणे** तो काय म्हणेल!' काय **म्हणें** मला गाडी पाठवा!' 'राजा **बोले** सभा **डोले,**' 'लेकी **बोले** सुने **लागे;**' इ० इ०.

२४६ हीं रूपें जरी वर्तमानकाळचीं आहेत, तरी त्यांचा प्रयोग कवींनीं पुष्कळदां भूतकाळीं केलेला आढळतो. याचीं कित्येक उदाहरणें:—

" मुनि आश्रमांत नव्हता. त्याची कन्या शकुन्तला होती;
**'पूजी'** नरदेवातें **'करि'** तेव्हां स्ववपु दीपकज्योती."
'जातां स्वर्गीं **'मिरविति'** निजगुरुसुतरत्न देव यानीं तें
**वर्णिति'** दैत्यांनें किति, किति कवितें, कितिक देवयानीनें'
' सलील तइं मंदराख्याहि नग स्वपृष्ठीं **'धरा'** ।

मोरोपंत.

२४७ चालू गद्यभाषेंत धातूचीं वर्तमानाकाळचीं रूपें संस्कृतांतील वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणांपासून साधलीं आहेत. या विशेषणाचा प्रत्यय 'अत' आहे; परंतु उमजधातूच्या गणांतील धातूंशिवाय बाकीच्या सकर्मक धातूंस लागतांना हा 'इत' होतो. अत किंवा इत प्रत्यय लावून धातूचें रूप बनल्यावर त्यांस मागें सांगितलेलें प्रत्यय किंचित् फेरफार होऊन लागतात.

२४८ अत-व इत-प्रत्ययान्त रूपें विशेषणें आहेत म्हणून यांचीं रूपें लिंगांप्रमाणें बदलतात; हें खालच्या रूपांवरून लक्षांत येईल.

(१) कर धातु, सकर्मक.

पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी करितों | आम्ही करितों. |
| द्वि. पु. | तूं करितोस | तुम्ही करिता. |
| तृ. पु. | तो करितो | ते करितात. |

स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी करि-तें, त्यें | आम्ही करितों. |
| द्वि. पु. | तूं करितेस,-तीस,-त्येस | तुम्ही करितां. |
| तृ. पु. | ती करि-ती,-ते,-त्ये | त्या करितात. |

नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी करितें | आम्ही करितों. |
| द्वि. पु | तूं करितेंस | तुम्ही करितां. |
| तृ. पु. | तें करितें | तीं करितात. |

(२) पडधातु, अकर्मक.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी पडतों | आम्ही पडतों. |
| | इ०. | इ०. |

२४९ या रूपांची साधनिका अशी आहे कीं, वर्तमानकालवाचक जें अत- किंवा इत- प्रत्ययान्त विशेषण, त्यास 'अस' धातूचें क्रियापद लागून 'करीत आहें' 'बसत आहें,' अशीं अपूर्णवर्तमानकाळासारखीं रूपें प्रथम झालीं. मग 'करितो-हें,' 'बसतोसि' 'बोलतो-हे अशीं रूपें (जीं कवितेंत आढळतात तीं) उपयोगांत येऊन सांप्रतचीं वर्तमानकाळचीं रूपें बनलीं.

२५० वरील रूपांवरून चालू भाषेंतल्या वर्तमानकाळाचे प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें समजावे:—

| | | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|---|
| प्र. पु. | पु. | तों | तों. |
| | स्त्री. | तें, त्यें | |
| | न. | तें | |
| द्वि. पु. | पु. | तोस | तां. |
| | स्त्री. | तेस, तीस, त्येस | |
| | न. | तेंस | |
| तृ. पु. | पु. | तो | तात. |
| | स्त्री. | ती, ते, त्ये. | |
| | न. | तें | |

२५१ धातु सकर्मक असल्यास प्रत्ययांपूर्वीं 'इ' आगम होतो. हा उमज*धातूच्या गणांतील धातूंस होत नाहीं; व आचर इ० धातूंस विकल्पेंकरून होतो. सगकर्मक धातूंस हा आगम न होतां 'करतात,' 'करतो,' अशीं हीं रूपें प्रचारांत आहेत. परंतु सकर्मक धातूंस आगम करणें व अकर्मक धातूंस तो न करणें हें अधिक प्रशस्त मानावें.

*उमजधातूच्या गणांतले धातू सकर्मक असून त्यांना अकर्मक धातूंचे सर्व विकार होतात, हें यावरून व पुढेंही प्रयोगप्रकरणीं दिसून येईल. आचर इ०. धातूंसहा प्रकार विकल्पेंकरून होतो.



## कर्मणि व भावी रूपें.

२५२ चालू गद्यभाषेत वर्तमानकाळीं कर्मणि व भावीप्रयोग होत नाहींत. परंतु कवितेंत तशीं रूपें वर्तमानकाळींही होतात.

२५३ हीं रूपें करण्याची रीत अशी आहे, कीं मागें जे प्रत्यय सांगितले, ते लावण्याचे पूर्वीं मुळधातूंत 'ज' हा आगम मिळवावा.

२५४ भावीप्रयोगांत क्रियापद कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें न फिरतां नेहमीं तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतें.

२५५ या रूपांचीं उदाहरणें:—(१) कर्मणिप्रयोग.

'जें ध्यानातीत ध्याइजे, जें चिन्तातीत चिंतिजे
जें जाणीवेवीण जाणिजे, परब्रह्म तें.' मुकुंदराज.
'देवें मातापितरें अर्चिजति, सर्वस्व संतोषें पाविजति
तयेपाठीं कैंसी वधिजति आपुल्या हातीं'
'विचारीं तूं अर्जुनु कीं कारुण्यें कीजसी दीनु'
इ० इ० ज्ञानेश्वरी.

(२) भावीप्रयोगाचीं उदाहरणें :—

'स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे, पापात्मकें पापें नरका जाइजे।
मग मातें जेणें पाविजे, तें शुद्ध पुण्य' ॥ ज्ञानेश्वरी.

२५६ वरील रूपांवरून दिसून येईल कीं, कर्मणिरूपें सकर्मकधातूंवरून होतात, व भावीरूपें अकर्मकधातूंवरून होतात.

२५७ वर्तमानकाळीं कर्मणिप्रयोग जरी चालूभाषेंत नाहीं, तरी 'पाहिजे' हें गौण क्रियापद व 'म्हणजे' हें अव्यय हीं मुळचीं 'पाह' व 'म्हण' या धातूंचीं कर्मणिरूपें आहेत; व त्यांचा तसा उपयोग खालच्या पद्यांत आहे:—

'जैसें स्वप्नामाजी देखिजे। स्वप्नचीं साच जाणिजे।

मग येऊनियां **पाहिजे ।** तों कांहीं नाहीं ।' ज्ञानेश्वरी.
'जेणें माया अधिष्ठिजे । तें ब्रह्म मायोपाधि बोलिजे ।
माया शबल ऐसें **म्हणिजे ।** तया तेंची.' मुकुंदराज.



## भूतकाळ.

२५८ मराठी भाषेंत वर्तमानकाळाचीं 'करी,' 'करिसी,' 'करिती,' हीं स्वतंत्र रूपें जशीं आहेत, तशीं भूतकाळाचीं नाहींत. मागें सांगितलेंच आहे कीं, पुष्कळदां कवितेंत याच वर्तमानकाळज्या रूपांचा उपयोग भूतकाळाचे जागीं करितात.

२५९ चालू भाषेंत ज्या ला, ली, लें-प्रत्ययान्त रूपांस भूतकाळचीं रूपें असें म्हणतात, तीं संस्कृतांतील भूतकालवाचक विशेषणांपासून साधलीं आहेत. संस्कृतांत भूतकालवाचक विशेषणाचा प्रत्यय 'त' आहे; जसें, कृत, गत, प्राप्त, हृत, इ०. या 'त'चा बालभाषेंत 'द' किंवा 'ड' होऊन मग मराठींत त्याचा 'ल' झाला आहे.

२६० हीं रूपें विशेषणें असल्यामुळें त्यांस लिंगदर्शक प्रत्यय लागतात; जसें, गेला, गेली, गेलें, इ०.

२६१ **प्रत्यय**—तृतीयपुरुषीं प्रत्यय लागत नाहींत;फक्त लिंगवचनदर्शक रूपें होतात.द्वितीयपुरुषीं एकवचनीं प्रथमतः लिंगाचें रूप होऊन पुढें 'स' प्रत्यय लागतो; प्रथमपुरुषीं बहुवचनीं पुल्लिंगी 'ओं' हा प्रत्यय लागतो; स्त्रीलिंगाच्या प्रथम पुरुषाच्या एकवचनीं 'एँ' प्रत्यय लागतो; प्रथम

व द्वितीय पुरुषांचीं बहुवचनें तिन्ही लिंगीं सारखींच होतात.—उदाहरण, 'पड' धातु, अकर्मकः—

| | ए. व. | अने. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | पडलों, पु.<br>पडलें-ल्यें, स्त्री.<br>पडलें, नपुं. | पडलों |
| द्वि. पु. | पडलास, पु.<br>पडलीस, स्त्री.<br>पडलेंस, नपुं. | पडलां. |
| तृ. पु. | पडला, पु.<br>पडली, स्त्री.<br>पडलें, नपुं. | पडले.<br>पडल्या.<br>पडलीं. |

२६२ द्वितीय पुरुषीं 'लां' बद्दल क्वचित 'लांत' व 'लेत' योजितात; उदा० 'तुम्ही आलांत, गेलांत, गेलेत;'

'त्यांसि म्हणे सुरपति, या ऐशा कां संकटांत **आलांत**'

'असा कोण! कोठून **आलेत** स्वामी!
म्हणे, कृष्णजीचे असों बंधु आम्ही' कलेश्वर.

'यमधर्म म्हणे त्या दोषियांसी, कां रे कर्यावासी **चुकलेती**'
गणदास.

टीप—अशा रूपांचे संबंधानें विशेष विचार पुढें प्रयोगप्रकरणीं केला आहे.

२६३ हीं रूपें अकर्मक धातूंवरून झालीं असतां कर्तरि असतात व सकर्मक धातूंवरून झालीं असतां कर्मणि किंवा भावी असतात; जसें, पडला, निजला, उठलें, ब-

सलों, ही कर्तरि आहेत; व केला, धरिला, लिहिला, केलें, हीं कर्मणि किंवा भावी आहेत.

२६४ यावरून गद्यभाषेत भूतकाळीं सकर्मकधातूंवरून फक्त कर्मणिप्रयोगच होतो.

२६५ उमजधातूच्या गणांतील धातूंवरून भूतकाळीं कर्तरिप्रयोग मात्र होतो; व आचरधातूच्या गणांतील धातूंवरून विकल्पेंकरून कर्तरि किंवा कर्मणिप्रयोग होतात. उदा॰ 'मी तें उमजलो,' 'तो शास्त्र शिकला,' 'ती भात जेवली,' 'मी व्याकरण पढलों किंवा पढलें;' 'व्रत आचरलों किंवा आचरिलें' इ०.

२६६ अकर्मक धातूंवरून भावीप्रयोग होतोच; परंतु मराठींत सकर्मकधातूंवरून ही भावीप्रयोग होतो. उदा० 'त्यानें मला पाठविलें' 'रामानें रावणास मारिलें,' इ०.

२६७ भूतकाळीं कर्मणिप्रयोगांत क्रियापद नेहमीं तृतीय पुरुषीं असते. प्रथम व द्वितीय पुरुषीं नेहमीं भावीप्रयोग करितात; जसें, 'त्यानें तुला मारिलें,' इ० परंतु कवितेंत प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्मणिप्रयोग आढळतो; उदा०.

'मी आधींच कांहीं नेणें । वरी **कवळिलों** मोहें येणें ।
श्रीकृष्णा, विवेक या कारणें । पुसिला तुज ॥
ज्ञानेश्वरी.

'जाऊनि तो सूत म्हणे, कृष्णे, द्युतांत तूं स्वयें धर्में
**हारविलीस**; सुयोधन-सदनाप्रति ये करावया कर्में'
'भूप म्हणे तूं मुनिनीं चित्तीं षडरिक्षयार्थ **धरिलास**'
'**वरिलासि** मत्सखीनें, म्यां ही **वरिलासि** तूं मनें—' ।
मोरोपंत.

२१८ भूतकाळाचीं रूपें करण्याचा सामान्य नियम असा आहे कीं, मूळधातूंस व्यंजनादि प्रत्यय लावण्याचा नियम लिंगविचारांत सांगितला आहे, त्याप्रमाणें हा प्रत्यय लावावा; परंतु पुष्कळ धातूंस हा प्रत्यय लावण्यापूर्वी कित्येक फेरफार होतात. हे फेरफार अगदीं नियमित रीतीनें सांगतां येणें कठीण आहे. परंतु साधारणतः वर्गीकरण करितां येईल. तें असें:—

(१) कांहीं अकारान्त धातूंच्या अंत्याबद्दल 'आ' होतो; हा नियम धा॰ कधीं विकल्पेंकरून होतो.

(अ) ज्यांस नियमानें 'आ' होतो ते धातु:—
नीघ, पळ, म्हण, रीघ, हींव; इ०

(आ) ज्यांस विकल्पेंकरून 'आ' होतो, परन्तु 'आ' न होतां झालेलें रूप विशेष उपयोगांत आहे:—
जीर, ढव, तीड, नीभ, भीज, मुर, इ०

(इ) ज्या धातूंना विकल्पेंकरून 'आ' होतो, परंतु 'आ' होऊन झालेलें रूप विशेष उपयोगांत आहे.
ऊठ, दड, नीज, नीव, बूड, मीळ, वीर, इ०

(ई) ज्या धातूंचीं दोन्हीं रूपें प्रचारांत आहेत ते:—
ऊभ, खीज, गळ, जळ, झीज, दव, दीप, वुज, बूझ, रीझ, लप, खीज, इ०.

(२) धातु ईकारान्त असल्यास ईकाराशीं आकाराचा संधी होऊन रूपें होतात; उदा० भ्याला, प्याला, व्याला, इ०.

(३) कित्येक धातूंचें अंत्याक्षर नाहींसें होऊन उपान्त्यास 'ए' हा विकार होतो; उदा० कर, केला, मर, मेला, इ०.

(४) धातु एकारान्त असतां केव्हां त्यास कांहीं विकार होत

नाहीं; जसें, ने, नेला; केव्हां 'ए' बद्दल 'ई' आदेश होतो, जसें, दे, दिला; कित्येक वेळां धातूपुढें 'त' आगम होतो, जसें, घे, घेतला; केव्हां केव्हां 'ए'चा 'या' होतो; उदा० ले, ल्याला.

(५) ज्या धातूंच्या शेवटीं 'ण' अक्षर असतें, त्यांच्या 'ण' चा विकल्पें 'ट' होतो; जसें, खण, खणला, खटला; हण, हणला, हटला; इ० म्हण धातूचें 'म्हटलें' असें रूप होतें, परंतु 'ण' कायम राहिला असतां त्याच्या 'अ' ला दीर्घत्व येतें; जसें, 'म्हणालों.'

(६) कित्येक वेळां धातूंस 'त' लागतो; त्याचे पूर्वीं कित्येक धातूंस 'इ' आगम होतो; व धातूंचा अंत्य दीर्घ असल्यास ऱ्हस्व होतो; केव्हां केव्हां धातूंच्या शेवटीं 'ल' असला तर त्याचा 'त' होतो. उदा० सांग, सांगितला; धू, धुतला; घाल, घातला इ०

(७) कित्येक आकारान्त धातूंना विकल्पेंकरून 'इ' आगम होतो; उदा० गा, गाला, गाइला; ध्या, ध्याला, ध्याइला; मा, माला, माइला इ०

(८) कित्येक अनियमित रूपें खालीं देतों:—

*जा, गेला; खा, खाल्ला; ये, आला; हो, झाला; इ०.*

२६९ *या भूतकाळच्या रूपांबद्दल कवितेंत* चमत्कारिक रूपें योजिलेलीं आढळतात, त्यांचे मासले खालीं दाखवितों:—

'गुरुं बहु संतोषें **दिधली** जाया पित्याकडे आज्ञा'

मोरोपंत.

'मग गर्जोनी नराधीशें। **म्हणितलें** 'आश्रमीं कोण असे?'।

मुक्तेश्वर.

'सर्वेंच दुःशासनसुतें । **हाणीतलें** अभिमन्यातें ।'

श्रीधर.

'तुका म्हणे हें तों आहे तयां ठावें,
जीहीं एका भावें **जाणीतलें**'।　　　　तुकाराम.

'कामें **हिरतिलीया** (हिराल्या) दृष्टी । धमुष्यें गळालीं मुष्टीं'। एकनाथ.

'मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि **जाहलासि** कां पाला'। मोरोपंत.

'क्रोधें गेला संतसंग । लोभें **जाहला** वीरंग'। रामदास.

'बाहेर **पातली** (पावली) । मुनीश्वर दुहिता'। मुक्ते०

'ऐकोनी उद्धवाचा प्रश्न । **हांसिन्नला** (हसला) मधुसूदन'। एकनाथ.

'ऐशिया तानडी **धाविन्नला** । द्रौपदीमागें उभा ठेला'।

'ऐकोनि विकर्णाची वाणी । **गर्जिन्नल्या** खलश्रेणी'। मुक्तेश्वर.

'नगर हें रचिलें कवणें बरें । मढुन **काढियलें** कनकांबरें'। अनंत.

(अ) म्हणे, करिजे, बोलिजे, इ० जीं कर्मणिरूपें सांगितलीं, त्यांस 'ल' प्रत्यय लावून केलेलीं भूतकाळाचीं कर्मणि व भावी रुपें कवितेंत येतात:—

'ओनींव हे. न घडितां कृति **बोलिजेली**'। रघुनाथपंडित.

'द्विजीं निषधापासाव **म्हणीजलें**'

'कांहीं पुढें फडकला **अवलोकिजेला**'। रघुनाथपंडित.

(आ) या रूपांतील 'जे' बद्दल पुष्कळदां 'ये'ही होतो:—

'मागावयासि जन मागिल **देखियेले**'। रघु०

(इ) कधीं कधीं 'ये'काराबद्दल 'य'कार होतो:—

'पसरूनी गुरुजालक धीवरीं
**धरियले** बहु मीन नदीवरी'। मोरो०

२७० केव्हां वर्तमानकाळचीं कर्मणिरुपें भूतकाळाचे जागीं योजितातः—

'नको विसरूं आम्हांसि असों येथें,
वदुनि **धरिजे** गर्हिवरा महीनाथें' रघु०

२७१ कांहीं धातूंचीं ल-प्रत्ययान्त भूतकाळचीं रुपें मात्र भाषेंत आढळतात; परंतु त्यांच्या वर्तमानकाळाच्या रुपांचा लोप झाला आहे; उदा० ठेला, उदेला, इ०.



## रीतिभूतकाळ.

२७२ भूतकाळाचीं आणखी एक प्रकारचीं रुपें मराठींत होत असतात, त्यांवरून क्रिया होण्याची किंवा करण्याची वहिवाट किंवा रीत होती असा बोध होतो. जसें, 'रामा लहानपणीं फार रडे.' या काळास **रीतिभूतकाळ** असें म्हणतात.

२७३ या काळीं धातूंस कवितेंतील वर्तमानकाळाचे प्रत्यय थोड्या फरकानें लागतात. जे फेरफार होतात ते असे:—(१) द्वितीयपुरुषीं एकवचनाचा प्रत्यय 'सी' व तृतीयपुरुषीं अनेकवचनाचा प्रत्यय 'ती' यांबद्दल अनुक्रमें 'स' व 'त' होतात; (२) सकर्मकधातूंस आख्यात प्रत्यय लागण्याचे पूर्वीं 'इ' आगम होऊन, त्यास दीर्घत्व येते; (३) अकारान्त अकर्मकधातूंस 'ते,' 'त' व 'स' प्रत्यय लागण्यापूर्वीं विकल्पेंकरून 'ए' आगम होतो; व (४) धातूंच्या शेवटीं 'अ' शिवाय स्वर असल्यास 'स' प्रत्ययापूर्वीं विकल्पें 'ई' आगम होतो.

## उदाहरणें.

### सकर्मक 'धर' धातु.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी धरीं | आम्ही धरूं, धरों. |
| द्वि. पु. | तूं धरीस | तुम्ही धरां. |
| तृ. पु. | तो धरी | ते धरीत. |

### अकर्मक 'खेळ' धातु.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी खेळें | आम्ही खेळूं, खेळों. |
| द्वि. पु. | तूं खेळस | तुम्ही खेळां, |
| तृ. पु. | तो खेळे | ते खेळत, खेळेत. |

२७४ जा, ये, ने, पी, घृ, इ० एकाक्षरी धातूंचीं द्वितीयपुरुषीं एकवचनीं जास, वीस, इ० किंवा जाईस, विईस, इ० रुपें होतात.

२७५ हीं रीतिभूतकाळाचीं रूपें चालू भाषेंत फक्त कर्तरि आहेत. परंतु अकर्मकधातूंस लागणाऱ्या प्रत्ययांच्यापूर्वी 'इज' आगम करून ते धातूंस लाविले तर तीं कर्मणि किंवा भावी रुपें होतात. जसें:—

'त्वां काय कर्म **करिजे** लघुलेंकरानें'। वामन.
'वीर्यदानें उपजविता अन्नदानें प्रतिपालिता ।
संकटीं प्राण रक्षिता हे तिघे पिते **बोलिजेती**' ।
मुक्तेश्वर.

## भविष्यकाळ.

२७६ कवितेंतील वर्तमानकाळच्या रूपांपुढें 'ल' अक्षर लाविलें म्हणजे भविष्यकाळचीं रूपें सिद्ध होतात.

प्रथमपुरुषीं एकवचनीं अनुस्वाराचा लोप होऊन पुढें 'ल' चा 'न' होतो, व त्याच पुरुषीं बहुवचनीं 'ल'चा लोप होतो. उदाहरणें:—

'वाच' धातु, सकर्मक.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी वाचीन | आम्ही वाचूं. |
| द्वि. पु. | तूं वाचिशील | तुम्ही वाचाल. |
| तृ. पु. | तो वाचील | ते वाचितील. |

अकर्मक 'नीज' धातु.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी निजेन | आम्ही निजूं. |
| द्वि. पु. | तूं निजशील | तुम्ही निजाल. |
| तृ. पु. | तो निजेल | ते निजतील. |

२७७ हीं रूपें कर्तरि आहेत. परंतु करिजे वगैरे जीं कर्मणि रूपें मागें सांगितलीं, त्यांस 'ल' प्रत्यय लावून भविष्यकाळची कर्मणि व भावी रूपें करितात. हीं रूपें कवितेंत मात्र आढळतात.

'तैसें अभिलाषें येणें **कीजेल**
विषयाची आशा **धरिजेल**
तरी वरपडा **होइजेल**
क्रोधानळा.' ज्ञानेश्वरी.

'धौम्याऽभिप्रायाहि हा जैं **वरिजेतील** कुरु परेतत्वें ।
गातलि पुढें कुरुगुरु दर्भ धरुनियां करीं परे तत्वें' ॥
मोरोपंत.



## आज्ञार्थ किंवा विध्यर्थ.

२७८ या अर्थी धातूंस प्रत्यय लागतात ते:—

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | ऊं | ऊं |
| द्वि. पु. | (प्रत्यय नाहीं) | आ |
| तृ. पु. | ऊ किंवा ओ | ऊत किंवा ओत. |

उदाहरण, 'कर' धातु.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | मी करूं | आम्ही करूं. |
| द्वि. पु. | तूं कर | तुम्ही करा |
| तृ. पु. | तो करू किंवा करो | ते करूत किंवा करोत. |

२७९ आज्ञार्थक रूपांचा प्रथमपुरुषीं प्रयोग प्रश्नार्थक वाक्यांत मात्र होतो. द्वितीयपुरुषीं एकवचनीं कवितेंत कधीं कधीं 'ईं' किंवा 'एं' शेवटीं जोडतात; जसें:—

'**घेईं घेईं** माझे वाचे । गोड नाम विठोबाचें
**करीं** मस्तक ठेंगणा । **लागें** संतांच्या चरणा'
तुका०

२८० 'आ' हा प्रत्यय लावितांना मागें वर्तमानकाळीं याच प्रत्ययाचे संबंधानें सांगितलेले नियम लक्षांत ठेवावे.

२८१ एकारान्त व ओकारान्त धातूंच्या विध्यर्थाच्या द्वितीयपुरुषाच्या एकवचनाचा प्रयोग कधीं कधीं कवितेंत तृतीयपुरुषीं (वर्तमान व भूतकाळीं) एकवचनीं आढळतो. उदाहरणः—

'**घे** इक्षु वारण जसा कर-पुष्करानें,
श्रीराम चाप उचली कर-पुष्करानें' । वामन.
'पडे केळ जैशी महा चंडवातें
असें देखतां **ये** कृपा माधवातें' । वामन.

येथें 'ये' याचा अर्थ आली असा आहे.

'कृष्ण रथीं चढले मग तोहि चढे पुत्र सत्यकाचा हो
जेविं हर-रथीं विधि हरि, दुसरा दृष्टांत सत्य काचा **हो**'
मोरोपंत.

येथें **हो** म्हणजे होतो असा अर्थ आहे.

'वत्सा, सहदेवा, मी मेल्यावरि हाय नच वदावें हो
तेरापळेंही नसती माता, हें हायन चवदावें **हो**' ।
मोरोपंत.

'आली समीप यजमानिन पट्टराणी
पाहे हरीस, तिचि **हो** न पुरे शिराणी' । वामन.

२८२ येओ, होओ, यांबद्दल येवो, होवो, असेंही लिहितात. कवितेमध्यें यांबद्दल यो, हो, अशींही रुपें आढळतात; उदा०.

'भीम म्हणे, केशवजी, मृदु बोला, उग्र तो सुयोधन हो,
बा, त्याशीं सख्यानि हो, युद्धीं हत एकही सुयोध न **हो**' ।
'श्री रामाला दशरथ यावें युवराजपद असें योजी ।
गुरु सचिव म्हणति, इच्छित होतों कीं हेंचि तव मना **यो**,जी'।
मोरोपंत.

वैराटि म्हणे, नर्तक हो कीं वादक तयैव गायन हो,
सारथि हो या समयीं. एकाहि वश कौरवांसि गाय न **हो**
मोरोपंत.

२८३ गद्यभाषेंत विध्यर्थ असतां कर्मणिप्रयोग न होतां भावीप्रयोग होतो; परंतु करिजे, बोलिजे, इ० जीं वर्तमानकाळचीं कर्मणिरुपें तींच कवितेंत विध्यर्थीं योजितात: जसें:—

'मना कल्पना वाउगी ते न कीजे
मना सज्जना, राघवीं वास कीजे'

रामदास.

२८४ 'आव' हा प्रत्यय लागून जीं विध्यर्थाचीं विशेषणें होतात (जसें, करावें, जावा, बसावे, यावी, इ०) तीं क्रियापदाचे जागीं योजण्याची चाल पडली आहे व यांस विध्यर्थाचीं रूपेंच समजतात. यांचीं रूपें धातू अकर्मक असतां पुरुषांप्रमाणें किंवा लिंगवचनाप्रमाणें बदलत नाहींत; धातू सकर्मक असतां मात्र कर्माचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात; म्हणून तीं शुद्ध विशेषणें होत. तथापि सांप्रत त्यांचा क्रियापदांप्रमाणें उपयोग करण्याचा प्रचात पडला आहे; उदाहरणें:—

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | म्या जावें | आम्हीं जावें. |
| द्वि. पु. | त्वा जावें | तुम्हीं जावें. |
| तृ. पु. | त्यानें जावें | त्यानीं जावें. |

२८५ याचप्रमाणें तो जावा, ती यावी इ० व द्वितीयपुरुषीं एकवचनीं जावेंस व बहुवचनीं जावेंत अशीं रूपें क्वचित् करितात.

२८६ अस धातूचीं विध्यर्थाचीं रूपें दुसऱ्या धातूंच्या रूपांपुढें येऊन या अर्थावरून **संशयार्थाचा** बोध होतो. संशयार्थाच्या विध्यर्थरूपांस लिंगादि विकार होतात. तीं रूपें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | असावा, पु.<br>असावी, स्त्री.<br>असावें, न. | असावे<br>किंवा<br>असावीं. |

| | | |
|---|---|---|
| द्वि. पु. | असावास, पु. | असावेत, असावांत, पु. |
| | असावीस, स्त्री. | असाव्यात, स्त्री. |
| | असावेंस, न. | असावींत, न. |
| तृ. पु. | असावा, पु. | असावे. |
| | असावी, स्त्री. | असाव्या. |
| | असावें, न. | असावीं. |

२८७ या रूपांच्या मागें करीत, गेला, गेली, वगैरे रूपें लागून संयुक्त क्रियापदें होतात.



## संकेतार्थ

२८८ हा अर्थ वस्तुतः भिन्न मानण्याचें कारण असें आहे कीं, या अर्थीं वर्तमानकाळाच्या रूपांत किंचित् फरक पडतो. गद्यांतील वर्तमानकाळचे रूपांप्रमाणें यांनाही लिंगें असतात. 'कर' हा धातु या अर्थीं चालविला असतां रूपें होतात तीं:—

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | करितों, पु. | करितों. |
| | करितें, करित्यें, स्त्री. | |
| | करितों, न. | |
| द्वि. पु. | करितास, पु. | |
| | करितीस, स्त्री. | करितां. |
| | करितेंस, न. | |
| तृ. पु. | करिता, पु. | करिते. |
| | करिती, स्त्री. | करित्या. |
| | करितें, न. | करितीं. |

**२८९ याप्रमाणें सर्व धातूंचीं रूपें करावीं. हीं रूपें सर्वदा कर्तरि असतात.**

२९० 'अस' धातूचीं या अर्थाचीं आणखीं रूपें होतात तीं:–

|  |  |  |
|---|---|---|
| प्र. पु. | असतों पु.<br>असलें-स्यें, स्त्री.<br>असलें, न. | असलों. |
| द्वि. पु. | असलास<br>असलीस<br>असलेंस | असला. |
| तृ. पु. | असला<br>असली<br>असलें | असले.<br>असल्या.<br>असलीं. |

२९१ हीं रूपें मूळचीं 'अस' धातूच्या भूतकाळाचीं आहेत. परंतु सध्या त्यांचा भूतकाळीं उपयोग होत नसून संकेतार्थी होतो. व यावरून संकेतार्थाचीं संयुक्त क्रियापदें होतात.

२९२ संकेतार्थाच्या रूपांस कालभेद नाहीं. त्यांचा अर्थ भूतकाळासारखा किंवा क्रिया घडली आहे अशासारखा होतो. इतर काळीं 'जर' 'तर' हीं अव्ययें लागून संकेतार्थ होतो.



## धातूंचें चालविणें.

२९३ एथपर्यंत निरनिराळ्या काळीं जीं धातूंचीं रूपें करून दाखविलीं तीं चांगलीं ध्यानांत येण्यासाठीं एक सकर्मक व एक अकर्मक असे दोन धातू चालवून दाखवितों:–

सकर्मक 'राख' धातु. व अकर्मक 'बस' धातु.

## कर्तरि.

कवितेंतील वर्तमानकाळ (क्वचित् भूत).

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | राखीं | राखूं, राखों. |
| द्वि. पु | राखिसी | राखा. |
| तृ. पु. | राखी | राखिती.. |
| प्र. पु. | बसें | बसूं, बसों. |
| द्वि. पु. | बससी | बसा. |
| तृ. पु. | बसे | बसती. |

सर्वत्र आढळणारीं वर्तमानाचीं रूपें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | राखितों, पु. / राखितें, स्त्री. | राखितों | बसतों पु. / बसतें स्त्री. | बसतों |
| द्वि. पु. | राखितोस पु. / राखितेस स्त्री. / राखितेंस न. | राखितां | बसतोस. पु. / बसतेस-तीस, त्येस, स्त्री. / बसतेंस नपु. | [बसतां अने. |
| तृ. पु. | राखितो पु. / राखिते स्त्री. / राखितें न. | राखितात | बसतो. पु. / बसते-ती-से-त्ये, स्त्री. / बसतें न. | [बसतात. अने. |

## भूतकाळ.

(उमज धातूच्या गणांतल्या धातूंचीं रूपें खेरीजकरून भूतकाळीं सकर्मक धातूंचीं कर्तरिरूपें नाहींत. या धातूंचीं रूपें 'बस' प्रमाणें करावी.)

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | बसलों, पु. / बसलें, बसल्यें, स्त्री. | बसलों. |
| द्वि. पु. | बसलास, पु. / बसलीस, स्त्री. / बसलेंस, न. | बसला. |

| | | |
|---|---|---|
| तृ. पु. | बसला, पु. | बसले. |
| | बसली, स्त्री. | बसल्या. |
| | बसलें, न. | बसलीं. |

## रीतिभूतकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु, | राखीं | राखूं, राखों. |
| द्वि. पु. | राखीस. | राखा. |
| तृ. पु. | राखी. | राखीत. |
| प्र. पु. | बसें | बसूं, बसों. |
| द्वि. पु. | बसेस, बसस | बसा. |
| तृ. पु. | बसे | बसत. |

## भविष्यकाळ.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | राखीन | राखूं. | बसेन | बसूं. |
| द्वि. पु. | राखिशील | राखाल. | बसशील | बसाल. |
| तृ. पु. | राखील | राखितील. | बसेल | बसतील. |

## आज्ञार्थ किंवा विध्यर्थ.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | राखूं | राखूं | बसूं | बसूं. |
| द्वि. पु. | राख | राखा. | बस | बसा. |
| तृ. पु. | राखो, राखू | राखोत, राखूत. | बसो, बसू | बसोत, बसूत. |

## दुसरा आज्ञार्थ किंवा विध्यर्थ.

[ सकर्मकधातूंस 'वा' प्रत्यय लागून फक्त कर्मणि म्हणजे विध्यर्थाचीं रूपें होतात ; जसें, 'मीं राखू राखावा,' 'त्यानें काम करावें,' इ० ]

प्र. पु. रूपें नाहींत.

| | | |
|---|---|---|
| द्वि. पु. | बसावास, पु. | अनेकवचनीं कर्तरि |
| | बसावीस, स्त्री. | रूपें नाहींत. |
| | बसावेंस, न. | |

| | | |
|---|---|---|
| तृ. पु. | बसावा,-वों पु. | बसावे. |
| | बसावी, स्त्री. | बसाव्या. |
| | बसावें, न. | बसावीं. |

## संकेतार्थ (कर्तरि).

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | राखितों, पु. | राखितों. |
| | राखितें,-त्यें, स्त्री. | |
| द्वि. पु. | राखितास, पु. | |
| | राखितीस, स्त्री. | राखितां. |
| | राखितेंस, न. | |
| तृ. पु. | राखिता, पु. | राखिते. |
| | राखिती, स्त्री. | राखित्या. |
| | राखितें, न. | राखितीं. |

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | बसतों, पु. | बसतों. |
| | बसतें,-त्यें, स्त्री. | |
| द्वि. पु. | बसतास, पु. | |
| | बसतीस, स्त्री. | बसतां. |
| | बसतेंस, न. | |
| तृ. पु. | बसता | बसते. |
| | बसती | बसत्या. |
| | बसतें | बसतीं. |



## कर्मणि व भावी रूपें.

टीप—कर्मणिरूपें सकर्मकधातूंचीं मात्र होतात. अकर्मक धा-

तूंचीं भावी रूपें होऊन तीं नेहमीं तृतीय पुरुषीं एकवचनीं असतात; अकर्मकधातूंस कर्मणिरूपें नाहींत.

## वर्तमानकाळ

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | + | |
| द्वि. पु. | राखिजेसी | + |
| तृ. पु. | राखिजे | राखिजेती. |

## भूतकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | राखिलों, पु.<br>राखिलें,-ल्यें, स्त्री. | राखिलों |
| द्वि. पु. | राखिलास<br>राखिलीस<br>राखिलेंस | राखिलां |
| तृ. पु. | राखिला<br>राखिली<br>राखिलें | राखिले<br>राखिल्या<br>राखिलीं |

## दुसरा भूतकाळ (कवितेंत)

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | राखिजेलों<br>राखियेलों | राखिजेलों.<br>राखियेलों. |
| द्वि. पु. | राखिजेलास<br>राखियेलास | राखिजेलां.<br>राखियेलां. |
| तृ. पु. | राखिजेला<br>राखियेला | राखियेले.<br>राखिजेले. |

(याचप्रमाणें स्त्रीलिंग व नपुंसकलिंग याचीं रूपें करावीं. अकर्मक धातु 'बस' याचीं तृतीयपुरुषीं एकवचनीं भावी रूपें सुलभ असल्यामुळें वर दिलीं नाहींत.)

## रीतिभूत काळ.

(कर्मणि व भावी रूपें नाहींत.)

## भविष्यकाळ.

तृ. पु. राखिजेल राखिजतील. बसिजेल (भावी)
इ०. इ०.

## संकेतार्थ.

(कर्मणि व भावीरूपें नाहींत.)



## अनियमित धातू.

२९४ वर जीं रूपें दिलीं आहेत, तशींच रूपें प्रायः सर्व धातूंचीं होतात व तीं यांवरून करितां येतील; परंतु कित्येक धातूंचीं रूपें बरींच निराळीं होतात. यास्तव त्या धातूंचें विशेष निरूपण केलें पाहिजे.

२९९ हो धातु, अकर्मक; अर्थ उत्पन्न होणें किंवा असणें.

### कर्तरि रूपें.

वर्तमानकाळ ( तिन्ही लिंगी ) कवितेंत.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | होईं | होऊं,-वों,-ओं |
| द्वि. पु. | होसी | व्हा. |
| तृ. पु | होई | होती. |

व्यवहारभाषेंत (पुल्लिंगी).

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | होतों | होतों. |
| द्वि. पु. | होतोस | होतां. |
| तृ. पु. | होतो | होतात. |

(स्त्रीलिंग व नपुंसकलिंग यांचीं रूपे यांवरून जाणावीं).

व्यवहारभाषेंत दुसरा वर्तमानकाळ.

(तिन्ही लिंगी.)

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | होय | होऊं |
| द्वि. पु. | होस | व्हा |
| तृ. पु. | होय | होत |

भूतकाळ (पुल्लिंग).

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | झालों<br>होतों | झालों<br>होतों |
| द्वि. पु. | झालास<br>होतास | झालां<br>होतां. |
| तृ. पु. | झाला<br>होता | झाले<br>होते |

बाकीच्या लिंगांचीं रूपें यांवरून करावीं.

रीतिभूतकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | होई | होऊं |
| द्वि पु. | होस, होईस | व्हा |
| तृ. पु. | होई | होत. |

भविष्यकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र पु. | होईन | होऊं |
| द्वि. पु. | होशील | व्हाल |
| तृ. पु. | होईल | होतील. |

| | आज्ञार्थ. | | संकेतार्थ (पुल्लिंग) | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | होऊं | होऊं. | होतों | होतों. |
| द्वि. पु. | हो | व्हा. | होतास | होतां |
| तृ. पु. | होवो | होवोत | होता | होते |
| | होवो | होवोत (यावरून इतर लिंगांचीं रूपें करावीं) | | |

२०६ या शिवाय वर्तमानकाळीं 'होइजे' वगैरे भावीरूपें होतात; व व्हावा, व्हावें इत्यादि विध्यर्थाचीं रूपें जाणावीं

२०७ होय, होत, वगैरे रूपें हो धातूचीं नव्हेत, असें कित्येकांचें मत आहे. परंतु तीं रूपें होधातूचीं असून, असेंच मानणें प्रशस्त दिसतें.

## अकर्मक 'अस' धातु*

वर्तमानकाळ (कवितेंत), तिन्ही लिंगी.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | असें | असूं. |
| द्वि. पु. | अससी | असा. |
| तृ. पु. | असे | असती. |

वर्तमानकाळ (व्यवहारिक) पुल्लिंगी.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | असतों | असतों. |
| द्वि. पु. | असतोस | असतां. |
| तृ. पु. | असतो | असतात. |

| भूतकाळ पु. | रीति भूतकाळ (तिन्ही लिंगी) | |
|---|---|---|
| (स्वतंत्र नाहीं; 'हो' | असें | असूं |
| धातूच्या भूतकाळाचा | असस | असा. |
| उपयोग करितात) | असे | असत. |

*ज्याकाळाचे रूपांस लिंग-लागतात, त्यांचीं फक्त पुल्लिंगी रूपें दिलीं आहेत; बाकींचीं रूपें त्यांवरून जाणावीं.

| | भविष्यकाळ (तिन्हीलिंगीं) | | आज्ञार्थ (तिन्हीलिंगीं) | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | असेन | असूं | असूं | असूं. |
| द्वि. पु. | असशील | असाल | अस | असा. |
| तृ. पु. | असेल | असतील | असो | असोत. |

| | संकेतार्थ (पुल्लिंगीं) | | दुसरा आज्ञार्थ (पुल्लिंगीं) | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | असतों | असतों | असावा | + |
| द्वि. पु. | असतास | असतां | असावास | + |
| तृ. पु. | असता | असते | असावा | असावे. |

## अकर्मक 'आहे' धातु.

२९८ संस्कृतांतील अस धातूपासून मराठींत एक अस धातु आला आहे; त्याचप्रमाणें त्याच्या अस्ति या रूपापासून आहे असा दुसरा धातु झाला आहे. त्या धातूचीं वर्तमानकाळाचीं मात्र रूपें आढळतात; तीं अशीः—

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | आहें | आहों-त. |
| द्वि. पु. | आहेस | आहां-त. |
| तृ. पु. | आहे | आहेत. |

(यांस लिंग लागत नाहींत)

२९९ या धातूच्या भूतकाळाबद्दल होतों, होतास, होता इ० रूपें लिहितात; परंतु वस्तुतः हीं रूपें 'हो' धातूचीं आहेत; 'आहे' या धातूस भूतकाळाचीं रूपें नाहींत. त्यांबद्दल 'अस' या धातूच्या रूपांचा उपयोग करितात.

३०० कवितेंत 'अस' व 'आहे' या धातूंचा अर्थ बहुधा सारखाच असतो; उदा०

'हा पौरव दुष्यंत त्वद्गुणाकर्णनीं असे (आहे) लोल'

'हितशत्रु निकट न बरा, जो त्यांप्रति दयित जे तुला असती (आहेत)'

मोरोपंत.

३०१ चालू भाषेत अस धातूचा अर्थ 'आहे' धातूप्रमाणें केवळ अस्तित्वदर्शक नसतां 'वारंवार असणें' किंवा 'कांहीं वेळ एकसारखें असणें' असा असतो ; उदा० 'तो देवळांत असतो' म्हणजे नेहमीं किंवा बराच वेळ असतो ; 'रामा आपल्या वर्गांत पहिला असतो,' म्हणजे तशी नेहमींची रीति आहे,

३०२ या धातूचा भूतकाळीं स्वतंत्रपणें प्रयोग न होतां त्याचा उपयोग संकेतार्थी होऊन पुढें 'जर, 'तर' 'म्हणजे' यांचा उपयोग केला असतो.

३०३ क्रिया घडली नाहीं असा संशय दाखविणें असल्यास या धातूच्या भविष्यकाळाच्या रूपांचा प्रयोग भूतकाळींही होतो ; उदा० 'दहा वर्षांपूर्वी तो श्रीमंत असेल, आज त्याचेजवळ कवडीही नाहीं,' यारूपांस संशयार्थक रूपें म्हणण्याची चाल पडली आहे.

३०४ 'आहे' या धातूचें मुळचें 'अस्ति' यापासून झालेलें रूप 'आही' असें होय; त्यास मागें नकार लागून न + आही = नाहीं असा धातु बनला आहे; यास नकारयुक्त 'अस' धातु म्हणावें; याचीं रूपें :—

## वर्तमानकाळ.

| | पहिला प्रकार, | | | दुसरा प्रकार, | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | नाहीं | नाहीं | प्र. पु, | नव्हे | नव्हे |
| द्वि. पु. | नाहींस | नाहीं | द्वि. पु. | नव्हेस<br>नव्हस | नव्हां |
| तृ. पु. | नाहीं | नाहींत | तृ. पु. | नव्हे | नव्हेत<br>नव्हत |

[यांस लिंगनिबंध नाहीं; हीं दुसरीं रूपें न+हो धातु यांपासून साधलीं आहेत.]

### भूतकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | नव्हतों | नव्हतों. |
| द्वि. पु. | नव्हतास | नव्हतां. |
| तृ. पु. | नव्हता | नव्हते. |

बाकीच्या लिंगांचीं रूपें यांवरून समजावीं. हीं रूपेंही न+हो यांपासून झालीं आहेत.

## 'नको' धातु.

### वर्तमानकाळ.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | नको | नको. |
| द्वि. पु. | नकोस | नको, नका. |
| तृ. पु. | नको | नकोत. |

२०५ यांस लिंगनिबंध नाहीं. या धातूचा प्रयोग इतर काळीं होत नाहीं. आज्ञार्थी द्वितीयपुरुषीं या रूपांचा उपयोग 'ऊं' प्रत्ययान्त धातुसाधीत अव्ययानंतर होतो. जसें, 'तूं करूं नको,' 'तुम्हीं करूं नका' इ०. यांचा उपयोग क्वचित् विशेषणासारखाही करितात. उ० 'मी त्यास नको होतों,' 'मला इतकें नको होतें,' इ०.

## पाहिजे.

२०६ हा वस्तुतः स्वतंत्र धातु नसून 'पाह' धातूचें कर्मणि रूप आहे. याचीं रूपें मागें कर्मणिरूपें सांगितलीं आहेत तशीं करावीं. केव्हां केव्हां त्याचा धातुसाधित विशेषणासारिखाही उपयोग होतो; उ० 'मला तें

पाहिजे आहे.' (वरील 'नको' याचा उपयोग पहा).

### नलगे.

३०७ हें क्रियापद 'न' आणि 'लागे' यांवरून साधलें आहे. नलगत, नलगेत, तूं नलगस, मी नलगें. अशीं याचीं रूपें करावीं.

३०८ 'जा' हा वस्तुतः अशाच प्रकारचा अनियमित धातु आहे. कारण, यास भूतकाळचीं रूपें नसून यांबद्दल गम धातूचें भूतकालवाचक विशेषण जें गत त्याचीं 'गेला' इ० रूपें होतात.

३०९ 'नये' (न ये) हा एक अनियमित धातु कित्येक व्याकरणांत दिला आहे. परंतु वस्तुतः हा स्वतंत्र धातु नसून ये धातूच्या जुन्या भाषेंतील वर्तमानकाळच्या रूपांस न हें अव्यय लागून हीं रूपें होतात (पहा, नि. २४४).

३१० 'हो' या धातूचीं 'व्हावा' व 'हवा' अशा प्रकारचीं रूपें 'पाहिजे' याबद्दल उपयोगांत आहेत. वास्तविक हीं मुळचीं विध्यर्थाचीं रूपें असावीं असें वाटतें. हीं रूपें अशीं होतातः—

| | |
|---|---|
| मी व्हावों किंवा हवों | आम्ही व्हावों, हवों; |
| तूं व्हावास, हवास | तुम्ही व्हावां, हवां; |
| तो व्हावा, हवा | ते व्हावे, हवे. |

३११ या रूपांचा दुसरे काळीं उपयोग होत नाहीं; मात्र लिंगें लागतात; जसें, व्हावी, व्हावें, हव्यान, हवींत, इ०.



## साधित धातूंचा विचार.

३१२ येथपर्यंत मूळचे जे धातू त्यांपासून होणाऱ्या क्रियापदांच्या रूपांविषयीं सांगितलें. परंतु कित्येक धातू दुसऱ्या धातूंपासून, नामांपासून किंवा विशेषणांपासूनही साधतात; त्यांविषयीं आतां विचार करूं. अशा धातूंचे तीन प्रकार आहेत. १ **प्रयोज्य किंवा प्रयोजक धातू; २ शक्यार्थक धातू; व ३ प्रातिपदिकांवरून झालेले धातू.**

३१३ प्रयोज्यधातु व शक्यधातु यांचे रूपास 'भेद' असें एक नांव देऊन क्रियापदास 'भेद' म्हणून एक विकार होतो, असें कित्येक व्याकरणांत मानिलें आहे; व मग या दोहोंच्या जोडीला क्रियापदाचें जें मूळचें रूप त्यास 'मूळरूपभेद' असें नांव दिलें आहे. परंतु जरा विचार करून पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, काळ, प्रयोग, पुरुष, इत्यादिकांवरून जशीं क्रियापदाचीं रूपें फिरतात, तशीं प्रयोज्यक्रियापदें करितांना फिरत नसून प्रयोज्य क्रियापदें हे नवीन एक प्रकारचे धातूच बनतात. हे धातू कर्मणि किंवा भावी असले म्हणजे त्यास शक्य-क्रियापदें म्हणतात. तेव्हां याप्रमाणें प्रयोज्य व शक्य या प्रकारचीं दोन प्रकारचीं क्रियापदेंच असल्यामुळें 'भेद' म्हणून एक क्रियापदाचे रूपास होणारा हा निराळाच प्रकार आहे, असें मानण्याचें कारण नाहीं.

३१४ प्रयोजक व शक्य क्रियापदांपासून मूळचीं क्रियापदें भिन्न मानण्याकरितां पाहिजे तर त्यास **सिद्ध** किंवा **मूळचे धातू**, व या दोहोंस आणि प्रातिपदिकांवरून झालेल्या धातूंस **साधित धातू** असें नांव द्यावें.

## प्रयोजक किंवा प्रयोज्यधातु

३१५ मुळधातूचा अर्थ जो व्यापार किंवा क्रिया, ती-विषयीं प्रवृत्ति करणें असा जेव्हां साधित धातूचा अर्थ असतो, तेव्हां त्यास **प्रयोज्य धातू** असें म्हणतात. जसें,

"व्रजकरवीं न तुम्ही बुध गुरुमर्यादातिपात करवा, हो!"

मोरोपंत.

या उदाहरणांत 'करवा' हें क्रियापदाचें रूप 'कर' धातूपासून प्रयोजना अर्थीं आलें आहे.

३१६ प्रयोज्य धातू करण्याचे नियम खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:—

(१) धातूस 'व' किंवा 'ईव' लागून प्राय: प्रयोज्य-धातू होतात; जसें—करणें—करवणें, करीवणें, बसणें—बसवणें, बसीवणें, इ०.

(२) धातूंचीं रूपें व्यंजनादि आख्यात प्रत्यय लावितांना दोन होतात, तशीं प्रयोज्य रूपेंही दोन होतात; म्हणून सर्व धातूंचीं रूपें चार चार आहेत. करणें=करवणें, करविणें, करीवणें, करीविणें; बसणें=बसवणें, बसविणें, बसीवणें, बसीविणें; इ०.

(३) हीं जी चार रूपें होतात तीं व्यंजनादि प्रत्यय असतां होतात; परंतु स्वरादि आख्यात प्रत्यय लाविल्यावर एकच रूप राहतें:—जसें, करवाल, बसवावें, इ०; परंतु करवशील, करविशील, करीवशील, इ०.

(४) कांहीं धातूंना हा प्रत्यय लागतांना पूर्वींच्या 'अ'चा विकल्पेंकरून 'आ' होतो; उदा० फिरणें, फिर-

विणें, फितावणें; निभणें, निभविणें, निभावणें, इ०; अनु-करणवाचक धातूंना नेहमीच हा नियम लागतो, म्हणजे नेहमीच 'आ' होतो; जसें. गटगटावणें, खुळखुळावणें, इ०

(५) कित्येक धातूंच्या अकारास वृद्धि व इतर स्वरांस गुण होऊन प्रयोज्य धातु सिद्ध होतात; व मूळ धातूंत टकार असल्यास त्याबद्दल डकार होतो; उदा०:—

| | |
|---|---|
| गळणें—गाळणें | गडणें—गाडणें. |
| चरणें—चारणें | टळणें—टाळणें. |
| जुटणें—जोडणें | वळणें—वाळणें. |
| तुटणें—तोडणें | मरणें—मारणें. |
| फुटणें—फोडणें | फिटणें—फेडणें. |
| पडणें—पाडणें | सुटणें—सोडणें. |
| दबणें—दाबणें | इ० इ०. |

(६) मूळधातूच्या आरंभींच्या इकारास व उकारास गुण होऊन प्रयोज्य रूपें होतात; मूळ धातूच्या रूपांत टकार असल्यास त्याबद्दल डकार होतो. व पकार किंवा तकार असल्यास वकार होतो. जसें:—

| | |
|---|---|
| जुडतो—जोडतो | सुटतो—सोडतो. |
| फिटतो—फेडतो | गुततो—गोवतो. |
| फुटतो—फोडतो | रुपतो—रोवतो. |
| खुपतो—खोवतो | इ० इ० |

(७) ज्या धातूंचीं प्रयोज्यरूपें कलम (५) व (६) प्रमाणें होतात, त्यांस त्या प्रयोज्य रूपांवरून पुनः 'वणें' किंवा 'इवणें' प्रत्यय लागून प्रयोज्यरूपें होतात. उदा० मारणें, मारवणें; तोडणें, तोडवणें; फोडणें, फोडवणें; इ०.

टीप—यांवरून कलम (५) व (६) यांतील धातंस साधित

धातू मानून आतांच्या कलमाप्रमाणें होणाऱ्या रूपांस मात्र प्रयोज्य रूपें असें म्हणावें, हा ही एक मार्ग आहे. परंतु विचाराअंतीं दिसून येईल कीं, कलम (५) व (६) यांतील रूपेंही प्रयोजक रूपेंच आहेत.

(८) धातु एकाक्षरी असल्यास किंवा त्याच्या शेवटीं 'ह' असल्यास त्यास 'वव' किंवा 'विव' लागून प्रयोज्यरूपें होतात; उदा० घेणें, घेविवणें; नेणें, नेविवणें; लिहिणें, लिहिविवणें; इ०.

टीप—परंतु हकारान्त धातूंचीं रूपें 'लिहिवणें,' 'पाहविणें,' अशींही होतात.

(९) कित्येक धातूंना अनियमित विकार होऊन प्रयोजकधातू होतात; जसें, पितो, पाजतो; येतो, आणतो; भितो, भेवडावतो; देखतो, दाखवितो; लागतो, लावतो; इ०

३१७ कित्येक धातूंचीं मूळचीं रुपें जाऊन प्रयोज्यरूपें मात्र प्रचारांत राहिलीं आहेत; जसें—ठेवणें, पाठवणें, बडविणें, धाडणें, इ०.

टीप—ठेवणें यांतला मुळचा 'ठे' धातु कवितेंत येतो; जसें—'राजकुमार धरोनि हातीं । उभी ठेली सन्मुख' मुक्त०

३१८ कित्येक धातू मुळचे प्रयोजक असावे असें दिसतें; परंतु मध्या त्यांचा उपयोग तसा होत नाहीं; उदा० पाठिवणें, बडविणें, कालवणें, काढणें ( कढणें ), पेटणें ( पिटणें ), लोटणें ( लुटणें ), इ०.

३१९ माणें, मावणें, सोकणें, सोकावणें, इ० धातूंत दुसरा पहिल्याचा प्रयोज्य आहे असें वाटतें; परंतु अर्थाला दोन्हीं सारखेच आहेत.

१२० प्रयोज्य किंवा प्रयोजक धातू नेहमीं सकर्मक असतात; व त्यांचीं सर्व काळांचीं रूपें इतर धातूंप्रमाणेंच होतात.

---

## शक्य क्रियापदें.

१२१ मागें सांगितलेलीं प्रयोज्य क्रियापदें जेव्हां कर्मणि किंवा भावी असतात, तेव्हां त्यांस **शक्य क्रियापदें** असें म्हणतात.

१२२ या साधित धातूंचा अर्थ मूळचा धातूचा अर्थ जो व्यापार, तो शक्य म्हणजे शक्तीचा विषय आहे, असा होतो.

१२३ शक्य क्रियापदें साधितांना प्रयोज्य क्रियापदें साधण्याचे सर्व नियम लागतात. परंतु नियम (५) व (६) यांवरून जसे प्रयोज्य धातू होतात तसे शक्य धातू प्रचारांत कमी आहेत; उदा० 'माझ्यानें सोडवतें' यापेक्षां 'मी सोडवितों' असें म्हणण्याचा प्रचार विशेष आहे.

१२४ मूळ धातु सकर्मक असल्यास शक्यरूप कर्मणि असतें; व मूळ धातु अकर्मक असल्यास हें रूप भावी असतें.

(अ) या धातूंचीं सर्व काळांचीं रूपें इतर धातूंप्रमाणें करावीं.

---

## प्रातिपदिकांवरून होणारीं क्रियापदें.

१२५ नामें व विशेषणें यांस कांहीं प्रत्यय लागून

धातू तयार होतात. हे मुख्य प्रत्यय दोन आहेत, एक 'आव' व दुसरा 'आळ'. जसें दुरावणें, दुणावणें, डोकावणें, वेडावणें, रागावणें, बळावणें, गुणावणें, माणसाळणें, पिसाळणें, पोटाळणें, हाताळणें, इ०

३२६ ह्या क्रियापदांचीं काळांचीं वगैरे सर्व रूपें इतर धातूंप्रमाणें करावी.

३२७ या दोन प्रत्ययांनीं नामादिकांपासून नवीन धातू होतात, त्याप्रमाणें आणखीही कित्येक प्रत्ययांनीं होतात. त्यांपैकीं कित्येक धातू येथें देतों—मोहरणें, फळणें, उजेडणें कोयाळणें, गजणें, डागणें, खिळणें, नटणें, शेवाळणें, विटाळणें, आनंदणें, हर्षणें, कोपणें, रोषणें, संतोषणें, प्रकाशणें, करवतणें, कातरणें, जपणें, त्यागणें, ताठणें, दाटणें, बावरणें, आखुडणें, लांचणें, रोगटणें, इ०

**टीप**—या उदाहरणांवरून दिसून येईल कीं, मूळ नामास किंवा विशेषणास प्रत्यय वगैरे न लागतां केवळ त्यासच क्रियापद मानून त्याचा तसा उपयोग करितात.



## धातुसाधित शब्द.

३२८ क्रियापदाच्या कालदर्शक रूपांशिवाय मूळ धातूंस प्रत्यय लागून धातुसाधित नामें, विशेषणें व अव्ययें होतात; यांचा क्रियापदांच्या जागीं उपयोग होतो.

३२९ वस्तुतः हें प्रकरण साधितशब्द-विचाराचा भाग आहे. परंतु ज्या धातुसाधित नामादिकांवरून क्रियापदांच्याप्रमाणेंच क्रियेचा बोध होतो, त्यांचा विचार येथेंच करणें प्रशस्त आहे असें वाटल्यावरून तसें केलें आहे.

१३० धातुसाधित नाम—धातूस 'णें' हा प्रत्यय लागून धातुसाधित नामें होतात. त्यांपासून मूळ धातूचा अर्थ जो व्यापार त्याचा बोध होतो; उदा० करणें. बोलणें, चालणें. वसणें निजणें. उठणें, इ०.

१३१ हीं नामें नपुंसकलिंगी असतात व यांचें सामान्यरूप 'आ' लागून 'करण्या,' 'चालण्या' असें होतें. (पहा, कलम ९२. (३).

१३२ वर्तमानकालवाचक विशेषण:—धातूस 'त' प्रत्यय लागून हीं विशेषणें होतात. धातू अकारान्त व सकर्मक असल्यास 'त' च्या मागें 'इ' आगम होतो. परंतु उभज धातूच्या गणांतील धातूंस हा आगम होत नाहीं. उदा० जात.येत. करीत. वाचित उठत.पढत. निजत, लिहीत. इ० या विशेषणास लिंगें लागत नाहींत. व यांचा उपयोग क्रियाविशेषणअव्ययांप्रमाणेही होतो.

१३३ वर्तमानकालवाचक अव्यय—धातूंस 'तां' अथवा 'तांना' हे प्रत्यय लागून अव्ययें होतात. हे प्रत्यय लागतांना धातूंस मागील कलमांत सांगितलेले विकार होतात. उदा० कर—करितां, करितांना; पढ, पढतां. पढतांना ने—नेतां, नेतांना, इ०.

१३४ दुसरें वर्तमानकालवाचक अव्यय 'ऊं' प्रत्यय लागून होतें. धातु एकाक्षरी असल्यास हा प्रत्यय विकल्पेंकरून 'वूं' असाही होतो. उदा० करूं बोलूं चालूं घेऊं अथवा घेवूं. जाऊं अथवा जावूं. इ०

१३५ भूतकालवाचक विशेषणें—कर्मणी व भावी भूतकालवाचक विशेषणें धातूंस 'ला' किंवा 'ल्ला' प्रत्यय

लागून होतात. हीं होतांना भूतकाळाचा प्रत्यय जो 'ला' त्याचे पूर्वीं होणारे सर्व विकार धातूस होतात; जसें, केला, केलेला; गेला, गेलेला; मारिला, मारिलेला; इ०.

३३६ 'ला' प्रत्ययान्त विशेषणांवरूनच मराठींतील भूतकाळाचीं रूपें साधलीं आहेत

३३७ भूतकालवाचक विशेषणांस लिंगवचनांचे विकार होतात.

३३८ **कर्तरि विशेषण**—हें धातूस 'ता' प्रत्यय लागून होतें व हा प्रत्यय लागण्याचे पूर्वीं धातूस वर्तमानकालवाचक विशेषणाचा प्रत्यय जो 'त' त्याच्या पूर्वीं होणारे फेरफार होतात; जसें, करिता, बोलता, चालता, येता जाता, इ०.

३३९ **भूतकालवाचक अव्यय**—हें धातूस 'ऊन' प्रत्यय लागून होतें; धातू एकाक्षरी असल्यास हा प्रत्यय विकल्पें 'वून' असा होतो. उदा० करून, बोलून, चालून, येऊन किं येवून, नेऊन किं. नेवून, इ०.

३४० **भविष्यकालवाचक विशेषण**—हें धातूस 'णार' प्रत्यय लागून होतें. याचा उपयोग विधिविशेषणासारखा झाल्यास त्यास लिंगें लागत नाहींत, नाहींतर लागतात. जसें—"तो आज मुंबईस जाणार आहे" "आज मुंबईस जाणारा गृहस्थ, जाणारी स्त्री, अथवा जाणारें मनुष्य, गाडींत एकही नाही." इ०.

३४१ **विध्यर्थक विशेषणें**—हीं विशेषणें धातूंस 'आव' प्रत्यय लागून होतात.

३४२ ये धातूचें रूप 'यावा' होतें; परंतु ने, घे, हो, दे, इ० धातूंच्या एकारास व ओकारास अनुक्रमें 'य' व 'व' हे आदेश होतात; जसे, न्यावा, व्हावा, घ्यावा, द्यावा, इ०.

३४३ या विशेषणांस लिंगें व वचनें यांचा विकार होतो; उदा०.

"कीं असा तरु पुरींत असावा,
त्यांतही स्वसदनांत **वसावा**" वामन.
"**वरावे** ते राजे तुजसम तुवां, राजतनये" वामन.

३४४ या विध्यर्थक विशेषणास स, ला व तें (कवितेंत) हे चतुर्थीचे प्रत्यय लावून त्यांना उपयोग नामांसारिखा करितात. हा त्यांचा उपयोग 'णें' प्रत्ययान्त नामासारिखाच होतो. जसें "मला काम करावयास फावलें नाहीं." म्ह० "करण्यास फावलें नाहीं."

३४५ या विशेषणांस चा, ची, चें, हे संबंधी विशेषणांचे प्रत्यय लागून नामें व विशेषणें करितात. धातु सकर्मक असल्यास ते शब्द विशेषणें होतात व अकर्मक असल्यास नामें होतात. जसें – 'मला हें काम **करावयाचें** (वि०) आहे;' 'मला आज मुंबईस **जावयाचें** (ना०) आहे; इ०.

३४६ केव्हां केव्हां अकर्मक धातु असून ही हे शब्द विशेषणें होतात, परंतु ते शब्द त्यावेळीं क्रियेच्या कर्त्याचीं, करणाचीं किंवा क्रियेच्या साधनाचीं विशेषणें असतात. 'जसें रामा आज मुंबईस **जावयाचा** आहे;' 'ही लेखणी **लिहावयाची** आहे;' 'तो घोडा बसावयाचा आहे;' इ०.

३४७ अशा रीतीनें झालेल्या नामांस **क्रियावाचक** नामें अथवा **विधिवाचक नामें** असें म्हणावें; व या रीतीनें होणारीं विशेषणें विधिविशेषणें होत. क्रियावाचक नामें हीं 'करावयास'

'करण्यास' इ० यांचे शेवटीं जरी चतुर्थीचा प्रत्यय लागून तीं साधलीं आहेत, तरी आतां त्या विभक्तीचा अर्थ जाऊन हीं रूपें प्रथमा किंवा द्वितीया विभक्तीचा बोध करितात.

३४८ चा, ची, चें, हे प्रत्यय लागून होणारीं क्रियावाचक नामें हीं याच प्रकारचीं होत.

*टीप*—क्रियावाचक नामांचा विशेष विचार पुढें योग्य ठिकाणीं केला आहे.

३४९ हीं सर्व धातुसाधित नामें, विशेषणें व अव्ययें मूळ संस्कृतांतील कृदंतांवरून म्हणजे धातुसाधित शब्दांवरून झालीं आहेत. कोणच्या संस्कृत रूपांवरून कोणचीं मराठी रूपें झालीं आहेत, हें सांगतों.

३५० 'णें' प्रत्ययान्त नामें हीं संस्कृतांतील 'अन'प्रत्ययान्त नामें जीं 'करण,' 'चालन,' 'चलन,' 'हनन,' इ०. यांच्या पासून झालीं आहेत.

३५१ 'अत,' 'इत' 'तां' आणि 'तांना' प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें व अव्ययें हीं संस्कृतांतील वर्तमानकालवाचक विशेषणें जीं 'अत्' किंवा त् प्रत्यय लागून होतात. त्यांपासून साधलीं आहेत.

३५२ 'अत' आणि 'इत' हे प्रत्यय त्या प्रत्ययांपासून झाले आहेत, परंतु 'तां' व 'तांना' हे प्रत्यय वरील प्रत्ययान्त विशेषणाचीं सप्तमीचीं रूपें होऊन झाले आहेत. या रूपांचा खालचे ओळींत शुद्ध सप्तमीसारिखा उपयोग केला आहे:—

'**देतां घेतां वदतां** श्रमवी सत्वांत गतगुणें काय'

येथें पहिल्या तिन्ही शब्दांचा अर्थ देण्यांत,' 'घेण्यांत,' बोलण्यांत' असा आहे.

३५३ 'ऊं'-प्रत्ययान्त अव्ययाचा प्रत्यय संस्कृतांतील 'तुम्' (कर्तुं, दातुं, गन्तुम् इ०) प्रत्ययावरून झाला आहे.

३५४ ला, ली, लें-प्रत्ययान्त विशेषणें संस्कृत 'त'-प्रत्ययान्त

भूतकालवाचक कर्मणि विशेषणें जीं 'कृत,' 'गत,' 'अस्त,' 'हत,' त्यांपासून झालीं आहेत, हें मागें सांगितलेंच आहे.

३५५ कर्तरि विशेषणाचा प्रत्यय जो 'ता' तो संस्कृतांतील 'तृ' प्रत्ययावरून झाला आहे.

३५६ भूतकाळवाचक अव्ययाचा प्रत्यय जो 'ऊन' तो संस्कृतांतील 'त्वा' प्रत्ययावरून होतो; (सं. त्वा, प्राकृ० तूण, ऊण, मरा० ऊन; उदा० सं. गृहीत्वा, प्रा० घेत्तुण, म० घेऊन इ०) कवितेंत कधीं कधीं 'ऊन' बदल उनी, उनियां, ओन, ओनी, ओनियां, ऊं, ओं, अशींही रूपें आढळतात. यांचीं उदाहरणें देऊन विस्तार करीत नाहीं.

३५७ 'णार' व 'णारा' हे भविष्यकालवाचक विशेषणाचे प्रत्यय संस्कृतांतील 'कार' या प्रत्ययावरून झाले आहेत. या प्रत्ययाचा अर्थ 'करणारा' असा आहे. याचा मुळचा अर्थ भविष्यकाळाचा नाहीं; परंतु मराठींत तसा अर्थ झाला आहे.



## संयुक्तकाळ.

३५८ मागें जीं धातुसाधित विशेषणें व अव्ययें सांगितलीं, त्यांतील कित्येकांपुढें व कित्येक शुद्ध क्रियापदांपुढें 'अस' या सहाय धातूचीं रूपें लागून संयुक्त काळ होतात.

३५९ वर्तमान, भूत व भविष्य या प्रत्येक काळाचे स्वाभाविक भेद खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

(१) **शुद्धकाळ**—याकाळीं क्रियापद संयुक्त नसून त्यावरून सामान्येंकरून ती क्रिया त्याकाळीं घडली असा बोध होतो. उ० करितों, केलें, करीन इ०.

(२) अपूर्णकाल—यावरून त्याकाळीं क्रियेची पूर्ण समाप्ति झाली नाहीं, झाली नव्हती किंवा झाली नसेल, असा बोध होतो; उदा० मी करीत आहें, करीत होतों, करीत असेन इ०.

(३) पूर्णकाल—यावरून त्या त्या काळीं त्या क्रियेची पुरी समाप्ति झाली असा बोध होतो. उदा० मी केलें आहे, केलें होतें, केलें असेल, इ०.

(४) रीतिदर्शककाल—यावरून क्रियेचा व्यापार सतत चालू आहे असा, अथवा क्रिया करण्याची किंवा होण्याची रीत आहे असा बोध होतो; जसें, मी करीत असतों, मी करीं अथवा करीत असें; इ०. हा भेद भविष्यकाळीं संभवत नाहीं.

२६० यावरून वर्तमानकाळाचे चार, भूतकाळाचे चार व भविष्यकाळाचे तीन, असे अकरा पोट भेद होतात; त्यांचीं नांवें व उदाहरणें:—'शीक' धातु;

मी शिकतों..............(शुद्ध) वर्तमानकाळ.
मी शिकत आहें-शिकतों आहें ... अपूर्णवर्तमान.
मी शिकलों आहें .............. पूर्णवर्तमान.
मी शिकत असतों.............. रीतिवर्तमान.

मी शिकलों ............ (शुद्ध) भूतकाळ.
मी शिकत होतों ............... अपूर्णभूत.
मी शिकलों होतों ...... ...... पूर्णभूत.
मी शिकें अथवा शिकत असें ... रीतीभूत.

मी शिकेन ... ... ... ... (शुद्ध) भविष्यकाळ.
मी शिकत असेन ... ... ... ... अपूर्णभविष्य.

मी शिकलों असेन ... ... ... पूर्णभविष्य.

टीप—यांवरून इतर धातूंनीं व इतर पुरुषांनीं रूपें करावीं.

२६१ विध्यर्थकरूपांमही हीं संयुक्तकाळाचीं रूपें होतात. शुद्ध विध्यर्थ दाखवावयाचा असतां करावें, बोलावें, जावें, अशीं मूळधातूंचीं रूपें येतात. परंतु इतर ठिकाणीं मूळ धातूस करित. केलें इत्यादि विकार होऊन 'अस' धातूचें 'असावें' हें रूप लागतें; त्याचीं उदाहरणें:—

करावें ... ... ... (शुद्ध) विध्यर्थ.
करित असावें ... ... ... अपूर्णविध्यर्थ.
केलें असावें ... ... ... पूर्णविध्यर्थ.

२६२ 'अस' धातूचीं विध्यर्थाचीं रूपें दुसऱ्या धातूंपुढें लागून जो संशयार्थी विध्यर्थ होतो, त्यावरून होणारीं संयुक्त क्रियापदें :—

तो असावा ... (शुद्ध) संशयार्थकविध्यर्थ.
तो जात असावा ... अपूर्णसंशयार्थकविध्यर्थ.
तो गेला असावा ... पूर्णसंशयार्थकविध्यर्थ.

२६३ संशयार्थक विध्यर्थाचीं रूपें सकर्मक धातूंवरून होत नाहींत. त्या धातूंवरून होणारीं रूपें शुद्ध विध्यर्थाचीं होत. जसें, 'त्यानें करीत असावें' 'तुम्हीं बोलत किंवा वाचीत असावें' इत्यादि. यांची मुख्य खूण अशी आहे कीं, हीं वाक्यें भावीप्रयोगघटित आहेत.

२६४ संकेतार्थावरून संयुक्तक्रियापदें होतात तीं:—

मी असतों-करितों इ०...(शुद्ध) संकेतार्थ.
मी करीत असतों ... ... ... अपूर्णसंकेतार्थ.
मी बसलों असतों ........ पूर्णसंकेतार्थ.

३६५ या अर्थाचीं दुसरीं रूपें होतात, तीं अशीं:—

मी असलों . . . . . . (शुद्ध )संकेतार्थ.
मी बसत असलों . . . . . . . अपूर्णसंकेतार्थ.
मी बसलों असलों . . . . . . . पूर्णसंकेतार्थ.

३६६ संयुक्तकाळ मानण्याचे संबंधाचा आजपर्यंतचा प्रघात पाहिला, तर 'भूत वर्तमान,' 'वर्तमान भूत,' 'भविष्य भूत' इत्यादि नांवें देऊन वर सांगितल्या शिवाय आणखी ही अनेक संयुक्तकाळ मानिले आहेत; व मराठी क्रियापदांची सरणी पाहिली, तर ह्या काळांची संख्या कोठपर्यंत वाढेल याचा कांहींच नियम सांगतां येत नाहीं. तेव्हां हा सर्व घोटाळा नाहींसा होऊन कांहीं तरी योग्य व्यवस्था व्हावी, म्हणून असें मानणें प्रशस्त दिसतें, कीं या प्रकरणाचे आरंभी सांगितलेले जे काळांचे स्वाभाविक भेद तेवढे मात्र संयुक्त काळ मानावे, व तेही 'अस' धातूवरून होणारे तेवढेच मानावे. बाकीच्या संयुक्त क्रियापदांतील पहिल्या भागास वाक्यांतील अन्वयाप्रमाणें विशेषणें किंवा अव्ययें मानून पुढील भागास मात्र क्रियापदें असें म्हणावें.

३६७ सध्या प्रचारांत असलेलीं 'भूतभविष्य,' 'वर्तमानभूत' इत्यादि जोड नांवेंही अप्रशस्त दिसतात; कारण भूत तो भविष्य कसा व वर्तमान तो भूत कसा! म्हणून हीं नांवें ही या पुस्तकांत न घेतां 'अपूर्ण' 'पूर्ण' इत्यादि शब्दांची योजना केली आहे.

टीप—वर सांगितल्याशिवाय बाकीच्या संयुक्त क्रियापदांचा विचार पुढें केला आहे; कारण तीं संयुक्त क्रियापदें काळांचे संबंधाचीं नसून फक्त वाक्यार्थाचे संबंधाचीं आहेत.



## अव्ययें.

३६८ ज्या शब्दांस अव्यय म्हणजे विभक्ति, पुरूष, लिंग, इत्यादिकांचा विकार होत नाहीं, त्यांस **अव्ययें** असें म्हणतात. जसें, परंतु, लौकर, मग, पुनः, अथवा, वर, कडे, खालीं, अहाहा! इ०.

३६९ अव्ययांचे मुख्य चार भेद आहेत. १ **क्रियाविशेषण अव्यय; २ उभयान्वयी अव्यय; ३ शब्दयोगी अव्यय; आणि ४ केवलप्रयोगी अव्यय.**

३७० अव्ययांच्या वर्गांत येणारे कित्येक शब्द पूळचे सविभक्तिक असून आतां ते केवळ उपयोगावरून अव्ययांत मोडतात; जसें—खालीं, पाशीं, पासून, मागें, जात्या, तस्मात्, इ०.



## क्रियाविशेषणअव्ययें.

३७१ जीं अव्ययें धात्वर्थाशीं किंवा विशेषणाशीं अथवा दुसऱ्या अव्ययांशीं अन्वय पावून त्यांचा अर्थ संकोचित किंवा विस्तृत करितात, त्यांस **क्रियाविशेषणअव्ययें** असें म्हणतात.

३७२ क्रियाविशेषणअव्ययें तीन प्रकारचीं आहेत. १ **शुद्धअव्ययें**—हळू, झटकन, वारंवार, इ०. २ **धातुसाधितअव्ययें**—करितां, जाऊं, बोलतांना, इ०. [यांवरून क्रियेचा बोध होतो; व धातु सकर्मक असल्यास कर्म असणें इत्यादि कार्यें यांस पडतात]. ३ **सविकारक्रियाविशेषणें**—हीं मूळचीं अव्ययें नसून विशेषणें आहेत,

परंतु यांचा क्रियार्थाकडे संबंध असल्यामुळें त्यांस क्रियाविशेषणअव्ययें असें म्हणावें लागतें; जसें, 'रामानें श्लोक **चांगला** वाचला,' 'तो **वांकडें** बोलतो,' इ०.

३७३ या तिसऱ्या प्रकारच्या क्रियाविशेषणांस लिंगवचनाचा विकार होतो. 'तो **मोठा** उनाड आहे,' 'ती **मोठी** चतुर आहे,' 'तीं पाखरें **मोठीं** चपळ दिसतात,'इ०

३७४ या प्रकारच्या क्रियाविशेषणांस लिंगवचन लागण्याचें नियम खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

(१) हे लिंगवचनप्रयुक्त विकार फक्त आकारान्त क्रियाविशेषणांस होतात. आकारान्त म्हणजे ज्याचें पुल्लिंगी रूप आकारान्त असतें तीं.

(२) जेव्हां ह्या क्रियाविशेषणांचा अन्वय क्रियेच्या भावाकडे किंवा क्रियेचा अर्थ जो व्यापार त्याकडे असतो, तेव्हां तीं नपुंसकलिंगी एकवचनी असतात; उदा० 'तो चांगलें लिहितो,' 'ती उभें शिवते,' इ०.

टीप—अशा प्रकारचा उपयोग करणें हें बोलणाराचे मर्जीवर असतें.

( ३ ) क्रियाविशेषणाचा अन्वय ज्या धातूकडे असतो तो अकर्मक असल्यास कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें क्रियाविशेषणास विकार होतो; जसें,'तुझा पतंग चांगला उडतो;' 'तुमची वावडी चांगली उडत नाहीं;' 'त्या दांड्या तिरप्या बसल्या;' 'खेकडे उलटे चालतात;' इ०.

( ४ ) धातु सकर्मक असल्यास विकारी क्रियाविशेषणें कर्माप्रमाणें फिरतात; जसें, 'त्यानें श्लोक **चांगले**

वाचिले, दिव्या चांगल्या म्हटल्या, पदें चांगलीं गाइलीं,' इ०.

(९) नियम (२) प्रमाणें रूप बदलण्याचें जरी बोलणाराचे मर्जीवर आहे, तथापि कित्येक ठिकाणीं रूप बदलावेंच लागतें; जसें, 'माझा पतंग चांगला उडतो;' 'तुझ्या वावड्या चांगल्या उडत नाहींत;' या उदाहरणांत क्रियाविशेषण कर्त्याप्रमाणेंच असलें पाहिजे; तसेंच 'ते मुलगे श्लोक चांगले म्हणतात' 'त्या मुली चोळ्या चांगल्या शिवतात' या उदाहरणांत क्रियाविशेषणें कर्माप्रमाणेंच असलीं पाहिजेत.

३७५. सम, सदृश, सारिखा, इत्यादि ज्या गुण विशेषणांचे योगानें सामान्यरूप होतें, त्यांचाच क्रियाविशेषणासारखा उपयोग झाला असतांही सामान्यरूप होतें; जसें, 'त्याच्यासारखें तो बोलतो,' इ०.

३७६ क्रियाविशेषणाच्या उपयोगावरून त्यांच्या खालीं लिहिल्याप्रमाणें निरनिराळ्या जाती मानितां येतील :—

(१) **स्थलवाचक**–येथें, जेथें, तेथें, इकडे, तिकडे, जवळ, दूर, पुढें, मागें, पलीकडे, वर, खालीं, आंत, बाहेर इ०.

(२) **कालवाचक**–नेहमीं, काल, उद्यां, परवां, आतां, पूर्वीं, नंतर, जेव्हां, एव्हां, केव्हां, तेव्हां, शेवटीं, लागलाच, वारंवार दरसाल, यंदां, गुदस्तां इ०.

(३) **गुणवाचक किंवा प्रकारवाचक**–बरें, चांगलें, हळू, मोठ्यानें, इ०.

(४) **क्रमवाचक**–प्रथमतः, पहिल्यानें, दुसऱ्यानें, इ०.

(५) **संख्यावाचक व परिमाणवाचक**–एकदां, दोनदां, पुष्कळ, बहुत, कमी, इ०.

(६) **निश्चयार्थक व संशयार्थक**–होय, खचीत, खरोखर, कदाचित्, क्वचित्, बहुशः, बहुधा, दैवगत्या, दैववशात्, बहुतकरून, प्रायः, निःसंशय, निभ्रांत, इ०.

(७) **अनुकरणवाचक**–चटकर, चटकन, पटदिशीं, झटझट, भडाडा, झपाझप, टपटप, टपकन, इ०.

(८) **अभाववाचक**–न, ना, इ०.



## उभयान्वयी अव्ययें.

३७७ ज्या अव्ययांच्या योगानें दोन समजातीय शब्द किंवा दोन वाक्यें जोडिलीं जातात, त्यांस **उभयान्वयीअव्ययें** म्हणतात; उदा० 'तो शहाणा व श्रीमंत आहे' 'मला साखर आणि पाणी दे,' इ०. उभयान्वयी अव्ययांचे मुख्य भेद खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

(१) **समुच्चयवाचक**–आणि, व, आणखी, इ०.

(२) **विकल्पबोधक**–वा, किंवा, अथवा, अगर, कीं, इ०.

(३) **पक्षांतरबोधक**–पण, परंतु, अथवा, किंवा, नाहींतर, पेक्षां, पक्षीं, इ०.

(४) **संकेतबोधक**–जर, तर, जरी, तरी, यद्यपि, तथापि, इ०.

(५) **हेतुबोधक** किंवा **कारणबोधक**–म्हणजे, म्हणून, तरमग, इ०.

(६) **स्वरूपबोधक**–कीं, जे, ऐसाजे, इ०.

(७) **अवधारणाबोधक**-* च, ही, ना, मात्र, पण, देखील, सुद्धा, इ०.



## शब्दयोगी अव्ययें.

१७८ जीं अव्ययें प्रातिपदिकांचा क्रियापदाशीं विभक्तिसंबंध दाखवितात, त्यांस **शब्दयोगीअव्ययें** असें म्हणतात; उदा० करितां, साठीं, वर, खालीं, कडे, वांचून खेरीज, इ०.

१७९ हीं अव्ययें ज्या नामांस लागतात त्या नामाचें सामान्यरूप होतें. हें सामान्यरूप होताना मागें विभक्तिविचारांत सामान्यरूप होण्याचे जे नियम सांगितले आहेत, तेच लागतात.

१८० कित्येक शब्दयोगी अव्ययें व क्रियाविशेषण अव्ययें यांच्या स्वरूपांत मुळींच भेद नाहीं. तीं ओळखण्याची रीत अशी आहे कीं, ज्या अव्ययांचा नामांशीं योग होऊन त्या नामांचें सामान्यरूप होतें, तीं शब्दयोगी अव्ययें होत; व ज्यांचा नामाशीं तसा योग नस-

* या अव्ययांस 'शुद्धशब्दयोगी अव्ययें' असें नांव देऊन शब्दयोगी अव्ययाचा तो एक पोटभेद आहे, असें समजतात. परंतु शब्दयोगी अव्ययांचे दोन मुख्य गुण जे विभक्तींचा बोध करणें, व तीं ज्या नामांपुढें येतात त्यांचें सामान्यरूप होणें, ते दोन्ही या अव्ययांत सांपडत नाहींत मग यास शब्दयोगी अव्ययें कां म्हणावयाचें ? दोन शब्द किंवा दोन वाक्यें अगर वाक्यांश जोडणें हें उभयान्वयी अव्ययाचें लक्षण यांवर चांगलें लागू पडतें. यामुळें हीं या अव्ययाखालीं घातलीं आहेत.

तो, तीं क्रियाविशेषण अव्ययें; उदा० 'घरावर' यांत 'वर' हें शब्दयोगी अव्यय आहे, परंतु तो 'वर' आहे यांत वर हें क्रियाविशेषण अव्यय आहे. याचप्रमाणें 'तो मागें आहे,' 'बापामागें त्यानें साऱ्याचें वाटोळें केलें.' यांतील 'मागें' या शब्दाच्या संबंधानें समजावें.

टीप—यावरून एकच शब्द एकदां शब्दयोगीअव्यय व दुसऱ्यावेळीं क्रियाविशेषणअव्यय असूं शकेल.

३८१ शब्दयोगीअव्ययें विभक्तींचें काम करितात. प्रत्येक विभक्तींचीं मुख्य मुख्य शब्दयोगी अव्ययें मागें विभक्तिप्रकरणीं सांगितलीं आहेत. कित्येक व्याकरणकार ज्यांना शब्दयोगीअव्ययें म्हणतात, त्यानांच दुसरे कित्येक विभक्तिप्रत्यय असें समजतात. परंतु हीं अव्ययें व प्रत्यय यांमधील भेद असा मानावा कीं, ज्यांना स्वतंत्र अर्थ आहे, तीं अव्ययें; व ज्यांना तसा अर्थ नाहीं, ते प्रत्यय; उदाहरणार्थ 'रामाहून' यांत 'हून' यास स्वतंत्र अर्थ नाहीं. म्हणून तो प्रत्यय; व 'रामावर' किंवा 'रामांत' या शब्दांतील 'वर' व 'आंत' यांस स्वतंत्र अर्थ आहे, म्हणून तीं अव्ययें होत.

३८२ कित्येक शब्दयोगी अव्ययें मूळची इतर जातींचे शब्द आहेत; व कित्येक मूळचीं नामांचीच सविभक्तिक रूपें आहेत; यामुळें क्वचित् स्थळीं अशा शब्दयोगी अव्ययांच्या योगानें सामान्यरूप होत नाहीं. 'पावेतों' व 'पर्यंत' हीं अव्ययें शब्दापुढें आलीं असतां सामान्यरूप केव्हां करितात किंवा केव्हां करीत नाहींत; उदा० 'पुण्या पावेतों' 'तळेगांव पावेतों' किंवा 'तळेगांव पर्यंत' इ०.

३८३ परंतु हा विकल्प विशेषतः अकारान्त नामांस लागू आहे. शब्द आकारान्त किंवा एकारान्त असला तर सामान्यरूप नियमानें होतें; उ० 'राज्यवाड्यापर्यंत,' 'नर्मदेपावेतो,' इ०.

३८४ परंतु भर, पावेतों व पर्यंत यांपासून जेव्हा कालावधीचा बोध होतो, तेव्हा त्यांवरून सामान्यरूप नेहमींच होत नाहीं; जसें, 'रात्रभर,' 'गांवभर,' इ०.

३८५ शब्दयोगी अव्ययास 'ऊन' प्रत्यय लागून [illegible] शब्दयोगी अव्ययें होतात. हा प्रत्यय लागतांना शब्दांती [illegible] किंवा 'ए' हे स्वर असल्यास त्यांचा व अनुस्वाराचा लोप होतो; [illegible] वर, वरून, खालीं, खालून, मागें, मागून, इ०.

३८६ जेव्हा, तेव्हा, काल, आज, उद्यां, परवां, इ० कालवाचक, व जेथें, तेथें, खालीं, वर इत्यादि स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें यांना 'पासून' व 'पर्यंत' हीं शब्दयोगी अव्ययें लागतात; व तीं लागलीं असतां त्या क्रियाविशेषणांना नामाप्रमाणें अर्थ होतो; जसें, 'तेव्हांपासून' म्हणजे त्यावेळेपासून; 'तेथपर्यंत' म्हणजे त्या जागेपर्यंत, इ०.

३८७ हीं शब्दयोगी अव्ययें लागतांना क्रियाविशेषणाचें सामान्यरूप होत नाहीं, परंतु एकाराचा व ईकाराचा अकार होतो, व अनुस्वाराचा लोप होतो; उदा० (तेथें + पासून) तेथपासून; (खालीं+पासून) खालपासून; इ०.

३८८ कित्येक स्थळवाचक शब्दयोगी अव्ययांस चा, ची, चें, ला, ईल, इ० प्रत्यय लागून विशेषणें होतात; या विशेषणांचे योगानेंही शब्दयोगी अव्ययांप्रमाणें नामाचें सामान्यरूप होतें; उ० 'घराखालची किंवा घराखालील जमीन,' 'देवा पुढला, पुढचा किंवा पुढील पैसा; इ०.

३८९ क्रियाविशेषण अव्ययांप्रमाणेंच या अव्ययांचे स्थळवाचक, कालवाचक इत्यादि भेद अर्थावरून करितां येतील.

---

## केवळप्रयोगी अव्ययें

१९० जीं अव्ययें बोलणाराचे मनांतील हर्ष, शोक, आश्चर्य, तिरस्कार, इ० उद्गारांचा बोध करितात, त्यास **केवळप्रयोगी अव्ययें** असें ह्मणतात; जसें, छिः, थुः, अंः, वाहवा, इ०.

टीप—या अव्ययांचा वाक्यांत इतर भागांशीं कांहीं संबंध नसतो यामुळें हीं वाक्यांतून काढलीं असतां व्याकरणदृष्ट्या कांहीं उणीव दिसणार नाहीं.

१९१ कांहीं केवळप्रयोगी अव्ययें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

(१) **धिक्कारदर्शक**—छी, छिः, अंः, छ, छित, उंः,धिक्.

(२) **तिरस्कारदर्शक**—इश्श, थुत, इ०.

(३) **दुःखवाचक**—हाय हाय! अरेरे! आई आई! इ०.

(४) **हर्षवाचक**-वाहवा! वाः! इ०

(५) **धन्यतादर्शक**—वाहवा, शाबास, भले! इ०

(६) **आर्जवदर्शक**—जी, साहेब, महाराज! इ०.

(७) **आश्चर्यदर्शक**—अहा, अबब, बबब, कायहो! इ०.

(८) **संबोधनार्थक केवळ प्रयोगी अव्ययें**- खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत; यांस लिंगें व वचनें असतात:—

| एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- |
| पु. अरेरे, अगा, अजी,<br>स्त्री. अगे, अहो, ग. | अहो, हो, अगा, अजी. |



# साधितशब्दविचार.



३९२ शब्दांचे सिद्ध आणि साधित असे दोन भेद मागें सांगितले आहेत. पुष्कळ शब्द दुसऱ्या शब्दांस प्रत्यय लागून होतात, किंवा एकापेक्षा ज्यास्त शब्द एकत्र मिळून झाले असतात. अशा शब्दांस **साधितशब्द** असें म्हणतात.

३९३ या शब्दांचे दोन प्रकार करितां येतील. १ एकापेक्षां ज्यास्ती शब्द एकत्र होऊन बनलेले शब्द—ज्यांस **समास** अशी संज्ञा आहे; व २ प्रत्ययघटित शब्द.

## समास.

३९४ दोन अथवा अधिक शब्दांतील संबंधाचा म्हणजे परस्पर अन्वयाचा लोप होऊन त्यांचा एकच शब्द होतो, तेव्हां त्या शब्दास **समास** असें म्हणतात. जसें, 'गजमोजणी,' 'राजवाडा,' 'काळपुरूष,' 'वाकडमान्या.' इ०

३९५ 'समास' या शब्दाचा अर्थ संक्षेप असा आहे. समास केलेल्या शब्दांचा परस्परांशीं जो संबंध त्याचा संक्षेप केलेला असतो, म्हणून अशा शब्दरचनेस **समास** असें म्हणतात.

३९६ समासरूप शब्दांचा अर्थ उघड करून दाखविणाऱ्या शब्दांस **विग्रह** असें म्हणतात; जसें, 'गजानें जी मोजणी ती' 'राजाचा जो वाडा तो' 'काळासारिखा जो पुरुष तो' 'वाकडी आहे मान ज्याची तो;' हे 'गजमोजणी' 'राजवाडा' 'काळपुरूष' 'वाकडमान्या' या समासांचे **विग्रह** जाणावे.

३९७ शब्दांचा समास झाल्यानंतर बहुधा शेवटच्या शब्दासच

विभक्ति वगैरे विकार होतात. मागील सर्व शब्द संधिनियमानें संयोग पावून त्या एकाच शब्दाचे अवयव बनतात.

३९८ या समासांचे मुख्य भेद चार आहेत; १ **तत्पुरुष**; २ **द्वंद्व**; ३ **बहुव्रीहि** आणि ४ **अव्ययीभाव**.

## तत्पुरुष.

३९९ या समासांत पुढील पद मुख्य असून मागल्या पदाचा त्याच्यावर विभक्तीनें किंवा विशेष्य विशेषणभावानें संबंध जोडिलेला असतो; जसें, 'राजपुत्र' यांत 'पुत्र' हा शब्द मुख्य असून 'राजा' या शब्दाचा 'राजाचा' या संबंधी विशेषणानें किंवा षष्टीनें त्याच्याशीं संबंध जोडिला आहे. तसेंच 'शुक्लपक्ष' या उदाहरणांत 'पक्ष' शब्द मुख्य असून 'शुक्ल' हा शब्द विशेषण म्हणून त्याच्याशीं जोडला गेला आहे.

४०० तत्पुरुषाचे १ **विभक्तितत्पुरुष**; २ **नञ्‌तत्पुरुष**; ३ **उपपदतत्पुरुष** व ४ **कर्मधारय** असे भेद आहेत; व **कर्मधारयाचे** पुनः (१) **मध्यमपदलोपी** व (२) **द्विगु** हे पोटभेद आहेत.

४०१ विभक्तितत्पुरुषामध्यें पहिल्या पदाचा दुसऱ्या पदाशीं अन्वय विभक्तीचे योगानें दाखविला जातो, व ती विभक्ति लुप्त होते; ज्या लुप्त विभक्तीनें हा संबंध जोडला जातो, त्या विभक्तीचें नांव त्या समासास देतात.

टीप—मराठींत षष्ठी विभक्ति नाहीं; परंतु संस्कृत समासाशीं साम्यता होण्यासाठीं पूर्वशब्दास 'चा, ची, चें'-प्रत्यय लागून होणारे समासास षष्ठीतत्पुरुष समास म्हणण्यास चिंता नाहीं.

४०२ या विभक्तितत्पुरुषांचीं उदाहरणें:—

[१] द्वितीयातत्पुरुष—द्विजदंड (द्विजाप्रत जो दंड तो); परपीडा (पराप्रत जी पीडा ती); दुःखप्राप्त (दुःखाप्रत मिळालेला); अंगचोर; कृष्णाश्रित; घोडफोड्या; इ०

[२] तृतीयातत्पुरुष—कृपावलोकन (कृपेनें जें अवलोकन तें); तोंडपाठ (तोंडानें पाठ); गजमोजणी (गजानें मोजणी); उपासमार; दयार्द्र; भक्तिवश; द्रव्यसाध्य; मातृसदृश; नखभिन्न; वस्त्रगाळ; ईश्वरनिर्मित; घोडमात,-घोडेमात, प्यादेमात; अंगजड; कपाळकरंटा; हातघाई; इ०.

[३] चतुर्थीतत्पुरुष—गायरान (गाईकरितां म्ह० गुरांकरितां जें रान तें); पोळपाट (पोळीसाठीं जो पाठ तो); बाजारबाडा; बाईलवेडा; कृष्णार्पण; यज्ञस्तंभ; पूजाद्रव्य; काकबलि; लोकराक्षित; डोईजड.

[४] पंचमीतत्पुरुष—स्वर्गपतन (स्वर्गापासून पतन); चोरभय (चोरापासून भय); पापविमोचन; भवतारण; ऋणमोचन; इ०.

[५] षष्ठीतत्पुरुष—राजवाडा (राजाचा वाडा); केळफूल; पिंपळपान; हातचाळा; देवपूजा; देवालय; भूपति; सूर्यप्रकाश; इ०.

[६] सप्तमीतत्पुरुष—रानमांजर, (रानांत [असणारें] मांजर) पानबुड्या, स्वर्गवास (स्वर्गांतवास); ग्रहप्रवेश, कर्मकुशल, शास्त्रनिपुण, शिल्पपाटव, कूपमंडूक, दैवाधीन, कलाकुशल, घरकोंबडा, दानशूर, रणशूर, अवमानघातकी, घरजांवई, इ०.

४०३ या समासांत केव्हां केव्हां पूर्व विभक्तीचा लोप होत नाहीं, तेव्हां त्यास **अलुक्समास** म्हणतात. उदा० युधिष्ठीर (युद्धामध्यें स्थीर); दिवस्पति, वाचस्पति, पंकेरुह, परस्मैपद, कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग, इ०.

४०४ शुद्ध मराठी तत्पुरुषसमासाच्या पहिल्या पदाच्या विभक्तीचा लोप झाला, तरी केव्हां केव्हां सामान्यरूप तसेंच राहतें. या प्रकारच्या समासांसही **अलुक्समास** म्हणावें; जसें, '**पिशाच्चाहातीं** कोलीत' 'मिळी बोलुनि बोल सुंदर असे **रामाकरीं** तीं फळें;' 'हरिश्चंद्र तारा राणी। **डोंबाघरीं** भरी पाणी;' घोडेमात, प्यादेमात, इ०.

४०५ केव्हां केव्हां समासांतील मुख्य शद्ब प्रथम येऊन विभक्तियुक्त असणारा शद्ब मागून येतो; जसें, राजहंस (हंसांचा राजा); अर्धरात्र (रात्रीचें अर्ध); पूर्वकाय (कायाचें म्ह० शरीराचें पूर्व, म्हणजे पुढला भाग).

४०६ सर्वनामांच्या विभक्तीचा जेव्हां समासांत लोप होतो, तेव्हां त्या सर्वनामांबद्दल त्यांचीं संक्षिप्त संस्कृतरूपें योजितात; मी बद्दल मत् योजितात. उदाहरण, मत्कार्य, मदुद्धरण, मत्तात, मन्मन, मज्जन्म, इ०.

तूं-बद्दल त्वत्—त्वद्गुण, त्वल्लीला, इ०.

तो, ती, तें, तें, त्या, तीं, } बद्दल—तत्=तच्चारित्र, तद्गौरव, तन्नाम, तद्रूप, इ०.

आम्ही याबद्दल—अस्मत्=अस्मद्भाग्य, अस्मदपराध.

तुम्ही याबद्दल—युष्मत्=युष्मत्कीर्ति, युष्मदौदार्य, इ०.

हा, ही, हें, हे, ह्या, हीं, } याबद्दल—एतत्=एतद्देशीय, एतन्मात्र, इ०.

४०७ 'आपलें' या सर्वनामरूपाच्या ठिकाणीं 'निज' 'स्व' हीं रूपें येऊनही समास होतात; जसें, स्वजाति, निजरूप, स्वभाषा, स्वदेश, निजधाम, निजतनु, इ०. कोठें 'आत्म' किंवा 'आपलें' यांतला 'आप' एवढाच अंश समासांत राहिलेला दृष्टीस पडतो; जसें, आपखुशी, आपस्वार्थ, आपमतलब, इ०.

४०८ द्वितीयपद धातुसाधित शब्द कृदन्त किंवा क्रियेचें रूप असून जे तत्पुरुष समास होतात त्यास उपपदतत्पुरुष असें म्हणतात; उदा० गृहस्थ (गृहात राहणारा); अनुग (मागून जाणारा); खेचर (आकाशात फिरणारा); कच्छप, शेषशाई, अधिप, ग्रंथकार, नृपपक, इ०.

४०९ वरचे शब्द हे शुद्ध संस्कृत शब्द आहेत; आगलाव्या, कंचरमोड्या, पायमळ्या, भाजीविक्या, मासखाऊ, व्याजखाऊ, खेटरखाऊ, इ० याचप्रकारचीं शुद्ध मराठी भाषेंतलीं उदाहरणें आहेत.

४१० शब्दामागें उपसर्ग किंवा अव्यय येऊन होणारे तत्पुरुष समास याच वर्गांत गणावे; जसें, पर्यटन, (परि + अटन), कुवासना ( कु वाईट + वासना ), विजय, पराजय, इ०.

४११ नकारार्थक अकाराचा जो दुसऱ्या पदाशीं समास होतो, त्यास नञ्तत्पुरुष म्हणतात; जसें, अहित, अयोग्य (नव्हे योग्य), अभाव, अब्राह्मण,इ०. अकाराच्या पुढील शब्दाचे आरंभीं स्वर असल्यास 'अ'चा 'अन्' होतो; उदा० अनर्थ, अनिष्ट, अनुपकार, इ०.

४१२ **कर्मधारय**—जेव्हां पहिला शब्द **विशेषण**,

किंवा विशेषणसदृश शब्द असतो, किंवा जेथें उपमानें* उपमेय संबंध असतो, तेव्हां त्यास **कर्मधारयसमास** असें म्हणतात; जसें, काळमांजर, तांबडमाती, महदुपकार, चोरघडी, घडकाम, मुखकमल, काव्यामृत, इ०.

टीप—वरील उदाहरणाचे विग्रह 'काळें असें मांजर' 'तांबडी अशी माती' 'महान् असें उपकार' 'चोर (गुप्त) अशी घडी' 'घडकाम -घडलेलें काम' 'मुख हेंच कमळ' 'काव्य हेंच अमृत' असे करावे.

४१३ कधीं कधीं मुख्य शब्द प्रथम येऊन मग विशेषण येतें जसें, पुरुषोत्तम (पुरुषांमधील उत्तम), छात्रवंचक (लबाड शिष्य), इ०.

४१४ कांहीं समासांत दोन्ही पदें विशेषणें असतात; उदा० कृताकृत (केलेला आणि न केलेला) शुक्लकृष्ण, नवपाठक, दृष्टादृष्ट, इ०.

४१५ उपमा असल्यास उपमानपद प्रथम येतें अथवा मागूनही येतें; जसें, चंद्रमुख, मुखचंद्र, मेघश्याम, नरसिंह, इ०.

४१६ कर्मधारयसमासाचे जे वर रचनेच्या संबंधाचे प्रकार सांगितले, त्यांवरून त्याचे खालीं लिहिलेले भेद होतात:—

(१) विशेषणपूर्वपद—उ० तांबडमाती, काळसर्प, रक्तांबर.
(२) विशेषणोत्तरपद—उ० घननील, प्रसंगविशेष (विशेष प्रसंग.)

---

* उपमान म्हणजे ज्याची उपमा द्यावयाची तें; व उपमेय म्ह० ज्यास उपमा द्यावयाची तें; जसें, 'चंद्र-मुख' यांत मुखास चंद्राची उपमा दिली आहे, म्हणून 'चंद्र' उपमान व 'मुख' उपमेय होय.

(३) विशेषणोभयपद—उ० कृताकृत, लालभडक, हिरवाचार.
(४) उपमानपूर्वपद—उ० कमलमुख, वज्रदेह.
(५) उपमानोत्तरपद—उ० चरणपल्लव, मुखचंद्र.
(६) अवधारणापूर्वपद—उ० कालसर्प, विद्यासर्वस्व, भवसागर.

४१७ ज्या कर्मधारय समासांत दोन मुख्य पदांमधील पदांचा लोप झालेला असतो, त्यास **मध्यमपदलोपी** समास म्हणतात. उदा० गुडधाना (गुळानें युक्त अशा धाना म्ह० लाह्या, गुडदाणी मराठी) साखरभात, कानरविडा, घरजावई, कर्वतकीस, लाकूडकाम, गर्भश्रीमंत, बाळमित्र, लोणकढें (तूप), इ०.

४१८ नात्याचे वाचक शब्द चुलत भाऊ, आतेबहीण, आजेसासू, चुलतसासरा, भाचेसून वगैरे **मध्यमपदलोपीसमास** जाणावे.

४१९ ज्या कर्मधारयांत पहिलें पद संख्याविशेषण असतें, त्यास **द्विगुसमास** म्हणतात. हे समास संस्कृतांत प्रायः नपुंसकलिंगी किंवा स्त्रीलिंगी व एकवचनी असतात; उदा० त्रिभुवन, अष्टाध्यायी, पंचवटी, चतुर्युग, पांचशेरी, तीनवार, पंचाग्नी, पंचबाणें, अठराबाबु, बारभाई, इ० 'त्रिभुवन'=तीन भुवनांचा समुदाय; 'पांचशेरी'=पांच शेरांचें एक माप; 'बारभाई'=बारा जणांचा कारभार; इ० असे याचे विग्रह करावे.



## बहुव्रीहिसमास.

४२० ज्या समासांत कोणतेंच पद मुख्य नसून दोन्हा पदें मिळून होणाऱ्या समासानें निराळ्याच अर्था-

चा बोध होतो, किंवा तिसराच पदार्थ दाखविला जातो, त्यास **बहुव्रीहिसमास** असें म्हणतात; उदा० चक्रपाणी, यांत 'चक्र' किंवा 'पाणी' यांतला कोणाचाच शब्द मुख्य नसून दोन्हीं मिळून 'चक्र आहे पाणीच्या ठायीं म्ह० हातीं ज्याच्या तो' असा तिसराच पुरुष (म्ह० विष्णु) जाणिला जातो; तसेंच 'गजानन म्ह० 'गजाचें आनन आहे ज्याला तो;' 'पीतांबर' म्हणजे 'पीत आहे अंबर म्ह० वस्त्र ज्याचें तो;' त्याचप्रमाणें 'चंद्रमुखी,' 'मृगनयना,' 'सांब,' 'त्रिनयन,' 'त्र्यंबक,' 'चंद्रमौळी,' इ० शब्द या समासांचीं उदाहरणें होत.

टीप—हे समास नेहमीं विशेषण असतात, हें वरील विग्रहावरून लक्षांत येईल.

४२१ विग्रहवाक्यांतील संबंधी सर्वनामाचे विभक्तीवरून या समासाचे **द्वितीयाबहुव्रीहि, तृतीयाबहुव्रीहि** इत्यादि भेद होतात; उदा० 'प्राप्तोदक', 'प्राप्त आहे उदक ज्यास, तो' (द्वि० ब०); 'कृतकृत्य' 'कृत आहे कृत्य ज्यानें तो' (तृ० ब०); 'दत्तधन' 'दत्त आहे धन ज्यास तो (च० ब०); 'गलितपर्ण.' 'गलित आहेत पर्णें ज्याचीं किंवा ज्यापासून तो. वृक्ष [illegible] किंवा प०त०) 'वीरपुरुष,' वीर आहेत पुरुष ज्यामध्यें तो.' [ग्राम] (स० त०)

४२२ ज्या बहुव्रीहि समासांत विग्रह करतांना दोन्ही पदांस एकच विभक्ति येते, त्यास **समानाधिकरणबहुव्रीहि** असें म्हणतात: उदा० 'तपोधन'=तप आहे धन ज्याचें तो; 'नीळकंठ' निळा आहे कंठ ज्याचा तो; इ०

४२३ ज्या बहुव्रीहि समासाच्या विग्रहवाक्यांत दोन्ही पदांच्या विभक्ती भिन्न असतात, त्यास **व्यधिकरण-बहुव्रीहि** असें म्हणतात. उदा० 'चक्रपाणी' 'चक्र आहे पाणीच्या ठायीं म्ह० हातीं ज्याच्या तो' (विष्णु) 'चंद्रमौळी' 'चंद्र आहे मौळीच्या ठायीं म्ह० मस्तकीं ज्याच्या तो' (शंकर) इ०.

४२४ शुद्ध मराठींत या समासाचीं उदाहरणें आढळतात; जसें, आंखुडशिंगी, तिमजली हे **समानाधिकरणबहुव्रीहि**; व 'माणुसघाण्या' 'रडतोंड्या' हे व्यधिकरणबहुव्रीहि.

४२५ हे बहुव्रीहिसमास घटित शब्द शुद्ध मराठींत होतात, तेव्हा त्यास शेवटीं 'आ' किंवा 'ई' हे प्रत्यय लागतात; हे प्रत्यय लागतांना समासाच्या दुसऱ्या शब्दाच्या अंत्यस्वराचा लोप होतो; उदा० 'एकडोळ्या,' 'दुतोंड्या,' 'तिरंगी,' 'चौकोनी,' 'घाकरमान्या,' 'आंखुडशिंगी,' 'रडतोंड्या,' इ०. कित्येक वेळा 'आ' किंवा 'ई' लागत नाहीं. जसें, चौकोन, दुतोंडें, इ०.

टीप—'आ' किंवा 'ई' लागण्याचे संबंधानें काहीं नियम ठरवितां येत नाहीं. पुल्लिंगी 'आ' प्रत्यय लागतो. व स्त्रीलिंगीं 'ई' लागतो असें साधारणतः म्हणतां येईल.

४२६ या समासांत दोन पदांशिवाय आणखी एखादें पद येऊन त्याचा लोप होतो तेव्हां त्यास **मध्यमपदलोपी बहुव्रीहि** म्हणावें; उदा० हरिणाक्षी, (हरिणाच्या डोळ्यासारखे डोळे जिचे ती;) यात अक्ष म्हणजे डोळा या शब्दाची दोनदां गरज असून एका अक्षी शब्दा-

चा लोप केला आहे; म्हणून हा **मध्यमपदलोपी बहुव्रीहि** होय.

४२७ केव्हां केव्हां पूर्वपद निषेधार्थक 'अ' किंवा 'अन्' असतें, तेव्हां त्या समासास **नञ्बहुव्रीहि** म्हणावें; उदा० 'अज्ञान' (नाहीं ज्यास ज्ञान तो); 'अनंत,' 'नख' इ०.

४२८ 'समान' किंवा 'सह' शब्द पूर्वी घालावयाचा असल्यास त्याबद्दल 'स' किंवा 'सह' घालितात; जसें 'सवर्ग' 'समास,' 'सहोदर,' 'सफळ,' 'सचैल' इ०. हा **सहबहुव्रीहि** समास होय.

४२९ शुद्ध मराठींत लठ्ठालठ्ठी, मारामारी, बुक्काबुक्की इ० शब्द बहुव्रीही समास जाणावे. याचा अर्थ 'मार मार' असें ज्या कामांत चालतें ती 'मारामारी;' बुक्यामारणें ज्यांत चालतें ती 'बुक्काबुक्की' असा करावा.



## द्वंद्वसमास.

४३० जेव्हां समासांत दोन्ही पदें मुख्य असून एकाचा अन्वय दुसऱ्यावर होत नाहीं, तेव्हां त्या समासास **द्वंद्वसमास** असें म्हणतात; उदा० 'पितापुत्र,' 'भीमार्जुन,' 'आईबाप,' 'बहीणभाऊ' इ०

४३१ या समासांतील निरनिराळीं पदें जर समास करून जोडलीं नाहींत तर तीं 'आणि' या उभयान्वयी अव्ययानें जोडिलीं जातील. ही या समासाची खूण आहे.

४३२ दोन पदें 'आणि' या शब्दाप्रमाणेंच 'किंवा' यानेंही जो-

डलीं जातात, तेव्हां 'हें किंवा तें' असा वैकल्पिक अर्थ असतो; यास **वैकल्पिक द्वंद्वसमास** म्हणावें; उ० 'तीनचार,' 'आत-बाहेर,' 'भाजीभाकर,' 'काळापांढरा' 'पांचसहा,' 'खरेंखोटें,' 'बरेंवाईट,' 'काळागोरा,' इ०.

४३३ (अ) संस्कृतांत या समासाच्या लिंग वचनांच्या संबंधानें असा नियम आहे कीं, समस्त पदें एकापेक्षां जास्त असल्यास सर्व समास बहुवचनीं असतो; व शेवटच्या पदाचें जें लिंग तें एकंदर समासाचें लिंग असतें.

(ब) वरील नियम संस्कृत शब्दांनीं झालेल्या समासाचे संबंधानें मराठींत ही लागू पडेल. परंतु कित्येक वेळा एक पद पुल्लिंगी व दुसरें स्त्रीलिंगी असल्यास या नियमास सोडून सर्व समास नपुंसकलिंगी समजतात; जसें, 'राम-सीता आलीं,' 'भीम द्रौपदी बोलत बसलीं आहेत,' इ०.

(क) शुद्ध मराठी शब्दांचा द्वंद्वसमास झाल्यास समासांतील पदें कोणच्याही लिंगाचीं असलीं तरी एकंदर समास पुष्कळ वेळा नपुंसकलिंगी अनेकवचनी होतो; उदा० आईबापें, मातापितरें, दादलाबायलें, स्त्रीपुरुषें, इ०.

४३४ हातपाय, नाकडोळे, घरदार, इत्यादि समासही द्वंद्वच आहेत. परंतु त्यांत विशेष इतकाच आहे कीं, समस्त शब्दास विभक्ति लागली असतां त्यांतील पहिल्या पदाचें सामान्यरूप होतें; क्वचित् विभक्तिही लागते; उदा० 'ती हातींपायीं सुटली;' 'ती मुलगी नाकाडोळ्यांनीं किंवा नाकींडोळीं सुरेख आहे;' 'घरादारास बोळावणें करा;' 'तो घरींदारीं सारखाच;' इ०.

४३५ या समासांतील दोन पदांवरून केव्हां केव्हां फक्त दोनच वस्तूंचा बोध न होतां तदंतर्गत किंवा तत्सदृश अशा दुसऱ्या वस्तूंचाही बोध होतो; तेव्हां या समासास समाहारद्वंद्व असें म्हणतात; उदाहरणें—हातपाय, शेटसावकार, भानपत्रावळ, दिवाणदरबार, भाजीपाला, कोळीमाळी, इ०.

४३६ केव्हां पहिल्या पदाचा अनुकरणवाचक असा दुसरा शब्द कल्पून तो पुढें घालितात व समाहारद्वंद्व करितात; उ० भाकरीबिकरी, दगडगिगड, लहानसान, पोरबीर इ०. या समासांत दुसऱ्या पदाचा अर्थ 'आणि तसे दुसरे', किंवा 'इत्यादि,' 'वगैरे' हा होय.

४३७ द्वंद्व समासांत पदांच्या अनुक्रमाविषयीं खालीं लिहिलेले नियम आहेत.

(१) वर्णांचीं किंवा जातींचीं नांवें त्याच्या अनुक्रमानें येतात; जसें, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र, इ०.

(२) भावाच्या नावांत वडिलापासून अनुक्रम असतो; जसें, युधिष्ठिरार्जुन, रामलक्ष्मण, नकुलसहदेव इ०.

(३) व्यक्तींच्या आणि वस्तूंच्या नावात अधिक प्रतिष्ठित नाम प्रथम येतें; जसें देवदैत्य, राजाप्रजा इ०

(४) नात्याच्या वाचक शब्दांत विशेष मानाच्या किंवा ममतेच्या व्यक्तींचीं नामें प्रथम घालतात; जसें, आईबाप, मातापिता इ०.

(५) निरनिराळ्या लिंगांचे शब्द असल्यास पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग असा अनुक्रम धरितात; उदा० शेळापागोटें, साखरपाणी, कागदशाई, इ०

(१) समासांत एकत्र आलेल्या नामांत अधिक अक्षरांचें नाम असेल तें नेहमीं मागून येतें, व हा नियम लागतांना मागील सर्व नियम लागत नाहींत; जसें, 'अर्जुनभीमसेन;' 'भीमयुधिष्ठिर;' परंतु 'युधिष्ठिरभीमसेन;' इ०.

टीप—हे नियम अक्षरशः पाळितात असें नाहीं; परंतु पुष्कळ अंशीं या नियमांप्रमाणें समास करितात.



## अव्ययीभाव समास.

४३८ ज्या समासांत पहिला शब्द मुख्य असून तो समस्त शब्द बहुधा अव्यय असतो, त्यास **अव्ययीभावसमास** असें म्हणतात; अव्ययीभावसमास-घटित शब्द क्रियाविशेषणअव्यय असतो. जसें यथाशक्ति, आमरण, अनुरूप इ०.

४३९ या समासांत पूर्वशब्द किंवा मुख्य शब्द अव्यय असावा, असा नियम कित्येक व्याकरणकारांनीं दिला आहे. परंतु संस्कृतांत ज्या समासाचा एकंदर अर्थ अव्ययासारिखा असतो, त्यास **अव्ययीभाव** म्हणण्याची रीत आहे; म्हणून पूर्व शब्द अव्ययच असावा, असा नियम पाळितां येणार नाहीं.

४४० संस्कृतावरून झालेलें 'विन' हें अव्यय, व फारशी भाषेंतील अव्ययें 'दर' व 'बर' हीं आरंभीं येऊन झालेले समासही अव्ययीभावच होत. उदा० बिनचूक, बिनधोक, दररोज, बरहुकुम, इ०.



## समासांविषयीं सामान्य विचार.

४४१ मागें जे समासांविषयीं नियम सांगितले, ते मराठीं ठोकळ नियम आहेत. हें प्रकर्ण संस्कृत व्याकरणांतील आहे, व समासही मुख्यतः त्याच भाषेंत होतात: तथापि ते मराठी भाषेंत फार येतात; व संस्कृतावरून मराठींत समास करण्याची चाल पडली आहे, म्हणून हे मुख्य मुख्य नियम दिले आहेत.

४४२ संस्कृतांत समासांच्या संबंधानें बारिकसारिक नियम व अपवाद फार आहेत परंतु त्यांचा मराठी शिकणारास तादृश उपयोग नसल्यामुळें येथें त्यांचा विचार केला नाहीं.

४४३ समासांतील पदें नेहमीं होईल तितकें करून एकाच भाषेंतील असावी; जसें, हत्तिचर्म, मृगडोळा, असले समास न करितां हस्तिचर्म, मृगनयना, असा त्यांचीं रूपें करावी. तसेंच 'इलाख्यानिपति,' 'पायाशुद्ध,' आगबोट,' इत्यादि समासही सदोषच होत.

४४४ तथापि दुसऱ्या भाषेंतील शब्द भाषेंत पूर्णपणें रुळलेले असल्यास व शुद्ध समास संभवत नसल्यास असे समास करण्यासही विशेष हरकत नाहीं. आणि अशा प्रसंगीं एक शुद्ध संस्कृत व दुसरा शुद्ध मराठी अशा शब्दाचे समास करणें अप्रशस्त आहे असें मानतां येत नाहीं. व्याकरणशुद्ध समास संभवत असतां व समास केल्या वाचून चालेल असें असतां मात्र असले समास मुद्दाम करूं नये.

४४५ समास होऊन एकत्र झालेल्या संस्कृत शब्दांमध्यें संधी होत असल्यास तो नेहमीं केला पाहिजे.

जसें 'कृपाअरुण' किंवा 'नृपआज्ञा' असें न लिहितां 'कृपारुण' 'नृपाज्ञा' असें लिहावें.

टीप—कवितेंत या दोन्ही गोष्टींकडे फार दुर्लक्ष आढळतें. याचीं उदाहरणें कवितेंत जागजागीं आढळण्यासारखीं असल्यामुळें विस्तार करीत नाहीं.

४४६ दुप्पट, तिप्पट, चौपट, पांचपट इत्यादि शब्द नामें असल्यास, 'दोहोनीं जी पट ती,' 'पांचांनीं जी पट ती' असे **तृतीयातत्पुरुष समास** करावे; परंतु ते शब्द विशेषणें असल्यास 'दोहोनीं आहे पट ज्याची,' किंवा 'पांचांनीं आहे पट ज्याची' असे **बहुव्रीहि** समास करावे. उदा० 'आठाची दुप्पट कर' यांत 'दुप्पट' हा शब्द तत्पुरुषसमास आहे; व 'अ' 'ब' च्या दुप्पट काम करितो, येथें तोच शब्द विशेषण (बहुव्रीहि समास) आहे.

४४७ सव्वा(सपाद)दोन, साडेतीन (सार्ध तीन), पावणेचार (पाव-उणे चार), हे **कर्मधारयसमास** होत; कारण यांतील पहिलीं पदें विशेषणें आहेत.

४४८ 'एकतीस'.(एक आणि तीस), 'बावीस' (बा. बे, दोन; आणि वीस), 'तेवीस' इत्यादि शब्द **द्वंद्वसमास** समजावे; परंतु 'एकोणीस' (एकानें उणे वीस), 'एकुणतीस' (एक उणे तीस) वगैरे **कर्मधारयसमास** होत; कारण पहिलीं पदें विशेषणें आहेत.

४४९ एका सामासिक शब्दाचे केव्हां केव्हां दोन, तीनही समास संभवतात; उदा० 'सत्यव्रत' हा समास तीन प्रकारांनीं सोडवितां येईल; जसें, 'सत्याचें जें व्रत तें सत्यव्रत'(तत्पुरुष); 'सत्य असें जें व्रत तें' (कर्मधारय);' व 'सत्य हेंच आहे व्रत ज्याचें तो' (बहुव्रीहि); त्याचप्रमाणें 'यशोधन,' 'पीतांबर,' हे समास कर्मधारय किंवा

बहुव्रीहि होतील; अशा वेळीं वाक्यांतील अर्थाला योग्य दिसेल तो समास करावा.

४९० कित्येक वेळां समास अनेक प्रकारांनीं होऊन अर्थ फिरणार नाहीं; उदा० 'लक्ष्मीकांत' (लक्ष्मीचा कांत) हा तत्पुरुष; व 'लक्ष्मी आहे कांता ज्याची' तो, हा बहुव्रीहि असे दोन प्रकारचे विग्रह होऊन दोहोंचा अर्थ शेवटीं एकच आहे. या ठिकाणीं कोणचा समास करावा हें ठरविणें बोलणाराचे मर्जीवर असतें.

---

## प्रत्यय-घटित साधित शब्द.

### (संस्कृत) धातुसाधित शब्द.

४९१ या शब्दांपैकीं कित्येकांचा क्रियापदाशीं निकट संबंध येत असल्यामुळें व त्यांचा क्रियापदाचे जागीं उपयोग होतो, यामुळें त्यांचा विचार मागें क्रियापदप्रकरणीं केला आहे. त्यांशिवाय दुसरे जे धातुसाधित शब्द ते येथें सांगतों.

टीप धातुसाधित शब्दांस संस्कृतांत **कृदन्त** अशी संज्ञा आहे.

४९२ संस्कृतांत कित्येक अव्ययरूपी शब्द धातूंच्या मागें येऊन धातूंच्या अर्थांत फेरफार करितात. या शब्दांना उपसर्ग असें म्हणतात. उपसर्गघटित शब्द मराठींत पुष्कळ येतात, म्हणून मुख्य मुख्य उपसर्गांची याद अर्थासह देतों.

| उपसर्ग. | अर्थ. | उदाहरणें. |
| --- | --- | --- |
| अति | स्थल, काल यांचे मर्यादेपलीकडे; फार, फारच; ) | अत्युक्ति, अतिस्नेह, अतिरेक. |
| अधि | वर ( जागा किंवा मान ) | अधिकार, अधिपति, अधिदैवत इ० |
| अनु | नंतर, अनुरूप, बरोबर तसें, मागें, पुढें, ('अभि'च्या उलट). | अनुभव, अनुमत, अनुरूप, अनुज, अनुमत. |
| अप | खालीं, एकांतीं, गुप्त ( 'अधि' च्या उलट. ) | अपकार, अपशकुन, अपमृत्यु, अपक्व. |
| अभि | कालादिकांनीं पूर्वी, जवळ, पुढें, सर्वत्र, चोहींकडे, ( 'अनु'च्या उलट. ) | अभिज्ञ, अभिधान, अभ्यास, अभिमान. |
| अव | पासून, अभाव, अप्रतिष्ठा, वियोग, ('आ'च्या उलट ). | अवनत, अवकृपा, अवतार, अवलक्षण, अवज्ञा. |
| आ* | पासून, पर्यंत, मर्यादा, थोडें, ( 'अव'च्या उलट ). | आज्ञा, आकार, आकर्षण, आनंद, आकंपित, आकुंचित, आघात, इ० |
| उत्, उद् | वर, उंच. | उत्कर्ष, उत्तेजन, उत्प्रेक्षा. |
| उप | कडेस, जवळ, लागून, बाजूनें, खालचे पदवीचा, | उपनेत्र, उपक्रम, उपकार, उपग्रह, उपवेद, उपाध्यक्ष, उपाध्याय, इ०. |
| दुस्, दुर् | वाईट, कठीण ( 'सु' च्या उलट ) | दुर्गुण, दुराचार, दुराचरण, दुःसह, दुष्कृति, दुःख, दुर्वर्तन, दुःस्थिति, इ०. |
| नि | आंत, वर, मध्यें, ( 'निर्' च्या उलट ) | निधन, निबंध, निमग्न, निकृति, नियोग, इ०. |

---

* कित्येक धातूंच्या मागें हा उपसर्ग येऊन धातूंच्या मूळ अर्थाच्या उलट अर्थ होतो; उदा० गमन (जाणें), आगमन (येणें); दान (देणें), आदान (घेणें); इ०.

| | |
|---|---|
| निर्, निस्*—बाहेर, आंत नसणें, शिवाय, उलट, ('नि' च्या उलट) | निर्गुण, निराकार, निर्बंध, निष्कारण, निष्कृति. |
| परा—मागें, उलट, मागचा, विपरीत, पूर्वींचा, विरुद्ध, इ० | पराजय, पराभून, परावर्तन, पराभव, इ०. |
| परि—भोंवतीं, चोहींकडून, पूर्णपणें, सुमारें. | परिधि, पर्यटन, परिसमाप्ति, इ०. |
| प्र—पुढें, बाहेर, दूर, वर्चस्व, आधिक्य, प्रकर्ष. | प्रताप, प्रपिता, प्रदेश, प्रभु, प्रभव, प्रकर्ष, प्रकार. |
| प्रति—पुनः, मागें, कडेस, उलट, बद्दल. | प्रतिबिंब, प्रतिपादन, प्रत्युपकार, प्रतिशब्द, प्रत्युत्तर. |
| वि—वेगळेपणा, विशेष, अभाव; ('सम'च्या उलट) | विरक्त, वियोग, विनाश, विख्यात, विधवा, विपाक, व्युत्क्रम, व्यंग, व्यंजन, इ० |
| सम्—मिळून, बरोबर, पूर्ण, सुद्धां, ('वि'च्या उलट) | संभव, संबंध, संभ्रम, संस्कार, संकट, समास. |
| सु—चांगलें, सोपें, फार, ('दुर्' च्या उलट) | सुदिन, सुगम, सुप्रभात, सुयोग, सुख, सुदीन, इ. |

४९२ दुसरीं कित्येक अव्ययें शब्दांचे पूर्वीं येतात, व त्यांच्या योगानें शब्दांच्या अर्थांत फेरफार होतो; तीं खालीं देतों:—

अ—अभाव, निषेध; (पुढील शब्दाचे आरंभीं स्वर असल्यास याचें रूप 'अन्' असें होऊन मग त्यांत पुढल्या शब्दाच्या आरंभींचा स्वर मिळतो) उ० अधर्म, अमाप, अकल्पित, अनुत्तर, अनायास, अनिष्ट, अनेक, अनृत, इ.

---

* निकामी, निबाप्या, निजोरी, निर्जोरी, निर्धोक, निर्गांठ, या शुद्ध मराठी शब्दांत 'नि' व 'निर्' हे उपसर्ग आहेत

अद्—आश्चर्य; उ० अद्भुत.
अधस—खालीं; उ० अधःपात, अधोमुख, अधस्तल
अंतर्—आंत, मध्यें; उ० अंतर्द्वार, अंतःपुर, अंतःकरण.
अपि—पुढां: उ० अपिधान, अपिनद्ध.
अमा—जवळ; उ० अमावास्या, अमात्य
अलं—वस्त्र, शोभा; उ० अलंकृत, अलंकर्ता, अलंकार
आविर् —उघड, दृश्य; उ० आविर्भाव, आविर्भूत, आविष्करण, आविष्कृत
आशु—शीघ्र, वेगानें; उ० आशुग, आशुव्रीहि (हळवें भात)
इति—याप्रमाणें; उ० इत्यर्थ, इतिहास (इति-ह-आस=याप्रमाणें झालें) इतिवृत्त, इत्यादि
इत्थं—याप्रमाणें, असें; उ० इत्थंभूत
कु }—वाईट, दुष्ट, हलकें, थोडें; उ० कुकर्म, कुवासना, कापुरुष; कुकर्म, कुरूप, इ.
का }
नाना—बहुत, वेगवेगळे; उ० नानारूप, नानाविध.
न—अभाव, निषेध; उ० नक्षत्र, नास्तिक.
पश्चात्—मागें; उ० पश्चात्ताप, पश्चाद्द्वार.
पुरस्—पुढें, समोर; उ० पुरस्कर्ता, पुरोगामी.
पुरा—प्राचीन, मागें; उ० पुरावृत्त, पुरातन.
प्रातर्—सकाळीं; उ० प्रातःकाळ; प्रातःसंध्या.
प्रादुर्—उघड, दृग्गोचर; प्रादुर्भाव.
बहिर्—बाहेर; उ० बहिर्द्वार, बहिष्कार.
स—सह, युक्त; उ० सजीव, सप्रमाण, सफल, सजातीय
सत्—चांगलें; उ० सज्जन; सत्संग, सन्मान, सद्गति.
सह—बरोबर; उ० सहज, सहवास, सहगमन.
स्वयं—स्वतः; उ० स्वयंवर, स्वयंभू, स्वयमेव, स्वयंपाक.

**४९४ कर्तृवाचक साधित शब्द**—धातूंस तृ(ता), अक, अ, इन् (ई) व अन हे प्रत्यय लागून कर्तृवाचक नाम होतात; उदाहरणें:—

तृ*(ता) – कर्ता, नेता, दाता, भर्ता, भोक्ता, स्रष्टा, भर्ता, वक्ता, गाता, योद्धा, हंता, त्वष्टा, द्वेष्टा, इ.

अक—कारक, वाचक, दायक, गुणक, बाधक, पावक, लेखक, योजक, नर्तक, जनक, रक्षक, हिंसक, इ.

टीप—कित्येक धातूंस 'इक' लागतो; असें, रसिक, पथिक, रक्षिक, धनिक, इ.

अ—चोर, सर्प, देव, स्मर, हर, भुजंगम, विश्वंभर, भव, शंभव, विजय, शत्रुंजय, बुध, प्रवाह, इ.

इन् (पु० ई, स्त्री० इनी)—त्यागी, विभागी, भोगी, वादी, प्रतिवादी, क्षयी, जयी, विजयी (स्त्री. विजयिनी), अनुभवी, संयमी, अनुयायी, दोषी, अपराधी (स्त्री. अपराधिनी), इ.

अन—(यानें धातुप्रदर्शित क्रिया करविणारा असा अर्थ होतो) —उदा० नंदन, मदन, रमण, चक्षण, विचक्षण, हायन, जनार्दन, इ.

४९१ आणखी अशा अर्थांचे प्रत्यय बरेच आहेत. त्यांतील मुख्य मुख्य उदाहरणांसुद्धां देतों:—

इष्णु—सहिष्णु, वर्धिष्णु, जिष्णु.

उक—भावुक, घातुक, कामुक.

आलु—कृपालु, शयालु (मरा० झोंपाळू, लाजाळू, भुकाळू).

वर—भास्वर, स्थावर, नश्वर, ईश्वर, इ.

उ—इच्छु, भिक्षु, इ.

४९२ धातुसाधित विशेषणें—संस्कृतांत भूतका-

---

*हे प्रत्यय, व पुढे या प्रकर्णांत जे प्रत्यय सांगितले आहेत, ते लागण्यापूर्वी धातूंस व शब्दांस गुण, वृद्धि, आदिकरून अनेक फेरफार होतात. परंतु ते येथें सांगितले असता विस्तार होणार आहे, म्हणून सांगितले नाहींत.

त्ववाचक कर्मणिविशेषण 'त' प्रत्यय लागून होतें, हें मागें सांगितलेंच आहे. या 'त'चा क्वचित् 'न,' 'व' किंवा 'ट' होतो.

उदाहरणेंः—ख्यात, गत, प्राप्त, आप्त, नत, भूत, वात, ध्यान, गीत, नीत, दीन, दान, पन्न, जीर्ण, विस्तीर्ण, त्राण, पक्व, नष्ट, स्पष्ट, इ.

४५७ धातूंस 'तव्य,' 'अनीय' आणि 'य' हे प्रत्यय लागून विध्यर्थक किंवा भविष्यकाळाचे अर्थाचीं विशेषणें होतात ; यांच्यापासून शक्ति, योग्यता, आवश्यकता, इत्यादिकांचा बोध होतो; उदाहरणेंः—

तव्य—(हा प्रत्यय लागतांना कित्येक धातूंस 'इ' आगम होतो) भवितव्य, कर्तव्य, दातव्य, भोक्तव्य, इ.

अनीय—दर्शनीय, रमणीय, आचरणीय, स्पृहणीय, इ.

य—रम्य, गम्य, नेय, कार्य, कृत्य, त्याज्य, भोग्य, वाच्य, भोज्य, स्तुत्य, वाक्य, देय, विधेय, आचार्य, गद्य, पद्य, गुह्य, मद्य, शिष्य ( शास् धा. ), भृत्य, इ.

४५८ धातुसाधित नामें—धातुसाधितनामें होण्याचे मुख्य प्रत्यय अ, अन ( स्त्री० अना ), आ, इ, ति, त्र, इत्र, न, या, अस्, इस्, उस्, मन्, हे आहेतः—

अ—त्याग, भाग, पाक, भाव, अध्याय, समाज, आहार, विकार, विहार, प्रकार, नय, परिणय, शम, कर, मद, स्तव, इ.

अन—(यानें धातुप्रदर्शित क्रियेचा बोध होतो; हाच प्रत्यय मराठींत 'णें' होऊन नपुंसकलिंगी धातुसाधित नामें जीं करणें, बोलणें, चालणें, असणें, बसणें, इ०, हीं झालीं आहेत.) स्थान, दान, संपादन, पालन, रक्षण, दर्शन, भोजन, साधन, सेवन, करण, शयन, अर्पण, हवन, भोजन,

दूषण, वचन, इ०. हीं सर्व नपुंसकलिंगी असतात. (हाच प्रत्यय **अना** असा होऊन स्त्रीलिंगी नामें होतात); उ० प्रार्थना, वेदना, रचना, योजना, विचारणा, भावना, इ.

**आ**—(या प्रत्ययानें झालेलीं नामें स्त्रीलिंगी असतात) उ०इच्छा, कथा, गुहा, चिंता, जरा, व्यथा, पीडा, स्पृहा, त्वरा, त्रपा, लेखा, रेखा, शिक्षा, पूजा, कृपा, दया, इ.

**इ**—(हा प्रत्यय लागून होणारीं नामें पुल्लिंगी असतात). उद० आदि, परिधि, संधि, विधि, निधि, उपाधि, आधि, इ.

**ति**—(या प्रत्ययानें स्त्रीलिंगी नामें होतात). उदा० कृति, बुद्धि, शक्ति, स्मृति, गति, युक्ति, नीति, प्रीति, सृष्टि, शुद्धि, इ.

**त्र, इत्र**—(हे प्रत्यय लागून क्रियेचें साधन, हत्यार किंवा पात्र, अशा अर्थाचीं नपूंसकलिंगी नामें होतात); उदा० नेत्र, श्रोत्र, शस्त्र, शास्त्र. पात्र, अस्त्र, स्तोत्र, गात्र, क्षेत्र, पत्र, खनित्र, पवित्र, चरित्र, इ.

**न**—(हा प्रत्यय लागून क्रियावाचक पुल्लिंगी नामें होतात); उ० यत्न, प्रश्न, स्वप्न, यज्ञ, इ.

**या**—(स्त्रीलिंगी) विद्या, चर्या, क्रिया. शय्या, भृत्या, मृगया, इ.

**अस्, इस्, उस्**—(हीं नामें नपुंसकलिंगी असतात. व मराठीमध्यें बहुधा त्यांचें अंत्याक्षर जें 'स्' त्याचा लोप करितात); उदा० सरस्, तमस्, वचस, वक्षस्, शिरस्, स्रोतस्, उरस्, यशस्, सर्पिस्, ज्योतिस्, हविस्, चक्षुस्, यजुस्, आयुस , वपुस्, धनुस्, इ.

**मन्**—(या प्रत्ययानें होणारीं नामें पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी असतांना 'न' नाहींसा होऊन आकारान्त होतात; व नपुंसकलिंगी असतात तेव्हां फक्त 'न'चा लोप होतो); उदा० वर्मन्. दामन्, छद्मन्, सीमन् (स्त्री. सीमा), लोमन्, आत्मन् (पु. आत्मा), हेमन् (नपुं. हेम , चर्मन् ब्रह्मन्, इ.

४१९ या शिवाय धातूंस दुसरे अनेक प्रत्यय लागून

संस्कृतांत नामें, विशेषणें वगैरे होतात. परंतु ते प्रत्यय अनेक आहेत, व ते लागतांना होणारे बारिकसारिक फेरफारही अनेक आहेत, म्हणून येथें मुख्य मुख्य प्रत्यय तेवढे सांगितले आहेत.



## (संस्कृत)नामसाधित शब्द.

४१० नामांपासून प्रत्यय लागून विशेषणें वगैरे होतात, त्यांतील मुख्य मुख्य येथें सांगतों.

टीप १—प्रातिपदिकांपासून होणारे साधित शब्दांस 'तद्धित' अशी संस्कृतांत संज्ञा आहे.

टीप २—हे प्रत्यय लागतांना मूळ नामांत अनेक फेरफार होतात. परंतु ते सर्व सांगणें अशक्य असल्यामुळें येथें फक्त प्रत्यय, त्यांचा अर्थ व उदाहरणें दिलीं आहेत.

४११ नामांस 'अ,' 'इ,' 'य,' 'आयन,' 'एय' आणि 'ईय' हे प्रत्यय लागून जाति, पुत्र, गोत्र इत्यादि दर्शक विशेषणें होतात. हे प्रत्यय लागतांना नामांच्या प्रथमस्वरास बहुधा वृद्धि होते.

**अ**—भृगु, भार्गव; यदु, यादव; वशिष्ट, वाशिष्ट; सुमित्रा, सौमित्र; पृथा, पार्थ; इ०.

**इ**—दशरथ, दाशरथि; कृष्ण, कार्ष्णि; शूर, शौरि.

**य**—पराशर, पाराशर्य; शांडिल, शांडिल्य; गर्ग, गार्ग्य; जमदग्नि, जामदग्न्य; बभ्रु, बाभ्रव्य; दिति, दैत्य; इ०.

**आयन**—वात्स्य, वात्स्यायन; कात्य, कात्यायन.

**एय**—अत्रि, आत्रेय; गंगा, गांगेय; रोहिणी, रौहिणेय; पांडु,

पाडवेय; विनता, वैनतेय राधा, राधेय; कुंति, कौन्तेय; मृकंडु, मार्कंडेय; इ०.

**ईय**—भ्रातृ, भ्रात्रीय; मातृष्वसृ (मावशी), मातृष्वस्रीय (मावसभाऊ); इ०.

४१२ नामांस 'अ,' 'य,' 'एय,' 'ईय' हे प्रत्यय लागून विशेषणें होतात. हे प्रत्यय लागतांना नामांच्या प्रथमस्वरास वृद्धि होते.

**अ**—चाक्षुस, वैष्णव, चान्द्र, सौर, वैयाकरण, चैत्र, वैदर्भ, वैशाख, शारीर, इ.

**य**—सौम्य, तालव्य, पाद्य, दंत्य, पथ्य, मूल्य, आद्य, मुख्य, ग्राम्य, धन्य, गव्य, चातुर्मास्य, इ.

**एय**—पौरेय, आग्नेय, पौरुषेय, पाथेय, इ०.

**ईय**—पर्वतीय, त्वदीय, मदीय, आस्मदीय, आचमनीय, इ०.

४१३ नामास 'इक' प्रत्यय लागून 'तत्संबंधी' अशा अर्थाचीं विशेषणें होतात; हा लागण्यापूर्वीं बहुतेक नामांच्या प्रथमस्वरास वृद्धि होते. उदाहरणें;—वार्षिक; मासिक; लौकिक; कालिक; सामायिक; आस्तिक; दैविक; आह्निक; सैनिक; नाविक; दैहिक; धार्मिक; कायिक; वाचिक; मानसिक; इ०.

टीप—यानें धंदा, व्यापार, निपुणता, इत्यादिकांचा बोध होतो; उदा० पौराणिक, वैदिक, ऐतिहासिक, इ०.

४१४ 'इय,' 'ईन' व 'इन्' हे प्रत्यय लागून विशेषणें होतात; पहिल्याचे पूर्वीं वृद्धि होत नाहीं, परंतु पुढल्या दोहोंच्या पूर्वीं कांहीं नामांस होते; उदाहरणें :—

इय—उ० यज्ञिय, राष्ट्रिय, श्रोत्रिय, इ.

ईन—कुलीन, शालीन, गर्वीत, इ.

इन्—(मरा० ई पु.; इनी स्त्री.) शास्त्री, हली, धनी, हस्ती. विद्यार्थी, पक्षी, सुखी, मेधावी. करी. रंगिणी, तरंगिणी, इ.

४१५ 'विन्,' 'मिन्' हे प्रत्यय लागून नामप्रदर्शित गुणादि ज्यांस आहेत ते, असा अर्थ होतो ; याचीं पुल्लिंगी रूपें मराठींत मी, वी, स्त्रीलिंगी विनी, मिनी व नपुंसकलिंगी वि, वि, अशीं होतात; उदा० मायावी, तेजस्वी, तपस्वी, तमस्विनी (रात्र), यशस्वी, यशस्विनी, पयस्विनी (दुधाळ गाय इ०, किंवा नदी) स्वामी, गोमी-भामिनी, इ०.

४१६ मत्, वत्, (पु० मान्, वान्; स्त्री० मती, वती,) या प्रत्ययांनीं नामप्रदर्शित वस्तु बाळगणारा अशा अर्थाचीं विशेषणें होतात; उदा० गरुत्मान्, श्रीमान्, बुद्धिमान्, बुद्धिमती, धीमान्, धीमती, ज्ञानवान्, विद्यावान्, भास्वान्, इ०.

४१७ कीय—कांहीं नामांस हा प्रत्यय लागून 'त्याचें स्वतःचें' असा अर्थ होतो; उदा० स्वकीय, परकीय, इ०.

४१८ 'इर,' 'ईर,' 'इल,' 'ईल,' 'र,' 'ल,' हे प्रत्यय लागून गुणवाचक विशेषणें होतात; उदा० रुधिर, तुंडिल, तुंदिल, (मरा० दोंदिल) जटिल, मधुर, पांसुल, वत्सल, इ०.

४१९ याशिवाय अनेक प्रत्यय आहेत. त्यांतील कित्येक त्यांचे उदाहरणांसह सांगतों:—

व—केशव, राजीव, विषुव.

इन—मलिन, फलिन.

त्य—पाश्चात्य, अमात्य, अत्रत्य, तत्रत्य.

तन—सनातन, निरंतर, चिरंतन, अद्यतन, पुरातन, इ.

म—आदिम, मध्यम, अधम.

इम—अग्रिम, पश्चिम, अन्तिम.

लु—श्रद्धालु, कृपालु.

मय—मृन्मय, गोमय, मांसमय, काष्टमय. सुवर्णमय.

इत—लज्जित, दुःखित.



## भाववाचक नामें.

४७० विशेषणांस (व क्वचित् नामांसही) प्रत्यय लागून भाववाचक, गुणवाचक व धर्मवाचक नामें होतात; भाववाचक नामांचे कित्येक प्रत्यय शुद्ध संस्कृत आहेत, व कित्येक शुद्ध मराठी आहेत. एथपर्यंत जरी शुद्ध संस्कृत प्रत्यययुक्त अशींच साधित नामें सांगितलीं आहेत, तरी सोयीकरितां संस्कृत व मराठी दोन्हीं प्रकारचीं भाववाचक नामें येथेंच सांगतों.

४७१ संस्कृत प्रत्यय—ता(स्त्री.), त्व, य, अ(न.) व इमन् (मरा॰ इमा, पु.) हे आहेत. हे प्रत्यय बहुधा सर्व विशेषणांस लागतात. त्यांचे पूर्वीं फेरफार अनेक होतात. 'य' आणि 'अ' यांचे पूर्वीं नामांचे प्रथमस्वरास वृद्धि होते.

त्व—जडत्व, मनुष्यत्व, धार्मिकत्व, देवत्व, बालत्व, गुरुत्व, मित्रत्व, इ.

**ता**—जडता, मनुष्यता, धार्मिकता, देवता, बालता, गुरुता, मित्रता, दृढता, इ.

**य आणि अ**—गौरव, वाणिज्य, क्रौर्य, धैर्य, मौन्य, शौच्य, दार्ढ्य, सौहृद, दौत्य, मार्दव, इ.

**इमा**—मृदिमा, द्रढिमा, कालिमा, रक्तिमा, गरिमा, लघिमा, इ.

४७२ वरील प्रत्यय व मुख्यतः 'ता,' हे नामांस लागून 'त्यांचा समुदाय किंवा 'संघ' अशा अर्थाचीं नामें होतात; उदा॰ अश्व, आश्व (पुष्कळ घोडे); जन, जनता (लोकांचा समुदाय); ग्राम, ग्रामता (ग्रामसमूह); इ॰.

४७३ मराठी भाववाचक नामें—शुद्ध मराठी भाववाचक नामें आ, आई, ई, पण, पणा, गिरी, की, वा-वी या प्रत्ययांनीं होतात; उदाहरणें:—

**आ**—तांठा, पु.

**आई**—स्त्रीलिं., धिटाई, भलाई, गरीबाई, दांडयाई, मिठाई, इ.

**ई**—स्त्री. चरीबी, लांबी, रुंदी, ऊंची, दलाली, चाकरी, मामलेदारी, शिलेदारी, इ.

**पण व पणा**(पु.)—मनुष्यपण, थोरपण, देवपणा, बरेपण-पणा, इ.

**गिरी**—लुच्चेगिरी, गुलामगिरी, सोदेगिरी, इ.

टीप—आकारान्त विशेषणांस पण, पणा व गिरी हे प्रत्यय लागतांना त्यांच्या आकारास एकार होतो, म्ह॰ त्याचें सामान्यरूप होतें; उ॰ चांगलेपणा, सोदेगिरी, बरेपण, इ.

**की**—स्त्री. फुशारकी, माणुसकी, पाटीलकी, लबाडकी.

**वा** पु. **वी** स्त्री.—ओलावा, गारवा, (थंडी) थंडावा, थोरवी; कवितेंत थोरीव; (थोरीव सांडीली आपुली परीसें। नेणे शिवों कैसें लोखंडासी'। तुका॰)

टीप—यांतले 'पण' आणि 'पणा' हे प्रत्यय बहुधा सर्व

मराठी विशेषणांस लागतात. बाकीचे नियमित विशेषणांस लागतात.

४७४ भाववाचक नामांचे आणखी कित्येक प्रत्यय मराठींत आढळतात. उ० ओपा—एकोपा; ण—दाटण; आयत, कबुलायत, इ०.

४७५ 'पण' आणि 'पणा' हे प्रत्यय धातुसाधित विशेषणें व क्रियापदांचीं कालदर्शकरूपें यांना लागून भाववाचक नामें होतात. या दुसऱ्या शब्दांस हे प्रत्यय लागण्याचे संबंधानें असा नियम आहे कीं, जीं क्रियापदें मुळचीं विशेषणांवरून झालीं आहेत, त्यांतील कांहींना मात्र हे प्रत्यय लागतात; जीं शुद्ध क्रियापदें आहेत, त्यांस लागत नाहींत; उदा०—केलेपणा, होतेपणा, असतेपणा, नसतेपणा, इ०.

टीप—मराठींत धातुसाधित विशेषणांवरून झालेलीं क्रियापदें कोणतीं व शुद्ध क्रियापदें कोणतीं हें मागें सांगितलेंच आहे. (पहा क. २३१.)



## आणखी कित्येक साधित शब्द.

४७६ कित्येक शब्दांस पुढें लिहिलेले शब्द लागून एकंदर समासास विवक्षित अर्थ येतो. या शब्दांपैकीं कित्येक विशेषणें आहेत, व कित्येकांस शब्दयोगी अव्ययें असें ही म्हणतां येईल. परंतु हे पुढें येऊन एकंदर शब्दास निराळाच अर्थ येतो, म्हणून त्यांची याद त्यांचा अर्थ व कित्येक उदाहरणें यांसह देतों.

**अंकित**—(अंक—चिन्ह करणें) चिन्हानें युक्त; उ० मुद्रांकित, नामांकित, स्नेहांकित.

**अतीत**—उल्लंघन करून गेलेला; उ० मर्यादातीत, मायातीत, गुणातीत, दुःखातीत.

**अधीन**—स्वाधीन किंवा ताब्यांत; उ० पराधीन, ईश्वराधीन, विषयाधीन, व्यसनाधीन, प्रयत्नाधीन, इ.

**अनुरूप**—योग्य, प्रमाणें, साजण्याजोगें; उ० गुणानुरूप, योग्यतानुरूप, भक्त्यनुरूप मरा० मनोनुरूप (यांत पूर्वरूपसंधी झाला आहे).

**अनुसार**—प्रमाणें; उ० कर्मानुसार, दैवानुसार, समयानुसार, इ. मराठींत वेळेनुसार-वेळेनसार, काळानसर, हे शब्द असेच झाले आहेत.

**अंतर**—हा शब्द 'अन्य' या अर्थी शब्दांचे शेवटीं येऊन समास होतात; उ० भाषांतर=दुसरी भाषा (हल्लीं याचा अर्थ तर्जुमा असा झाला आहे); देशांतर, दुसरा देश; वेषांतर (वेशांतर), मन्वंतर, अर्थान्तर इ०. हे सर्व कर्मधारय समास होत; यांतील पहिलीं पदें मुख्य असून पुढले शब्द विशेषणें आहेत.

**अन्वित**—युक्त, सहित; उ० शर्करान्वित, गुणान्वित, पुत्रान्वित, इ.

**अर्थी**—(अर्थिन्) इच्छिणारा; विद्यार्थी, द्रव्यार्थी, फलार्थी, पुत्रार्थी, अन्नार्थी.

**अर्ह**—योग्य; उ० पूजार्ह, गुणार्ह, मानार्ह, भक्षणार्ह, इ.

**आक्रांत**—व्याप्त, पीडित, युक्त; उ० चिंताक्रांत, शोकाक्रांत, पादाक्रांत (अगदीं मुळापर्यंत किंवा पायापर्यंत व्याप्त),

**आढ्य**—व्याप्त, युक्त, सहित; उ० गुणाढ्य, बलाढ्य, रसाढ्य.

**आतुर**—व्याकुळ, व्यग्र, उतावळा; उ० चिंतातुर, भयातुर, कामातुर, निद्रातुर, क्रोधातुर, इ.

**आपन्न**—मिळालेला, पोंचलेला; उ० दुःखापन्न, अर्थापन्न, दोषापन्न, इ.

**आरूढ**—वर बसलेला, ज्यास मिळालें आहे असा; उ० पदारूढ, अधिकारारूढ.

**आर्त**—पिडलेला; उ० दुःखार्त, शोकार्त, क्षुधार्त.

**आवह**—प्राप्त करून देणारें; उ० हितावह, सुखावह, भयावह शोकावह, इ.

**आविष्ट**—युक्त; उ० क्रोधाविष्ट, शोकाविष्ट, इ.

**आस्पद**—स्थल, जागा, विषय; उ० शोकास्पद, संशयास्पद, लज्जास्पद, हर्षास्पद.

**उन्मुख**—सिद्ध; तयार; उ० मरणोन्मुख, दुःखोन्मुख, क्लेशोन्मुख, इ.

**कार**—तें तें करणारा, किंवा तो धंदा करणारा; उ० चर्मकार, कर्मकार, सूपकार (स्वयंपाकी) सुवर्णकार, ग्रंथकार, इ. हा प्रत्यय मराठींत 'आर' होऊन 'सोनार' 'लोहार' 'कांसार' इ. शब्द झाले आहेत.

**गम्य**—जाणण्यास किंवा मिळण्यास योग्य (मागिल शब्दाचे योगानें—) उ० ज्ञानगम्य, भक्तिगम्य, विचारगम्य, मनोगम्य, इ.

**गोचर**—आटोक्यांत आलेला विषय; उ० दृग्गोचर, इंद्रियगोचर,

**ग्रस्त**—ग्रासलेला, व्याप्त; उ० चिंताग्रस्त, भयग्रस्त, वादग्रस्त, निद्राग्रस्त, शोकग्रस्त.

**घ्न**—घातक, दूर करणारा; उ० कृतघ्न, शत्रुघ्न, ज्वरघ्न शीतघ्न, इ.

**चर**—फिरणारा, चालणारा; उ० रात्रिंचर, जलचर, स्थलचर, खेचर, भूचर, इ.

**च्युत**—पडलेला, भ्रष्ट झालेला, ज्याणें सोडिलें आहे असा; उ. पदच्युत, नयच्युत, धर्मच्युत स्वर्गच्युत.

**ज**—जन्मलेला, उत्पन्न झालेला; उ० स्वेदज, अंडज, जारज, वारिज, अनुज, पूर्वज, इ.

**जात**—ज्यापासून उत्पन्न; उ. धनजात, क्रोधजात, इ. पक्षिजात, वृक्षजात इ. शब्दांत त्यांची त्यांची जात किंवा समुदाय असा अर्थ आहे हें लक्षांत ठेवावें.

**जीवी**—वांचणारा, निर्वाह करणारा; उ० मांसजीवी, मांसोपजीवी, चिरंजीवी, इ.

**दर्शी**—पाहणारा, दाखविणारा ; उ० गुणदर्शी, दूरदर्शी, दीर्घदर्शी, छिद्रदर्शी, स्थूलदर्शी.

**धर, धारक**—धारण करणारा; उ. चक्रधर, गदाधर, गदाधारक, दीक्षाधर,-धारक, इ.

**निष्ठ**—गढून गेलेला, जडलेला ; उ० कर्मनिष्ठ, ध्याननिष्ठ, आत्मनिष्ठ, स्वार्थनिष्ठ, इ.

**पर, परायण**—तत्संबंधी किंवा विषयक किंवा त्यांत गुंतलेला; उ० ज्ञानपर, कर्मपर, भक्तिपर मोक्षपर, ईश्वरपरायण, भक्तिपरायण, स्त्रीपरायण, ध्यानपरायण.

**भ्रष्ट**—पतनपावलेला; उ० धर्मभ्रष्ट, नीतिभ्रष्ट, पदभ्रष्ट इ.

**भूत**—झालेलें, येथें असलेलें, तद्रूप; उ०(हा शब्द लागण्यापूर्वी पुष्कळदां मागील शब्दास 'ई' आगम होतो) विषयभूत, भस्मीभूत, सारभूत, प्राणभूत इ० 'ई'प्रत्यय लागला असतां 'तसें नसून तसें झालेलें,' असा अर्थ असतो.

**मय**—त्याचें घडलेलें, रचलेलें त्यानें युक्त; उ० सुवर्णमय, पाषाणमय, मृन्मय, चिन्मय, जलमय, वाङ्मय,

**मात्र**—तितकें, तितक्या प्रमाणाचें ; उ. क्षणमात्र, पळमात्र, लवमात्र, तिळमात्र, चिन्मात्र.

**रूप**—त्या सारखें; उ. तीर्थरूप, तेजोरूप, दुःखरूप, वसुरूप, रुद्ररूप.

**शः**—प्रत्येकीं, व्यक्तिमात्रें करून; उ. अक्षरशः, शब्दशः, क्रमशः.

**शाली**—शोभायमान, युक्त ; उ. गुणशाली, भाग्यशाली, दैवशाली, पुण्यशाली, इ.

**शील**—त्या स्वभावानें किंवा व्यासंगानें युक्त; उ, सहनशील, पुण्यशील अध्ययनशील, कर्मशील, दानशील, भक्तिशील. (हे शब्द 'पुण्य आहे शील म्हणजे स्वभाव ज्याच्या' असे बहुव्रीहि समासही होतील).

टीप—शाली आणि शील यांतला फरकः—शाली यांत त्यानें युक्त असा अर्थ आहे ; व शील यांत ते करण्याचा स्वभाव आहे

असा अर्थ असतो; उदा० पुण्यशाली म्हणजे पुण्यानें युक्त; आणि पुण्यशील म्हणजे पुण्यकरण्याचा आहे स्वभाव ज्याचा तो; या दोन्ही प्रत्ययांमध्यें असणारा फरक लक्षांत ठेवावा.

**शून्य**—रहित, विरहित, शिवाय; उ० ज्ञानशून्य, वैराग्यशून्य, विवेकशून्य, इ.

**हत**—नाहींसा किंवा नष्ट झालेलों आहे (पूर्वशब्दांतील अर्थ) ज्यापासून; उ० दैवहत; परंतु हा शब्द पुष्कळदां पूर्वींच येतो; उ० हतभाग्य, हतेच्छ, हतैश्वर्य, हतवीर्य, इ.

**हर, हर्ता, हारक, हारी,**—तत्तन्नाशक, तद्विरहित; उ० पापहर, विघ्नहर, मनोहर, विषहारक, पापहर्ता, मनोहारी, चित्तहारक, इ.

**हीन**—विरहित, शिवाय; उ० द्रव्यहीन, बुद्धिहीन, विवेकहीन, श्रद्धाहीन, बुद्धिहीन, इ.

**ज्ञ**—जाणणारा; उ० मनोज्ञ, गुणज्ञ, सुज्ञ, शास्त्रज्ञ, सर्वज्ञ, दैवज्ञ, इ.



## मराठी धातुसाधित शब्द.

४७७ मराठींत धातूंस प्रत्ययादि लागून नवीन शब्द तयार होतात; खालीं जे प्रत्यय दिले आहेत, त्यांपासून क्रियाकर्तृत्व, रीति, स्वभाव, योग्यता, व्यापार, इत्यादि अर्थांचा बोध होतो:—

**अ**—नट, खिंकाळ (खिंकाळणारा, किंवा खोडकर घोडा) हेर, इ.

**आ**—नाच्या, खेळ्या, लगंडा, नवशिका, नवशिक्या, झरा, ओढा, इ.

**आळ**—चोखाळ, ओढाळ, वाघाळ, खोडयाळ, इ०. (खालचा प्रत्यय पहा)

आळू—लाजाळू (लाजण्याचा ज्याचा स्वभाव तो) झोंपाळू, निजाळू, (संस्कृ० लु-प्रत्यय)

ऊ—मारू (जो मारतो तो), पोटभरू, लागू, चाटू, झाडू, इ.

आऊ—विकाऊ (विकण्याजोगा) जाळाऊ, पाळाऊ, लढाऊ, इ.

णाऊ—ठेवणाऊ (ठेवण्यास योग्य) खाणाऊ इ.

ईक—खरचीक (फार खर्चण्याचा स्वभाव तो), मोशीक, लवचीक, इ.

का—मारका (मारण्याचा ज्याचा स्वभाव तो), बोलका, जळका, भाजका, भिजका, कुजका (कुजलेला), फुटका (फुटलेला), मोजका, नेमका, फाटका, धडका.

रा—लाजरा (लाजतो तो), धावरा, शिवरा, चावरा, कापरा, मुतरा, हगरा, फेंदरा, भोंवरा.

री—पुजारी (पुजाकरण्याचें ज्याचें काम तो), रंगारी, भोनारी, वंजारी; खुपरी (खुपण्याचा जिचा स्वभाव ती; एकनेत्र रोग)

या (व 'ट्या')—विक्या (विकणारा), भाजीविक्या, उपट्या, उचल्या, लाकूडतोड्या, लढवय्या, वजवय्या, गवय्या, इ.

ईव—जाणीव (जाणण्याचा स्वभाव), नेणीव (अज्ञान)

ईत—लकलकीत (जें लकलकतें तें), थबथबीत, घुमघुमीत, चकचकीत, इ.

४७८ खालील प्रत्ययांनीं भूतकालवाचक विशेषणें होतात; उदा०:—

ईंव—घडींव (घडलेलें म्हणजे घडून केलेलें) पाळींव, ओतींव, विणींव, खारींव, इ.

ईत—पडीत (पडलेलें) विस्कळीत, इ.

ईर—फुगीर, फुटीर.

ईल—छापील, सडील, मडेल (मडलेलें).

ट—कुबट (कुबलेलें), धुपट, धुवट, खारट, बनावट, इ.

ईक–मडीक (सडलेलें), पढीक.

टीप—हीं कर्मणि विशेषणें आहेत, व यासाठीं सकर्मक धातूपासूनच होतात.

४७९ पुढें दिलेल्या प्रत्ययांनीं क्रियावाचक नामें होतात. त्यांच्यापासून क्रियेचें साधन, स्थान इत्यादि अर्थांचाही बोध होतो.

अ–(पु. स्त्री.) मार, बोल, डर, कर, मारामार, धांवाधाव, चोळाचोळ, इ.

आ–(पु.) भरडा (भरडलेला पदार्थ), ठेवा (ठेवलेलें), घेरा, झगडा, मारा, ठोका, चावा, हिसका, तोटा, मेळा, फेरा (शेवटच्या तीन शब्दांत धातूंच्या उपान्त्यास गुण झाला आहे)

आई–(स्त्री.) चढाई (चढून जाणें), लढाई, बढाई.

अवा–(पु. व स्त्री.) वाढवा (जास्त होणें) बोलवा, देखावा, इ.

आट–(पु. क्वचित् स्त्री.) गडगडाट (गडगडणें). कलकलाट, चिकचिकाट, सुळसुळाट.

आव–(पु)–चढाव (चढणें), पाडाव, ठराव, छिटकाव, जमाव, इ.

ई–(स्त्री.) बुडी (बुडण्याची क्रिया), थुंकी, उडी.

ण—(न. स्त्री.) चाळण, दळण, चढण, मेळण, इ.

णा—(पु.)—पाळणा, घोळणा.

णी—(स्त्री.) लेखणी (लिहिण्याचें साधन) करणी, भरणी, पाहाणी, पेरणी, कापणी, मिळवणी, इ.

णूक–(स्त्री.)—वर्तणूक, वागणूक (वर्तण्याची रीत), करमणूक, वाचणूक, नेमणूक.

ती—(स्त्री.)–वसती, भरती, गणती, गळती, खणती, ओढती, बढती (वाढती), इ.

प—(नपु.)—वाढप (वाढण्याचे पदार्थ) बांधप, वांटप; हडप इ.

**वण**—(स्त्री.) वाढवण, जेवण (जेववण ?) हयवण, कालवण (कालविता येईल ज्याचे साह्यानें असा पदार्थ), आंबवण, इ.

**णावळ**—यांप्रत्ययानें क्रियेचें मोल अशा अर्थाचे, किंवा ती क्रिया घडण्याचें स्थळ अशा अर्थाचे स्त्रीलिंगी शब्द होतात). उ० धुणावळ [धुण्याची किंमत], दळणावळ [दळण्याचें मोल], घडणावळ, खाणावळ [खाण्याचें मोल, किंवा मोल घेऊन जेथें जेवण मिळतें ती जागा] जेवणावळ म्हणजे जेवणाराची पंक्ति, म्हणजे पुष्कळ जेवणारे.



## मराठी विशेषणसाधित शब्द.

४८० मागें जीं भाववाचक नामें सांगितलीं, तीं विशेषणसाधित शब्दच आहेत; त्या शिवाय खालचे प्रत्ययांवरून आणखी विशेषणसाधित शब्द होतात :—

**शाई**—या प्रत्ययानें त्या त्या गुणाचा बोध होतो; उ० लगंडशाई (लगंडेपणा), सोदेशाई, पादशाई, इ०.

टीप—होळकरशाई, शिंदेशाई, निजामशाई, या शब्दांचा अर्थ प्रस्तुत 'त्यांच्या त्यांच्या अंमलातला प्रदेश' असा होतो.

**अट, ट, वट**—हे प्रत्यय विशेषणांस लागून दुसरीं विशेषणें होतात. परंतु त्यांचा अर्थ मूळ विशेषणांच्या गुणांचें आधिक्य किंवा कमीपणा असा असतो; उदा० लाबट, जुनाट, पिवळट, हलकट, पिंगट, खोलगट, पिसाट, मोळसट, मोळवट, कडवट, इ०.

**सर**—याच्या योगानें विशेषणेंच होतात; त्यांचा

अर्थ न्यूनतादर्शक असतो; उ० वेडसर, लालसर, काळसर, जाडसर, इ०.

टीप—याच अर्थाचे का, रा, ला, गा, हे प्रत्यय लागतात; उ० थोडका, थोरला, सोपारा, लहानगा, इ०.

**वाणा**—यापासून सादृश्य व न्यूनता यांचा अर्थ होतो; उ० दीनवाणा, लाजिरवाणा, गोजिरवाणा, इ०.

**टीप**—असा यांतील 'सा' एवढें रूप लागून त्यासारखा असा अर्थाचे शब्द होतात; उ० लहानसा, थोडासा, गोडसा, इवलासा, मोठासा, इ०. यांत पूर्वरूप संधी होतो.

४८१ आणखी कित्येक विशेषणसाधित शब्दः—

**पदार्थबोधक**—आंबटी.
**पट दाखविणारीं**—दिढी, सवाई, एकी बेकी इ०.
**समुच्चयार्थक**—पंचरत्नडा, पंचकडी, पंचवीशी.
**स्थळबोधक**—बागाईत, जिराईत.



## नामसाधित शब्द.

४८२ **अल्पत्वदर्शक**-नामें खालीं लिहिल्याप्रमाणें करितातः—

[अ] अ-आकारान्त पुल्लिंगीनामें ईकारान्त स्त्रीलिंगी करून; उ० डोंगरी, गडत्री, विळी, वाडी, कुंडी, टेंकडी, पळी, वाटी, इ.

[ब] कांहीं एकारान्त व अकान्त नपुसकलिंगी नामेंही अशाच रीतीनें अल्पत्वदर्शक होतात; उ० तपेलें, तपेली; बोंगणें, बोंगणी; पाठ, पिठी; टोपलें, टोपली, इ.

४८३ डी—प्रत्यय लागूनही अल्पत्वदर्शक नामें होतात; उ० पलंग, पलंगडी—(स्त्री); तबक, तबकडी; लाल, लालडी; इ०.

४८४ 'कुली' हा ही एक अल्पत्वदर्शक प्रत्यय आहे. हा प्रत्यय कित्येक शब्दांत 'कली' असाही होतो; उदाहरणें:—चांद, चांदकली; धनु—धनुकली; चिंधुकली, घरकुली, भातुकली, बेटकुली, कणगुली, बुभुकली, इ०. ही नामें स्त्रीलिंगी आहेत.

४८५ 'रूं' प्रत्यय लागून नपुंसकलिंगी अल्पत्वदर्शक कामें होतात; उ० पंख, पाखरूं; मेंढा, मेंढरूं; शिंगरूं, वासरूं, रांडरूं, म्हसरूं, इ०.

४८६ कट, ट, यांनीं नामप्रदर्शित गुण ज्यांत आहे अशा अर्थाचे शब्द ( बहुधा विशेषणें ) होतात; उदा० बळकट, मळकट, मेणकट, तेलकट, धुरकट, जिवट, फेंसट, हेकट, उवट, तुपट, लवचट (लांचट), इ०.

४८७ 'आर' (संस्कृ० कार) या प्रत्ययानें तो किंवा तत्संबंधी धंदा करणारा अशा अर्थाचे शब्द होतातः—उ० सोनार, लोहार, कुंभार, चांभार, इ०. कित्येक ठिकाणीं 'आर' बद्दल 'आरी' असें आढळतें; उ० चितारी, भुमारी, लोणारी, शिकारी, इ०.

४८८ आणखी कित्येक महत्वाचे प्रत्यय येणेंप्रमाणें आहेतः—

**आडी**—(डया)—गावाडया, नावाडी, (नाव चालविणारा); वाटाडी —डया (वाट दाखविणारा); मांगाडया शिंगाडया, इ०.

**आळू**—तो ज्यास फार आहे तो;—झोंपाळू, पित्ताळू, भुकाळू लाजाळू.

**आळ**—या प्रत्यय लागून जवळ जवळ अशाच अर्थाचे शब्द होतात; उदा० पाठाळ, घायाळ, खडकाळ, हाताळ, तोंडाळ, पायाळ (पायाळू), ओढाळ, इ.

**आळा**—काळ याचा संक्षेप—हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा, इ०.

**ई**—त्यासारखा किंवा तत्संबंधी—पैठणी, गुलाबी, हिंदुस्थानी, मारवाडी, कोंकणी, सरकारी, मोची, तांबोळी, न्हावी, तेली, इ०.

**या**—त्यासारखा किंवा तो गुण ज्याचे मध्यें आहे असा; उदा०—सोन्या, त्रिल्या, बायक्या, थाप्या, धांदल्या, दम्या, हुजऱ्या, गवत्या, इ०.

**र, री, रें**—या प्रत्ययांनीं मागील शब्दाच्या अर्थाचा गुण ज्यांत आहे असा, इत्यादि अर्थाचे शब्द होतात; हे प्रत्यय लागण्याचे पूर्वी मागील शब्दाचे अंत्यस्वरास 'ए' किंवा 'ओ' विकार होतो; उदा० हात, हतेर, हत्यार; पातेरा, माहेर (माता, माय-पासून; मायघर), सासुर,-सर, पिवूर, पायरी, वासरें, माहागरा, सांतरें, शिधोरी (शिजवलेलें अन्न), देवारा, घेवारा, पेटारा, मातेरा, दांतरा, शिवारा, हंसरा, इ०.

**वट**—त्यासारखा किंवा तत्संबंधी—रानवट, पोरवट, गहाणवट, माळवट, तळवट, धुळवट, खारवट, मसणवट, इ.

**स, सी(शी), सें**—तो ज्यास आहे तो; उदा० डोळस, हाडस, कणस (कण=दाणा), गोंडस, विटाळशी, पाउस, मुंडासा, मुंडासें.

**गा, गी**—पनगा, पानगी, पोरगी, वानगी, कणगी, कणगा, खानगी, मुलगा, मुलगी, दांडगा, सोटगा, इ०.

**वला, वळी**—करवला, करवली, कानवळ, गवळा, मुंडावळी. मुंडावळ, इ.

**वाला**—तत्संबंधी व्यापार करणारा—गाडीवाला, दूधवाला, बागवाला.

**वान**—तोच अर्थ—बागवान, गाडीवान, इ.

**ळ, आळ**—संस्कृ. आलय, स्थान;— देवळ, देऊळ, गंगाळ, घंगाळ, ताडयाळ, इ० विर + आळा (विरळा) = भिन्नस्थानचा; विगर + आळा, वेगळा.

**डा, डी**—तोच अर्थ आहे—कोनाडा, वाकडा, उकीरडा, मुखडा. हातोडा. शेगडी, रासुंडी, इ.

**डा, रडा**—निंदादर्शक—सोनारडा, म्हारडा, न्हावडा (न्हावगंड), शिपुरडा.

**वटा, वठा**—(स्थान) पानिवटा, पानवठा, दारवठा, मुखवटा, लालाटा.

**वडा, वाडा**—समुदाय; उदा० आटवडा, धुळवडा, पारवडा, पारवंडा, म्हारवडा, इ.

**कर, करी**—तें करणारा, किंवा तेथला राहाणारा; उदा० खांडकर, खेळकर, भंडकरी, वारकरी, देणेकरी, काशीकर होळकरी, गांवकरी, इ.

टीप—धनको, रिणको, हे शब्द अशाच प्रकारचे दिसतात, (सं. धनिकः, ऋणिकः) कर, करी, हे प्रत्यय संस्कृत 'कः' पासून झाले आहेत.

**ल, ला, ली**—गाखोली, धुरळा, ओझेली, हटेल.

**वंत, मंत**—(संस्कृत मत्, वत्.) श्रीमंत, द्रव्यवंत, दयावंत, भगवंत, बुद्धिमंत, इ.

**वणी**—हा प्रत्यय लागून त्या पदार्थानें मिश्रित असें पाणी असा अर्थ होतो; उदा० गुळवणी, चिंचवणी, मिठवणी, पेजवणी, इ.

**एल**-तेल याचा अपभ्रंश—खोबरेल, तिळेल, मोगरेल, उदेल, इ.
**चट**—सदृश, किंवा त्या चवीचा.=उदा० गुळचट, पानचट, मेणचट.
**इष्ट**—संस्कृत 'इष्ठ' प्रत्यय विशेषणास लागून त्यास तमभाव म्हणजे अतिशयितपणाचा अर्थ येतो; तोच हा प्रत्यय आहे. उ० कोपिष्ट, रागि(ष्ट)ट, भ्रमिष्ट, गर्विष्ट, इ०.
**री**-पट दाखविणारा; उदा० एकेरी, दुहेरी, तिहेरी.

टीप—सोनेरी, रुपेरी, इ० शब्द वरच्या सारखेच दिसतात.



फारशी व आरबी भाषेतील

## साधित शब्द.

४८९ आमच्या मराठी बोलणाऱ्या लोकांचा उत्तरेकडील मुसलमान लोकांशीं संबंध आल्यामुळें मराठी भाषेंत वरील दोन भाषांतील शब्द फार मिसळले आहेत. मराठेशाहींत व पेशवाईत हल्लीं ज्याप्रमाणें इंग्रजी भाषेस मान आहे, त्याप्रमाणें या दोन भाषांस विद्वान् व राजकारणी लोकांत फार मान असे. यामुळें कित्येक जुन्या लेखांतून या भाषेंतील शब्दांचा फारच भरणा आहे.

४९० फारशी व आरबी भाषा मूळच्या फार भिन्न आहेत. फारशीभाषा व संस्कृतभाषा यांचें मूळ एकच आहे. परंतु फारशी व आरबी यांचा निकट संबंध आल्यामुळें व पुढें पारसीकांनीं आरबी लिपीचा स्वीकार केल्यामुळें या दोन भाषांतले शब्द परस्परांत मिसळले आहेत.

४९१ या दोन्ही भाषांत स्वर जवळ जवळ मराठी

इतके आहेत. व्यंजनांची संख्या कमजास्त आहे. प-रंतु या भाषा व त्यांपासून ज्यांनीं फार शब्द घेतले आ-हेत अशा हिंदुस्थानी व उर्दू भाषा, ज्यांमधून मराठींत शब्द आले आहेत, त्या लिहितांना स्व-रांचा उपयोग फार कमी करितात. यामुळें मराठींत त्या भाषांतील शब्द लिहिण्याची तऱ्हा व उच्चार फार बदलले आहेत. या संबंधानें नियम बांधितां येतील, परंतु येथें विस्तार करण्याचें विशेष कारण दि-सत नाहीं.

४९२ फारशी भाषेंत लिंगांची तऱ्हा इंग्रजीप्रमाणें आहे; म्हणजे पुरुषवाचक प्राण्यांचीं नामें पुल्लिंगी, स्त्री-वाचक प्राण्यांचीं स्त्रीलिंगी, व निर्जीव पदार्थवाचक नामें नपुंसकलिंगी. आरबींत नपुंसकलिंग नाहीं. सिंधी, पं-जाबी व हिंदुस्थानी या भाषेंतही नपुंसकलिंगी शब्द पुल्लिंगी झाले आहेत. परंतु मराठींत हे शब्द येतांना लिंग नि-र्बंध कांहीं राहिला नाहीं. कित्येक तदर्थक दुसऱ्या मराठी शब्दांप्रमाणें झाले आहेत. व कित्येक विशेष कारणाखेरीज, किंवा अंत्यस्वरावरून, कोणच्या तरी लिं-गाचे झाले आहेत. या संबंधानें कांहींच नियम बांधितां येत नाहीं. (पहा नि० ६९).

४९३ मराठींत जे फारशी व आरबी शब्द आले आ-हेत, त्यांच्या संबंधाची दुसरी गोष्ट अशी आहे कीं, ह्या शब्दांचा मराठींत उपयोग करणें, त्यांना मराठी स्वरूप देणें अथवा त्यांचा अपभ्रंश करणें, या संबंधानें कांहीं नियम नाहीं. ज्या लोकांनीं या शब्दांचा उपयोग केला, त्यांस या दोन्ही भाषा चांगल्या येत होत्या असें नाहीं.

कित्येकांनीं तर फारशी व आरबी शब्द केवळ डौलानें व हौसेनें भाषेंत आणिले आहेत. यामुळें मराठींत त्यांचीं जीं रूपें बनलीं आहेत, त्यांचा मुळाशीं कांहींच मेळ बसणार नाहीं.

## फारशी साधित शब्द

### नामें.

४९४ **गर, गार, बान व वान** हे प्रत्यय नामांस लागून 'नामप्रदर्शित-व्यापारकर्ते' अशा अर्थाचे शब्द होतात; उदाहरणें:—

**गर**—सौदा (व्यापार), सौदागर (व्यापारी); जर (सोनें), जरगर (सोनार).

**गार**—गुनाह (पाप, अपराध), गुनाहगार, गुन्हेगार; खिद्मद् (सेवा), खिद्मद्गार; मददगार, इ०.

**बान, वान**—बाग, बागबान-वान; सार (फा० सुतुर, सं० उष्ट्र, उंट) सारबान,—वान; मिहिर, मेहरबान, मेजबान, मेजवानी, इ०.

४९५ **जार, दार, स्तान.** हे प्रत्यय लागून स्थानदर्शक नामें होतात; उदाहरणें:—

**जार**—गुलजार (पुष्पवाटिका)

**दान**—कलमदान, शमअदान (शामदान, मेणबत्ती ठेवण्याचें पात्र), गुलदान (पुष्पपात्र).

टीप—'दान' हा प्रत्यय मराठींत 'दाणी' असा होऊन स्त्रीलिंगी नामें होतात; उदा० अत्तरदाणी, गुलाबदाणी, पिकदाणी, मच्छरदाणी, पानदान (नपुं.).

**स्तान**—स्थान, हिंदुस्थान, अरबस्थान, तुर्कस्तान, अफघाणस्तान, कबरस्तान, इ०.

४९६ नामांस 'चा' किंवा 'ईचा' प्रत्यय लागून अल्पत्वदर्शक नामें होतात; उदा० बगीचा, गालीचा, इ०.

४९७ विशेषणांस 'ई' लाविल्यानें भाववाचक नामें होतात; जसें, नेकी, खशी, खुबी, शेखी, इ०. हाच प्रत्यय नामांस लागल्यानें अधिकार, गुण किंवा स्थिति, इत्यादिदर्शक नामें होतात; उदा० बादशाही, पादशाही, फकीरी, सौदागरी, दोस्ती, बंदस्ती, इ०. हीं नामें मराठींत बहुधा स्त्रीलिंगी असतात. विशेषणांस 'आ' आणि 'ती' लागून कित्येक भाववाचक नामें होतात; उदा० गरम, गरमा; कम, कमती, इ०.

## विशेषणें.

४९८ नामांस आ, गीन, मंद, वर (आवर), वार, हे प्रत्यय जोडिल्यानें नामप्रदर्शित पदार्थ बाळगणारा किंवा त्यानें युक्त, अशा अर्थाचीं विशेषणें होतात; उ०:—

**आ**—दान (ज्ञान), दाना (दाणा, ज्ञानी).

**गीन**—सुरमह् (अंजन), सुरमह्गीन.

**मंद**—दानिशमंद (ज्ञानी), अक्कलमंद, दौलतमंद.

**वर**—जान (प्राण), जानवर (जनावर); जोरावर (बळकट), नामवर.

**वार**—उमेद (आशा), उमेदवार; बयान (तपशील), बयानवार; तफ्शीलवार; (मरा० पट्टनवार, संगनवार, इ० शब्द याच प्रत्ययानें होतात).

४९९ नामांची पुनरुक्ति करून त्या नामांच्या अर्थाचा अतिशयपणा दाखविणारीं विशेषणें होतात; हीं होतांना त्यांमध्यें 'आ' लागतो; उदा० बर (छाती), बराबर; सरासर, रंगारंग(नानाविध),इ०.

५०० नामांस कित्येक फारशी कृदंतें वगैरे लागून विशेषणें व नामेंही होतात. त्यांतील मुख्य मुख्य खालीं सांगतों :—

**कुन** (कर्ता, करणारा)—कारकुन (कार्यकर्ता).

**अंदाज** (फेंकणारा, सोडणारा)—बरकंदाज,तिरंदाज, गोलंदाज

**गीर** (घेणारा)—अफनाब(ऊन)गीर, जहानगीर, अलमगीर.

**खोर, खूर** (खाणारा)—खुनखोर, हलालखोर (हलाल न्याय; न्यायानें पोट भरणारा), हरामखोर(अन्यायानें पोट भरणारा).

**दान** (जाणता)—कदरदान (योग्यता जाणणारा).

**दार** (बाळगणार, राखणारा)—रेशादार, चोबदार, पोतदार, दुकानदार, जमीनदार.

**नवीस** (लेखक)—खुशनवीस, चिठनवीस, पोतनवीस, फडनवीस, वाकिभनवीस (वांकनीस).

**बंद** (बांधणारा, बद्ध)—नालबंद, छप्परबंद, पगडबंद, हत्यारबंद, कमरबंद.

**बाज** (खेळणारा, रंगणारा)—इशकबाज (स्त्रैण), रांडबाज, दारूबाज, अफूबाज, कांवेबाज.

**बीन** (पाहणारा)—दुरबीन (दूरदर्शक यंत्र).

**माल** (वस्त्र)—रू (तोंड), रुमाल (मुखवस्त्र), दस्तमाल (भुजवस्त्र).

**जादा** (सं. जात, जन्मलेला)—शाहजादा (राजपुत्र), शाहजादी.

**बख्श** (दाता, थोर, क्षमावान्)—इनामबख्श, पीरबख्श, इ०.

५०१ **हम्** (परस्पर, समान, एकत्र)—हें अव्यय आहे. हें पूर्वी येऊन नामें होतात;—हमदील, हमरंग, हमरस्ता, हमचौरस, इ०.

५०२ **ना, कम, बे** (मं. वि.) बिन. हीं अव्ययें नामापूर्वी व विशेषणांपूर्वी येऊन अभावार्थक विशेषणें होतात; उदा०:—

**ना**—नाउमेद, नापसंद, नाचाक, नाचाकी (चाक-चपल), नाहक, नादार, नाखूष, नादान, नालाइक, नामर्द.

**कम**—कमनखत (नखत = दैव, मरा० कमनशी), कमजोर, कमनजर, कमकुवत, इ०.

**बे**—बेआबरू, बेअदब, बेइनसाफ, बेईमान (ईमान-धर्म, विधर्मी), बेजान, बेजाब, बेचार (मरा० बिचारा), बेदर्द, बेदम, बेशक, बेफिकर, बेफहम (फहम=ज्ञान,भान-मरा० बेफाम), बेवकूफ, बेशुमार.

**बिन**—बिनचुक, बिनहरकत, बिनधोक.

५०३ फारशी भाषेंत समास आहेत. हे बहुधा तत्पुरुष व बहुव्रीहि असतात; त्यांचीं कित्येक उदाहरणें:—

**खाना** (स्थान, स्थळ)—कारखाना, तोफखाना, दौलतखाना, फरासखाना, शेतखाना, इ०.

**आबाद** (स्थान)—औरंगाबाद, हैदराबाद, अहमदाबाद, दौलताबाद.

**नामा** (पत्र, ग्रंथ, इतिहास, लेख)-हुक्मनामा, (हुकुमनामा) रोजनामा, शाहनामा, जाहीरनामा, करारनामा, इ०.

**खुश** (चांगला)—खुशामद (आर्जव), खुशबो (सुगंध, बहु.), खुशरू (सुंदर मुख ज्याचें बहु.)

**बद** (दुष्ट)—बदफिअल (बदफैल,–वाईट आहे वृत्ति ज्याची, बहु) बदनाम, बदमाश, बदशूर, बदलौकिक (मरा०).

**पेश** (पुढील, मागील)—पेशबंद (खोगिराचा बंद), पेशव ('वर' पासून, पुढारी).

**सर** (सं. शिरस्, मस्तक, मुख्य)—सरकार, सरदार, सरपोश, सरपंच (मरा०), शिरजोर (मरा०), सरपेंच (शिरपेंच).

**आब** (सं. अप् पाणी)—गुलाब, गिलाव,–वा, गिल–मृत्तिका); आबरू (मुखावरील पाणी, प्रतिष्ठा).

१०४ आणखी कित्येक फारसी समास अर्थासुद्धां सांगतों:—

कारभार—(सं० कार्यभार), खरीदखत (विक्रयपत्र), औरंगजेब (सिंहासनभूषण), शाह-जहान-आलम (जगत्पति), मीरजाफीर (विजयी लोकांमध्यें मुख्य), मुजाफरजंग (रणशूर) शमशेरबहादुर, सलाबतजंग (=युधिष्टिर), नुरजहान (जगप्रकाश), पापोश (पायपोश मरा०=पादत्राण, पायत्राण), नेकनामदार (प्रतिष्टित), इ०.

१०५ कित्येक फारशी नामांमागें शब्दयोगी अव्ययें येऊन ते शब्द अव्ययीभाव समास (क्रियाविशेषणें) ह्मणून मराठींत आले आहेत; यांचीं उदाहरणें:—

**दर**–दररोज, दरदिवस.

**ब**–बजिन्नस, बदसूर (रीतीस अनुसरून) बेशम (मरा० बेशमी)

टीप—कधीं कधीं एक नाम दोन वेळ येऊन मध्यें 'ब' अक्षर (अव्यय) येतें; व अर्थ जगास तसें 'त्यासतें' असा होतो; उदा० रूबरू (तोंडासतोंड) हूबहू (मरा० ) हुबेहुब, (तत्त्वामन)

**बर**–बरहुकुम, बरतरफ.



## आरबी साधित शब्द.

### कृदन्तें.

५०१ मराठींत आरबी भाषेंतून कृदन्तें किंवा धातुसाधित नामें व विशेषणें फार आलीं आहेत. त्यांचे जे निरनिराळे प्रकार आहेत, त्यांतील मुख्य मुख्य येथें सांगतों.

**प्रकार १**–धातूंच्या वर्णांस अनुक्रमें 'आ' 'इ' 'अ' हे स्वर जोडून कर्तरि विशेषणें होतात; आणि प्रथम वर्णापूर्वीं 'म' हें अक्षर घालून दुसऱ्यास व तिसऱ्यास अनुक्रमें 'ऊ' व 'अ' जोडिल्यानें कर्मणि विशेषणें होतात; जसें, धातूचे वर्ण अनुक्रमें 'प, फ, व,' असल्यास कर्तरि विशेषण 'पाफिव' आणि कर्मणि विशेषण 'मप्फूव' असें होईल.

टीप—आरबी भाषेंतील बहुतेक धातू त्र्यक्षरी आहेत.

**उदाहरणें**—नजर (पाहणें), नाजीर (नाझर—द्रष्टा कर्तरि), मन्जूर (मंजूर केलेलें—कर्मणि). हुकम, आज्ञा करणें); हकीम (शास्ता). अलम (जाणणें); आलिम (पंडित). मअलूम (मालूम—ज्ञात); जहर (दिसणें); जाहीर (दृश्य). शहर, (प्रसिद्ध करणें); मशहूर (प्रसिद्ध). मलक (बाळगणें), मालिक(धनी). शहद(पाहणें); शाहिदी (शायदी—साक्ष) वकल(हयगयकरणें); घाफिल (गाफिल, मूर्ख). अशक (इच्छिणें), आशीक (इच्छिणारा), माअशूक (इष्ट). कदर (सोसणें); कादिर (समर्थ), मकदूर (शक्ति). हसल (जमाकरणें); हासील (उत्पन्न), महसूल (जमा झालेलें).

टीप—या प्रकारचे कित्येक अनियमित शब्द—माजी (मजबरणें); राजी, काजी, काइन, हामी (रक्षक, जामीन) इ०.

**प्रकार २.**—प्रथम वर्णापूर्वी 'मु' ठेऊन त्यास 'अ' दुसऱ्या वर्णाची आवृत्ति करून ह्मणजे दुप्पट करून पुढें 'इ', आणि तिसऱ्यास 'अ' जोडून कर्तरि विशेषण होतें; दुप्पट केलेल्या दुसऱ्या वर्णांत 'अ' मिळवून कर्मणि विशेषण, आणि प्रथम वर्णापूर्वी 'त', दुसऱ्यास 'ई', आणि तिसऱ्यास 'आ' जोडल्यानें क्रियावाचक नाम होतें; जसें धातु 'प, फ, ब' 'असा असल्यास कर्तरि विशेषण 'मुपफ्फिब' कर्मणि 'मुपफ्फब' व क्रियावाचक नाम 'तप्फब होतें.

**उदाहरणें**—अलम (शिकविणें); मुअल्लिम (मालिम), तआलिम (तालिम-शिक्षा). हसल (जमविणें); महस्सिल (मिळविणा) तहसील (कर) कदम (पुढें जाणें); मुकद्दम (पुढारी) मुकद्दम (मोकद्दमा, पूर्वभाग). लमअ (आच्छादणें); मुलमआ (मुलामा). फसल (विभाग करणें); तफसील (विभागानें वर्णन). अरफ (सावरणें); तअरीफ (तारीफ—स्तुति). करर (बोलणें); तकरार (वादविवाद).

**प्रकार ३.**—धातुचे वर्ण 'प, फ, ब' असल्यास 'मुपाफीब,' 'मुपाफब' आणि 'मुपाफबत' अशीं कर्तरि आणि कर्मणि विशेषणें व क्रियावाचक नामें अनुक्रमें होतील. उदा० सफर (जाणें); मुसाफिर (प्रवासी). मुसाफरत (प्रवास), अमल (अधिकार चालविणें) मुआमलात किंवा मुआमला (मामला, अधिकार).

**प्रकार ४.**—धातुवर्ण 'प, फ, ब' असल्यास कर्तरि व कर्मणि विशेषणें व क्रियावाचक नामें हीं अनुक्रमें 'मुपफिब'

'मुपफब' आणि 'इपफाब' अशीं होतात. उदा० नसफ (न्याय करणें) मुनसिफ (न्यायधीश), इनसाफ (न्याय). नवब (राखणें); मुनीब (मुनीम). रवद (इच्छिणें); इरादा (इच्छा, हेतु). दवर (परतणें); इरादा (हेतु). करर (बोलणें); इकरार (वचन) इ०.

**प्रकार ५.**—धातुवर्ण 'प, फ, ब' असल्यास हे शब्द अनुक्रमें 'मुतपक्-फिब' 'मुतपफ़-फब' व 'तपफ-फुब' अशीं होतात; उदा० अलक (आश्रय करणें), मुतअल्-लिक (मुतालिक), तअल्-लुक (तालुका-आश्रयस्थान).

**प्रकार ६.**—जर धातुवर्ण 'प, फ, ब' असले तर हे शब्द अनुक्रमें 'मुतपाफिब,' 'मुतपाफब' व 'तपाफुल' अशीं होतील. उदाहरणें:—लशय (शोधणें); तलाश (शोध); मशाय (दाखविणें); तमाशी (तमाशा-देखावा).

**प्रकार ७.**—धातुवर्ण 'प, फ, ब' असता हे शब्द अनुक्रमें 'मुप्तफिब' 'मुप्तफब' व 'इप्तिफ़ाब' असे होतील; उदा० अदद (गणणें), मुअतद्द (मोताद, मोजलेला), अबर (विश्वास ठेवणें); मुअतबर (मानवर, थोर, विश्वासु); इअतिबार, (इतबार, विश्वास); खयर (निवडणें); मुखतियार (निवडक), इखतियार (अखत्यार, शक्ति).

५०७ वरील प्रकारचे कित्येक शब्द, जे मराठींत विशेष प्रचारांत आहेत, ते त्यांचीं मराठींतील रूपें व अर्थ यांसुद्धां खालीं देतों:—फ़र्क (अंतर, फरक), घर्क (गर्क, बुडालेला), खर्च (खर्च), कब्र (थडगें), दअ्वा (दावा), घल्ला (गल्ला), नक्श (नकाशा), नक्ल (नक्कल, गोष्ट), कसब (कसब, उद्योग), हल्वा (हलवा, मिठाई), इश्क (इष्क, इशक), इल्म (इलम), फिक्र (फिकीर, विचार), इम्ला (इमला, कृत्य), हुक्म (हुकूम), ज़ुल्म (जुलूम), उर्स (उरूस-समारंभ), मुल्क (मुलूख), कुफ़्ल (कु-

लूप), तुर्रा (तुरा), उहृदा (हुद्दा), सफर, अमल (अंमल), मजब (गहजब), सबब, तबक, दवा (औषध), घरज (गरज), खबर, सनद, तलब (तलफ–उत्कंठ–छा), तरफ (बाजू), फना (फन्ना–नाश), कलम (लेखणी), कदम (पाऊल), खलास (मुक्ति), सलाम (नमस्कार), सलाह (सल्ला–मैत्री), शराब (मद्य), फसाद (फिसाद–दुष्टत्व–लढाई), रवाज (रिवाज–रीत), कमाल (पूर्णता), जबाब (उत्तर), सनाअ (मत्ता–सामान), हिसाब (हिशेब, हिशोब), दिमाघ (दिमाख, गर्व), किताब (लेख. ग्रन्थ), इलाज (उपचार), खुलासा (अनुमान, तात्पर्य), खराबा (नाश), खलबत (खलबत, गोप्य), दहशद (भीति), शर्बत (पेय), गफलत (दुर्लक्ष), हजरत (दर्शन), लज्जत (लजत, आनंद, रुचि) कसरत (वैपुल्य, वृद्धि, अभ्यास). हिकमत (युक्ति), दिक्कत (शंका), निसबत (नातें, संबंध), मिलकत (मिळकत, धन), हुज्जत (तर्क, हुजत, वाद). हुरमत (हुरमत, मान), सुहबत (सोबत), रुखसत (आज्ञा, मोकळीक), फुरसत (मोकळीक, आराम), हरकत (प्रतिबंध), दौलत (संपत्ति), बरकत (समृद्धि), हजामत, अदावत (द्वेष), अदालत (न्याय, न्यायसभा), सलामत् (सुरक्षितपणा), जमाअत (जमात, मंडळी), इमारत (बांधणी), कीमत (मूल्य), किताबत (लेख, शिलालेख, इ०), किफायत (वैपुल्य, पूर्तता), हकीगत (सत्य, सत्यनिरूपण), तबीयत (तबेत, प्रकृति), फजीहत (फजीति, अपमान), हुकूमत (अधिकार, सत्ता), सूरत (रूप, आकृति, रीति), खातिर (खातर, मत, स्मृति, कारण, इच्छा), रातिब (रतीब, नित्यान्न), फाइदा (फायदा), काईदा (कायदा, नियम), जरूर (आवश्यकता), हुजूर (दर्शन), शुरूअ (सुरू, बहुवचन=सुरुवात, शुरुआत), वुकूफ (वकूफ, ज्ञान), वुसूल (वसूल, आगमन, संयोग, पदार्थप्राप्ति), रुजुअ (रुजु, अवधान, समक्षता; बहुवचन=रुजूआत,रुजूवात) नुकसान (तोटा, अहित), तूफान (पूर, झंझावात), वसीला (संयोग, संबंध,

आचार), मख्मल (मखमल, कौशेय), मर्ज़ी (मर्जी, इच्छा, मत), मीरास (वडिलोपार्जित), मरम्मत (मरामत, नीट) मिहरब, (मेहरब, कोनडा), मुरुव्वत (पौरुष, धैर्य, प्रीति, सभ्यपणा) मदरसा (शाळा), मनसब (मनसब, अधिकार), मशअल (मशाल, दीप), मजलस (सभास्थान, सभा), मसजिद (मशीद, भजनस्थान), मौसिम (मौसम, ऋतु), मकान (मकाण, वसतिस्थान), मीनार (मनोरा, घुमट), महल्ल (महाल, घर, वाडा, अन्तर्गृह), मुतबख (मुदबक, मुदपाक, पाकशाला), फकीर (भिक्षुक), हकीम (वैद्य, ज्ञानी), गरीब (गरीब, प्रवासी, परका), वकील (प्रतिनिधी, उपदेशकर्ता), वज़ीर (अमात्य), हज्जम (तुमडी लावणारा, केश काढणारा), हम्माल (हमाल, ओझें वाहणारा), अत्तार (सुवासिक तेलादिविकणारा), सर्राफ, (सराफ, पैशाची घडामोड करणारा), कस्साब (ह्याचा अपभ्रंश कसाई, खाटिक), फर्राश (फराश; अंथरूण, बैटक घालणारा), सुलतान (अधिकारी, राजा), मुसल्मान (धार्मिक, यवन) शैतान (सैतान, पिशाच), तैयार (त्वरित, शीघ्रगामी; तयार), हराम (अनन्वित, अशास्त्र), हलाल (शास्त्रयुक्त), खराब (दुष्ट, वाईट), हलाक (नष्ट, क्लान्त), तमाम (पूर्ण, सर्व), जुलाब (जुलाब, ढाळक), जासूस (जासूद, दूत), मसखरा (मस्कऱ्या, विदूषक; मसखरी=मस्करी), मिस्कीन (दरिद्र, गरीब).

९०८ नामांस 'ई' लाविल्यानें तत्संबंधी अशा अर्थाचीं विशेषणें होतात; उदा० मिसर् (देश), मिसरी; अरब, अरबी; हलवा, हलवाई; इ०.

९०९ 'ला' हा निषेधार्थी प्रत्यय फारशी व आरबी नामांपूर्वी लागून विशेषणें होतात; उदा० ला-वलद (निपुत्रिक); ला-चार (चार=साधन)=पंगु; इ०.

९१० 'बिल' हें शब्दयोगी अव्यय नामामागें येऊन अव्ययें होतात; उदा० बिलाशक.

५११ 'घैर' (गैर) हें शब्दयोगीअव्यय लागून उलट अर्थाचे शब्द होतात. उदा० गैर-शिस्त, गैर-हाजीर, गैर-मर्जी, गैर-खर्च, इ०.

टीप—मराठींतले गैरा, वगैरे, हे शब्द यापासूनच झाले आहेत.

५१२ 'ची'(मरा०जी) हा प्रत्यय लागून व्यापार-बोधक नामें होतात; उदा० मशाल(ची)जी, पखाल(ची)जी, बबर(ची)जी, इ०.

५१३ अरबीभाषेंत समास नाहींत. समास करणें असल्यास मध्यें 'उल्' (मरा०'चा') शब्दयोगी अव्यय घालून करितात. 'ल्'चा संधी होऊन क्वचित् 'द्' होतो; उदा० सिराज-उल् (द्)-दौलह्; निजाम-उल्-मुलुख (देशाचा व्यवस्थापक); अला-उल्(द्)-दीन; इ०.

५१४ बिन (इब्न=पुत्र), वल्द (पुत्र), कौम (मरा० कोम—स्त्री, कुटुंब) इत्यादि अरबी शब्द मराठी नावांमध्यें येतात, हे सर्वप्रसिद्धच आहेत. उदा० 'रामा बिन हरी,' 'बाळू वल्द भिवा,' 'राधा कोम विठोजी,' इ०. यांचा संबंध पुढील नामांशीं असतो.



# वाक्यरचना.

## वाक्यांचे भेद व वाक्यावयव.

५१५ ज्या शब्दसमुदायाचे योगानें बोलणाराचे मनांतील अभिप्राय उघडपणें कळून येतो, त्यास **वाक्य** असें म्हणतात.

५१६ प्रत्येक वाक्यांत दोन भाग मुख्य असतात; एका भागावरून आपण ज्या कोणाविषयीं बोलतों, त्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा बोध होतो; व दुसऱ्यावरून जें कांहीं त्याविषयीं आपण बोलतों, तें समजतें.

५१७ वाक्यांत ज्याविषयीं आपण बोलतों, त्यास **उद्देश्य** असें म्हणतात; व जें कांहीं उद्देश्याविषयीं आपण सांगतों, तें **विधेय** होय. उदा० 'घोडा चालतो;' यांत 'चालणें' ही गोष्ट 'घोड्या'बद्दल आपण बोललों, म्हणून 'घोडा' **उद्देश्य**; आणि त्या उद्देश्याबद्दल 'चालतो' हें सांगितलें, म्हणून तें **विधेय** होय.

५१८ वाक्यांचे भेद दोन प्रकारांनीं करितां येतात. १ अर्थावरून, व २ रचनेवरून.

५१९ अर्थावरून वाक्यांचे भेद **विधानार्थक** वाक्य व **प्रश्नार्थक** वाक्य असे दोन होतात.

५२० ज्या वाक्यांत अमुक स्थिती आहे इतकेंच नुसतें

सांगितलेलें असतें, त्यास **विधानार्थक** वाक्य म्हणतात ; उदा० 'त्याच्या शेतांत ऊंस पिकतो.' 'आज पाऊस पुष्कळ पडला.' 'तूं आपला धडा केला नाहीं.' इ०.

९२१ विधानार्थक वाक्यें **करणरूपीं** किंवा **सत्तावाची,** व **अकरणरूपीं** किंवा **निषेधार्थी** हीं असतात. जसें, 'तो गेला' हें **करणरूप,** व 'तो न गेला' किंवा 'गेला नाहीं,' हें **अकरणरूप.**

९२२ ज्या वाक्यांत प्रश्न केला असतो, तें प्रश्नार्थक वाक्य. जसें, 'तो तेथें आहे काय?' 'आमचा घोडा कोठें उधळून गेला?' इ.

९२३ वाक्यांचे आणखी अर्थावरून (१) **विध्यर्थक वाक्यें,** (२) **संशयार्थक वाक्यें,** व (३) **संकेतार्थक वाक्यें,** असे भेद करितां येतील.

९२४ विध्यर्थक वाक्यांत आज्ञा, उपदेश, प्रार्थना, अटकळ, अजमास, इ० असतात. उ० 'तूं जा.' 'मुला; असें करूं नये.' 'देवा, माझें बरें कर;' 'आज पाऊस पडावा.' इ०.

९२५ संकेतार्थक वाक्यांत एक विधान दुसऱ्यावर अवलंबून असतें. जसें, 'तो गेला, तर मी जाईन.' इ०.

९२६ संशयार्थक वाक्यांत बोलणाराचे मनांतील संशय दिसून येतो. उदा० 'माझ्यानें देववत असेल;' 'तो वाचीत असेल.' इ०.

९२७ ज्या वाक्यांत आज्ञार्थ, विध्यर्थ, **संशयार्थ, किंवा संकेतार्थ** नसतो, त्यास **स्वार्थी वाक्य** असें **म्हणता-**

त. **स्वार्थ** म्हणजे मुळची, स्वतःची, किंवा स्वाभाविक स्थिति.

१२८ रचनेवरून वाक्यांचे तीन भेद होतातः— १ **शुद्धवाक्य**; २ **मिश्रवाक्य**; व ३ **संयुक्तवाक्य**.

१२९ शुद्धवाक्यांत एकच उद्देश्य व एकच विधेय असतें. जसें, 'तो चपळ घोडा वाऱ्यामारखा उडून गेला;' 'तुम्हां राजद्रोह्यांना मी भेटूं इच्छित नाहीं;' इ०.

१३० मिश्रवाक्यांत एकच मुख्य उद्देश्य व एकच मुख्य विधेय असतें. परंतु तदवलंबी अशीं दुसरीं उद्देश्यें व विधेयें असतात. जसें, 'जो मुलगा मी पाहिला, तो हाच;' 'ज्या घोड्यावर तो बसला आहे, तो काळा आहे;' इ०.

१३१ मिश्र वाक्यांत एक **प्रधानवाक्य** असतें, ज्यांत वाक्याचा मुख्यार्थ असतो; व दुसरीं वाक्यें **गौण** असतात, त्यांस **अवलंबी वाक्यें** म्हणतात. उदा० 'तुम्हांस असें वाटतें, हीं तुमची चूक आहे;' या वाक्यांत, 'तुमची चूक आहे' हें प्रधान वाक्य होय; व 'तुम्हांस असें वाटतें,' हें अवलंबी वाक्य आहे.

१३२ अवलंबी वाक्यें नामाचें, विशेषणाचें, किंवा क्रियाविशेषणाचें काम करितात, त्या त्या प्रमाणें त्यांस, **'नामवाक्य,'** **'विशेषणवाक्य,'** आणि **'अव्ययवाक्य'** किंवा **क्रियाविशेषण वाक्य** असें म्हणतां येईल. उ० 'मला ठाऊक आहे कीं तो येणार आहे.' यांत 'तो येणार आहे,' हें **नामवाक्य**. 'जो मुलगा मी पाहिला तो हाच आहे.' यांत 'जो मुलगा मी पाहिला,' हे वाक्य

'तो' याचें विशेषण आहे, म्हणून तें **विशेषणवाक्य** होय. 'तुम्ही सांगाल तिकडे मी जाईन' यांत 'तुम्ही सांगाल' हें क्रियाविशेषण वाक्य आहे.

५३३ **संयुक्त वाक्यांत** दोन अथवा अधिक **शुद्ध, मिश्र** अथवा **संयुक्त** वाक्यें जोडलेलीं असतात. जसें, 'तो घरीं आला आणि तसाच परत गेला;' 'या पक्ष्यास कोणी तरी गोळी घातली असावी, अथवा धोंडा मारिला असावा;' 'मी त्याच्या येथें गेलों, पण तो भेटला नाहीं.' इ०.

५३४ केव्हां वाक्यांत मुख्य क्रियापद नसून धातुसाधित अव्ययाचे किंवा विशेषणाचे योगानें विधेयाचें किंवा क्रियापदाचें काम होतें. अशा वाक्यांस अपूर्ण वाक्यें किंवा **वाक्यांश** म्हणतात. उदा० 'मी घरीं नसतां तो आला' यांत 'मी घरीं नसतां' हा वाक्यांश होय.

५३५ वाक्यांशांनीं नाम, विशेषण किंवा अव्यय यांचें काम होतें, त्यावरून त्यांस **नामवाक्यांश, विशेषणवाक्यांश** किंवा **अव्ययवाक्यांश** असें म्हणावें.



## कर्ता, कर्म आणि क्रियापद.

५३६ वाक्यघटित शब्दांत क्रियापद मुख्य होय. तें उक्त किंवा अध्याहृत असल्यावांचून वाक्य होत नाहीं. जसें, 'तो काम करितो,' 'त्यानें चित्र काढिलें.' इ०.

(अ) 'स्नान, संध्या, टीळे, माळा । पोटीं क्रोधाचा उमाळा ।
नित्यनेम, खटाटोप । मनीं विषयाचा जप' ।

रामदास.

या वाक्यांत चारी चरणांत क्रियापद उक्त नाहीं; तथापि त्यांत 'आहे,' 'आहेत,' यांचा **अध्याहार** आहे.

(आ) तसेंच,

> 'गांगेय म्हणे, सुभगे, धर्म परम सूक्ष्म, यास्तव स्पष्ट
> 'एसेंच' असें मजला वदवे ना; हा विचार बहु कष्ट.'
>
> मोरोपंत.

येथें दुसऱ्या व चवथ्या चरणांत 'आहे' हें क्रियापद अध्याहृत आहे. 'तुम्ही आमचे धनी, तुमच्या कृपेनें आमची थोरवी; आणि तुम्हींच आमचा त्याग कराल तर कसें!' इत्यादि अध्याहृतार्चीं उदाहरणें अनेक सांपडतील.

५३७ प्रत्येक वाक्यांत कर्ताही अवश्य पाहिजे; परंतु तो सर्व वाक्यांत असतोच असें नाहीं; जसें, 'हल्लीं साडे पांच वाजता उजाडतें;' 'मला मळमळतें' 'त्याला आज फावणार नाहीं' इ० या वाक्यांत कर्तृपदाचा सामावेश क्रियापदांतच होत असल्यामुळें निराळा कर्ता वाक्यांत नाहीं. या वाक्यांस, 'साडे पांच वाजता उजाडणें होतें.' 'मला मळमळ करितें;' 'फावणें होणार नाहीं' असें स्वरूप देऊन पाहिजे तर कर्ता सांगावा.

५३८ कित्येक ठिकाणीं क्रिया अमक्यानें केली असें सांगण्याची वक्त्यास, व ऐकण्याची श्रोत्यास गरज नसते. अशा ठिकाणीं वाक्यांत कर्ता नसतो. उदा० 'महाराज, पानें वाढलीं, जेवावयास उठावें;' 'आजेच केलें म्हणजे कोण वळत नाहीं!' इ०.

५३९ वाक्यांत प्रथम व द्वितीय-पुरुष सर्वनामें कर्ते असता पुष्कळ वेळां क्रियापदाच्या रूपावरूनच कर्त्याचा बोध होतो, म्हणून तेथें कर्ता घालीत नाहींत; जसें;

> 'नसेन दिसलों कसा, नयन सर्वसाक्षी रवी'।
> 'घालूं पाहासि दंष्ट्रा उपटाया अहिमुखांत आंगोळी'।

'जा, जा; उठा, मुलीला पाहूं, वाहूं वरा, घरा आणा' ।
मोरोपंत.

५४० एखाद्या सर्वज्ञात किंवा जगांत साधारणतः सांपडणाऱ्या गोष्टीचें तृतीयपुरुषीं सामान्येंकरून विधान करावयाचें असतां कर्ता घालीत नाहींत; परंतु अशा वाक्यांत क्रियापद अनेकवचनीं असतें; जसें, 'असें सांगतात कीं, पूर्वी खतें लिहून घेतल्याखेरीज कर्ज देत.'

'भगा प्रणतवत्सला, म्हणति त्या जनां पावला' ।
'म्हणति, मनुष्य नव्हे हा, राक्षस कीं काळ हा खवळला हो'
मोरोपंत.

५४१ क्रियापद सकर्मक असल्यास वाक्यांत नेहमीं कर्म पाहिजे. परंतु कित्येक सकर्मक क्रियापदांचा कर्मावांचून उपयोग करितात; जसें, 'जेव्हां पाहावें तेव्हां रामा वाचीत असतो.' 'ती संध्याकाळीं शिवीत बसते.' 'तो चांगला गातो.' इ०.

५४२ वस्तुतः अशा वाक्यांतील क्रियापदास कर्माची अपेक्षा नसते, म्हणून यांस अकर्मक क्रियापदें म्हणावें हें प्रशस्त दिसतें.



## प्रयोग.

५४३ वाक्यांत कर्ता आणि कर्म यांचे अनुरोधानें असणारी जी क्रियापदाची स्थिती, त्या स्थितीस **प्रयोग** असें म्हणतात. हे प्रयोग तीन आहेत. १ **कर्तरिप्रयोग**, २ **कर्मणिप्रयोग**, आणि ३ **भावीप्रयोग**.

५४४ जेव्हां वाक्यांत कर्त्याच्या अनुरोधानें क्रियाप-

दाची स्थिती असते, म्हणजे त्याच्या लिंग वचन पुरुषां-प्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन, व पुरुष फिरतात, तेव्हां तेथें **कर्तरिप्रयोग** म्हणतात; जसें, 'तो असतो;' 'ती जाते;' 'तो पुस्तक वाचितो;' 'ते भात जेवले.' इ०.

५४५ जेथें वाक्यांत कर्माचे अनुरोधानें क्रियापदाची स्थिती असते, म्हणजे त्याच्या लिंग वचन-पुरुषांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन व पुरुष फिरतात, तेथें **कर्मणिप्रयोग** म्हणतात; जसें, 'त्यानें पुस्तक वाचिलें;' 'रामानें गाई बांधिल्या.' इ०.

५४६ जेथें वाक्यांत कर्त्याचे किंवा कर्माचे अनुरोधानें क्रियापदाची स्थिती नसून, तें नेहमीं स्वावलंबी असतें, तेथें **भावीप्रयोग** जाणावा; उदा० 'रामानें रावणास मारिलें;' 'त्यानें घरीं जावें;' इ०.

## कर्तरिप्रयोग.

५४७ कर्तरिप्रयोगांत कर्ता प्रथमान्त असतो; क्रियापद सकर्मक असल्यास कर्म द्वितीयान्त असतें.

५४८ द्वितीयाविभक्ति एक प्रथमेप्रमाणें प्रत्ययविरहित असते. किंवा ती विभक्ति 'स, ला.' इ० प्रत्यय लागून होते. पहिली 'अ-प्रत्ययद्वितीया' व दुसरी 'स-प्रत्ययद्वितीया,' हें मागें सांगितलेंच आहे (पहा नि. १२८).

**५४९ कर्तरिप्रयोगांत क्रियापद सकर्मक असतां कर्में जर अचेतन पदार्थवाचक शब्द असले, तर त्यांची अ-**

**प्रत्यय द्वितीया** करितात; जसें, 'गोपाळा दूध पितो;' 'यमुना चोळी शिवते;' 'मी पुस्तक वाचितों;' इ०.

९९० मनुष्येतर प्राणिवाचकनामें कर्मे असल्यास द्वितीया कोणच्याही प्रकारें करितां येईल. उदा० 'रामा शेळ्या राखितो;' 'यमुना मैना पाळिते;' 'मोतद्दार घोडा आणील;' 'मोतद्दार घोड्यास आणितो;' 'यमुना मैनेस पाळिते;' इ०.

९९१ मनुष्यवाचक विशेषनामें कर्मे असल्यास **स-प्रत्यय-द्वितीया** करितात; उदा० 'तो रामास बोलावितो;' 'मी विष्णूस भेटेन;' इ०.

टीप—'धर्म द्रौपदी पणास लावितो;' 'लक्ष्मण सीता वनांत सोडून गेला;' असले प्रयोग क्वचित् आढळतात; येथें दोन्हीं रूपें चालतात. तसेंच, 'आज रावण सीता चोरील;' 'अर्जुन आज कर्ण मारील;' असेही प्रयोग पुष्कळदा आढळतात. घडलेल्या कथा पुराणिक कथन करित असतां किंवा नाटककार त्या नाटक-रूपानें दाखवीत आहे असा अर्थ असतां असले प्रयोग होतात; या संबंधानें असा नियम बांधितां येईल कीं, कर्मवाचक शब्दा-बद्दल मुख्यत्वें किंवा विशेष रीतीनें उल्लेख करून सांगावयाचें असतां अशा प्रकारचे प्रयोग करितात.

५५२ वाक्यांत दोने कर्मे असून त्यांतलें एक जेव्हां संप्रदानार्थक म्हणजे चतुर्थी-विभक्त्यन्त असतें, तेव्हां कर्मपद जरी मनुष्यवाचक विशेषनाम किंवा सर्वनाम असलें, तरी त्याची अप्रत्ययद्वितीया करितात; उदा० 'मी तुला हरी दाखवितों;' 'जनक रामास जानकी देतो;' इ०.

९९३ मनुष्यवाचक **सामान्यनामें** कर्मे असल्यास दोन्हीं प्रकार प्रचारांत आहेत; उदा० 'मी लोक किंवा

लोकांस बोलावितो;' 'तो मुलगे किंवा मुलग्यांला बोलावील;' 'तो आपला मुलगा शाळेंत पाठवितो, किंवा आपल्या मुलास शाळेंत पाठवितो;' इ०.

१९४ कर्तरि सकर्मक क्रियापदाचे सर्वनामशब्द कर्म असल्यास वरील नियमच लागतात; ह्मणजे तें सर्वनाम मनुष्यवाचक विशेषनामाबद्दल घातलें असल्यास सप्रत्यय द्वितीया होते; तें सामान्यनामाबद्दल घातलें असल्यास कोणच्याही प्रकारची द्वितीया होते; परंतु तें सर्वनाम निर्जीवपदार्थवाचक नामाबद्दल किंवा मनुष्येतर प्राणिवाचक नामाबद्दल घातलें असल्यास सर्वनामाची द्वितीया प्रत्यय न लावितां करितात; उदा० 'काल रामा आला होता, आजही त्यासच बोलाव;' 'कृष्णा आला नव्हता, त्यास बोलावूं नको;' 'काल जो शिपी आला होता, तोच आज आण, किंवा त्यासच आण;' 'जो घोडा त्यानें पसंत केला आहे, तो तो घेईल;' 'ती शालजोडी चांगली आहे, तो ती आनंदानें स्वीकारील.' इ०

१९५ प्रथम-पुरुष वाचक व द्वितीय पुरुष वाचक सर्वनामें कर्तरि क्रियापदांचीं कर्मे असतां त्यांची द्वितीया प्रत्यय लावून केली पाहिजे; जसें; 'मी तूं पाहीन' किंवा 'मी ती पाहीन,' असे प्रयोग न होतां 'मी तुला पाहीन,' 'मी तिला पाहीन,' असे प्रयोग होतात.

(अ) वरील सर्व नियम कविजन पाळीत नाहींत, कविजन त्यांचे विरुद्ध प्रयोग आढळतात. उदाहरणें:—

" समर्थी **पराक्रमातें** करिती शुभयशोधनाश समयज्ञ "

'बरें तुजचि सोमेंच रचून, कृत्तिवासा **गरा**'
न पी नरि कर्में घेई हितकरा दयासागरा। मोरो०
'परि प्रभुहि संग्रहीं **सकल वस्तुला** ठेविती
**गुणा** न म्हणतां उणा अधिक, आदरें भाविती।' मोरो०
'आरक्त करी, चावि **अधरातें**, फार तो मनीं पोळे,
शस्त्र सुयोधन वास्यें कांपे, चोळी करें **करा** डोळे' मोरो०



## कर्मणि व भावी प्रयोग

५९६ कर्मणिप्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असून कर्मपद प्रथमान्त असतें. उ० 'रामानें काम केलें.'

टीप --हा प्रयोग धातु सकर्मक असल्याशिवाय होत नाहीं. कर्मपदाची प्रथमा असली म्हणजे त्याप्रमाणें क्रियापद असतें, म्हणजे तेंच क्रियापदाचा **कर्ता** होतें.

५९७ शक्य क्रियापद असतां सकर्मक धातूंवरून वर्तमान, भूत व भविष्यकाळीं कर्मणिप्रयोग होऊन कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें. किंवा संबंधी विशेषणाचें तृतीया विभक्तींत असतें; जसें. 'माझ्यानें किंवा मला काम करवतें.' क्रियापद अकर्मक असतां भावीप्रयोग होतो. परंतु कर्तृपद वरचे प्रमाणेंच असतें; उदा० 'माझ्यानें किंवा मला जाववतें.'

५९८ भावीप्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त व क्वचित् चतुर्थ्यन्त असून क्रियापद सकर्मक असल्यास कर्मपद द्वितीयान्त असतें; व द्वितीया विभक्ति नेहमी स-प्रत्यय असते; जसें, 'रामानें रावणास मारिलें;' 'त्यानें जावें,' किंवा 'त्याला जाववतें.' इ०.

५५९ सकर्मक धातूंचे कर्मणि व भावीप्रयोग करण्या-चे संबंधानें खालचे नियम ध्यानांत ठेवावे.

[१] अप्राणिवाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम कर्म असल्यास **कर्मणिप्रयोगच** होतो.

[२] मनुष्यवाचक विशेषनामें किंवा त्यांचीं सर्वनामें कर्में असल्यास नेहमीं **भावीप्रयोग** करावा.

[३] मनुष्यवाचक सामान्यनामें व मनुष्येतर प्राणिवाचक-नामें किंवा सर्वनामें कर्म असल्यास दोन्ही प्रयोग होतात.

टीप — हे नियम कवितेंत नेहमीं पाळलेले असें नाहीं. परंतु यांचीं उदाहरणें देऊन विस्तार करीत नाहीं.

५६० कर्मणिप्रयोगांत कर्मपद तृतीयपुरुषी असतें; प्रथम किंवा द्वितीयपुरुषी कर्मपद गद्यांत फारसें येत नाहीं; कवितेंत तसें घातल्याचीं उदाहरणें फार आ-ढळतात:—

'प्रद्युम्न म्हणे कैसा पुरों त्यासीं मी हरें काय!'
'प्रेमें रक्षिलीस सदा म्हणुनि दिसें **मी** जगासि मत्तानें.
ते गंधर्वें उपेक्षिली मज, कां मागितें न आजि मत्तानें!' मोरो०
'इंद्रियांचीं दानें **आम्हि** केलों नारायणें.' तुकाराम.
'तों **तूं** मुनें निरीक्षिल्यासि नयनीं भाग्योदयें निश्चयें.' विठ्ठल.
'कैलासि **तूं** उभा आजवरी संती, धरिलें हातीं कटदां, देवा!' तुका०

'त्यानें प्रद्युम्न म्हणे, मागोनि **तुम्ही** दिला उपायनेंस.' मोरो० (पहा, क० ५६०).

५६१ तथापि प्रथम व द्वितीयपुरुषी कर्मपद घातलेले कर्म-णिप्रयोग चालू भाषेंत अगदीं आढळत नाहींत असें नाहीं, 'रोगानें मी फार पिडलों' 'सापानें मी भाजून निघालों' 'तूं वरवेनें त्रासलास.' इत्यादि उदाहरणांत प्रथम व द्वितीयपुरुषी कर्मपद घातलें आहे. परंतु असले प्रयोग विरळा येतात.

[ अ ] कोणी, 'रोगानें,' 'तापानें,' खरजेनें,' यांस करणी-तृतीया ह्मणतील, पण तें प्रशस्त दिसत नाहीं. कारण वरील प्रयोगांचे कर्तरिप्रयोग केले असतां हेच शब्द वाक्यांत क्रियापदांचे कर्ते होतील; उदा० 'ताप मला जाळितो;' 'रोग मला पिडतो;' 'खरूज तुला त्रासिते.' इ०.

५६२ कर्तृपदें 'तूं' 'तुह्मी' हीं द्वितियपुरुष सर्वनामें, व क्वचित् 'त्यानें' हें तृतीयपुरुष सर्वनामही असतां क्रियापदाचे कर्मणि रूपांस भ्रांतीनें द्वितीयपुरुषाचे व तृतीयपुरुषाचे प्रत्यय क्वचित् लावितात; जसें, 'तूं काम केलेंस;' त्यानें त्यास पुस्तक दिलेन; तुम्हीं पुस्तकें वाचलींत.'

'विप्रें कथिलें मज कीं वत्से, **लिहिलेस** उत्तम श्लोक' ।
'द्यूत प्रवर्ततां तो भूप म्हणे, **ऐकिलासि** कंकातें,
'कुरु जिंकिले कुमारें, वय तरी अद्यापि उचित अंकातें' ।
मोरो०

'दैन्य वेष कासयासि **घेतलाति** सांगिजे.' कचेश्वर.

५६३ अकर्मकधातूंस भूतकाळीं द्वितीयपुरुषीं 'स' व 'त' हे प्रत्यय् लागतात, तेच प्रत्यय चुकीनें सकर्मकधातूसही लाविले जातात, असें अशा प्रकारच्या प्रयोगांवरून दिसून येतें.

५६४ हे अशुद्ध प्रयोग भाषेंत येण्याचें दुसरें कारण असें दिसतें कीं, कर्मणिप्रयोग असतां वाक्यांत जर पूर्णवर्तमानकाळाचें क्रियापद असेल, तर त्यांतील मुख्य क्रियापद व 'अस' धातूचें सहायक्रियापद यांचा आपण बोलण्याचे गर्दींत संधी करितों; उदाहरण, 'तूं हें काम केलें आहेस,' 'रामानें तुझें पुस्तक घेतलें आहे,' इत्यादि वाक्यांत 'केलें आहेस' 'घेतलें आहे' यांबद्दल बोलतांना 'केल-आहेस'—'केलाहेस,' 'घेतल-आहेन'—'घेतलाहेन' अशा प्रकारचे प्रयोग होत जाऊन सांप्रतची 'केलेंस,' 'घे-

तलेन,' 'घेतलान्,' असे संक्षिप्त रीतीनें कर्मणि क्रियापदाचे प्रयोग करण्याची रीत पडली आहे. व पूर्णवर्तमानकाळाचा उपयोग शुद्ध भूताचे जागीं बोलतांना फार करितात, यामुळें असले प्रयोग बरेच प्रचारांत आहेत.

५६५ अशा प्रकारच्या प्रयोगांचा प्रचार थोडा आहे. या वाक्यांत क्रियापदास कर्त्याप्रमाणें व कर्माप्रमाणें, एकाच वेळीं चालविलें आहे. हे प्रयोग उपयोगांत असल्यामुळें ते व्याकरणांत सांगितले पाहिजेत; परंतु ते एकदेशी व व्याकरणदृष्ट्या अशुद्ध होत. बोलतांना असले प्रयोग होतात, इतकें सांगण्यापलीकडे व्याकरणांत त्यांना जास्त रीतीनें स्वीकारही करूं नये.

५६६ याचप्रमाणें पुष्कळांचे बोलण्यांत स-प्रत्यय-द्वितीयेचा प्रयोग येऊन भावी क्रियापदाबद्दल कर्मणि क्रियापद येतें; जसें, 'त्यानें आपल्या मुलास शाळेंत पाठविला;' 'तुलाच बोलवावा असें तो म्हणाला;' 'मीं मुलीला निजविली;'

'काय दिनकरा । केला कोंबड्यानें खरा' । तुका०
'हा हो रे, म्हणोनी ते वेळां, जगत्रिरामें करें धरिला,
चहूं भुजांनीं आलिंगिला, हरिश्चंद्रास भगवंतें' ।
श्रीधर.

टीप—अशा ठिकाणीं क्रियापद भावी असणें हेंच व्याकरणदृष्ट्या प्रशस्त आहे.

५६७ भावी प्रयोगांत क्रियापद कर्त्याप्रमाणें अथवा कर्माप्रमाणें फिरत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. तें निरंतर नपुंसकलिंगी तृतीयपुरुषीं व एकवचनीं असतें. जसें, 'त्यानें शिपायास मारिलें,' 'त्यां जावें,' 'तूं बोलावें,' 'तिनें बसावें,' इ०.

## कर्तृपद आणि कर्ता.

५६८ **कर्ता** म्हणजे वाक्यांत क्रियापद ज्या शब्दाप्रमाणें असतें, तो शब्द (पहा, नि० २०७ व २०८); व **कर्तृपद** म्हणजे वाक्यातील क्रियापदाचा अर्थ जो व्यापार, तो ज्याचेकडून घडला असेल, असा शब्द (कर्तृपद=कर्त्याचा म्ह० क्रिया करणाराचा दर्शक शब्द).

टीप—वस्तुतः **कर्ता** व **कर्तृपद** या शब्दाचा अर्थ एकच आहे. परंतु वाक्यांत जो क्रिया करणारा असतो, तद्दर्शक शब्दाचे लिंगवचनाप्रमाणें नेहमीं क्रियापद बदलत नाहीं. म्हणून व्यवस्थेकरितां ज्या शब्दाप्रमाणें रूप फिरतें तो **कर्ता**,—अर्थात व्याकरणांतील कर्ता, क्रिया-कर्ता नव्हे,—व ज्याप्रमाणें रूप फिरत नाहीं. परंतु जो शब्द क्रियेच्या कर्त्याचा दर्शक असतो, तो शब्द **कर्तृपद** असे मानिलें आहे.

५६९ कर्तरिप्रयोगांत धात्वर्थानें दाखविलेली क्रिया करणारा तोच कर्ता असतो. परंतु कर्मणिप्रयोगांत क्रियापदानें जें कर्म, त्याच्याप्रमाणें क्रियापदाचें रूप फिरतें, म्हणजे कर्मपद व्याकरणदृष्ट्या कर्त्याचे जागीं असतें; व मुळचा जो कर्ता म्हणजे क्रिया करणारा, त्याची तृतीयाविभक्ति होते; येथें त्यास **कर्तृपद** असें म्हणावें.

५७० भावीप्रयोगांत क्रियापद कोणच्याही शब्दाप्रमाणें न फिरतां केवळ त्याचें (तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगी, एकवचनीं) ठरींव रूप असतें. क्रियेचा कर्ता, याची तृतीया किंवा चतुर्थी विभक्ति होते; म्हणून त्या शब्दास **कर्तृपद** म्हणावें. भावीप्रयोगात क्रियापदास व्याकरणदृष्ट्या कर्ता नसतो.

टीप १—भाव म्हणजे स्वाभाविक स्थिति. तृतीयपुरुष, नपुंसकलिंग, एकवचन, ही क्रियापदाची स्वाभाविक स्थिति मानिली आहे. व भावीप्रयोगयुक्त वाक्यांत क्रियापद ज्याच्याशीं जुळेल असा शब्द वाक्यांत सांपडत नाहीं, म्हणून त्यांचें स्वाभाविक रूप चालितात. याचप्रमाणें नामावर जेव्हां क्रियेचा व्यापार कोणत्याही विभक्तीच्या संबंधानें चालत नाहीं, व तें क्रियापदाच्या वाक्यांत नसतें, उलट क्रियापदच त्याचे वाक्यांत असतें, तेव्हां नामाची स्वाभाविक स्थिति असते, म्हणजे प्रथमाविभक्ति असते.

**उदाहरणें:**—'रामा पुस्तक वाचितो' या वाक्यांत 'वाचणें' या क्रियेचा कर्ता 'रामा' हा आहे; व क्रियेला वागविणारा शब्द तोच आहे; म्हणून **कर्ता** तोच, व **कर्तृपद** हीं तोच शब्द. परंतु 'रामानें पुस्तक वाचिलें' या वाक्यांत क्रियेचा कर्ता जो रामा, त्याचेप्रमाणें क्रियापद न वागतां तें 'पुस्तक' या कर्मपदाप्रमाणें वागतें; म्हणून 'पुस्तक' हा शब्द व्याकरण-दृष्ट्या कर्ता आहे; व कर्मपद कर्ता आहे, म्हणून हा कर्मणिप्रयोग; व 'रामानें' हें **कर्तृपद**. 'रामानें रावणास मारिलें' या वाक्यांत क्रियापदास वागविणारा शब्द वाक्यांत नाहीं. अर्थात् क्रियापदास **कर्ता** नाहीं. मूळ क्रिया करणारा जो 'रामा' त्याची तृतीया जी 'रामानें' तें **कर्तृपद**.

टीप २—'मला हें आवडत नाहीं' 'त्यास ती बातमी समजली' 'विष्णुस पुस्तक दिसलें' इत्यादि वाक्यांत अर्थदृष्ट्या क्रियापदें अकर्मक आहेत. व अनुक्रमें 'हें,' 'बातमी' व 'पुस्तक' हे शब्द कर्ते आहेत. तथापि 'आवडणें,' 'समजणें,' 'दिसणें' या क्रियांनीं दर्शित व्यापार ज्यांचेकडून होतात, असे शब्द 'मला,' 'त्यास' व 'विष्णुस' हे होत; म्हणून यांस वाक्यांतील **कर्तृपदें**-च म्हणावें. (पहा, क० ६२६)

९७१ वाक्यांत शुद्ध क्रियापद नसून धातुसाधित नाम,

विशेषणे व अव्ययें यांचे योगानें क्रियेचा बोध होतो. या कृदन्तांचा कर्ता प्रथमान्त(क्वचित् तृतीयान्त किं. चतुर्थ्यन्त) असतो. परंतु याचे योगानें क्रिया दाखविणारें जें कृदन्त त्याचें रूप पालटत नाहीं, म्हणून यास त्या क्रियादर्शक पदाचा '**कर्ता**' न म्हणतां '**कर्तृपद**' असें म्हणावें; उदा० '**मी** तेथें **असतां** रामा कांहींच बोलला नाहीं.' 'एक **मनुष्य बोलत असतां** दुसऱ्यानें मध्यें बोलूं न ये.' इत्यादि वाक्यांत 'मी,' 'मनुष्य' 'दुसऱ्यानें' हे शब्द कर्तृपदें होत.

१७२ वरील नियमांवरून कर्ता व कर्तृपद यांचे संबंधानें खालीं लिहिल्याप्रमाणें नियम करावे.

(१) **कर्ता** नेहमीं प्रथमाविभक्तींतच असला पाहिजे.

(२) **कर्तृपद** तृतीया व चतुर्थी विभक्तींत असेल; किंवा त्यास तृतीया विभक्त्यर्थक अव्ययें (कडून, करवीं, द्वारें इ०) लागतील; अथवा त्याचें संबंधी विशेषण होऊन त्याची तृतीयाविभक्ति होईल; याचीं उदाहरणें:—'रामानें पुस्तक वाचिलें' (तृतीया); 'मला जाववतें' किंवा 'मला हें रुचत नाहीं' (चतुर्थी); 'माझ्यानें हें काम करवत नाहीं' (संबंधी विशेषणाची तृतीया).

टीप—वर सांगितलेली व्यवस्था अगदीं नवीन आहे. आजपर्यंतच्या मराठी व्याकरणांत **कर्ता** व **कर्तृपद** असा भेद केलेला नाहीं. परंतु तसा भेद न केला, तर **कर्तरि, कर्मणि** व **भावी** ही प्रयोगरचना केवळ निरर्थक होऊन शिकणारांस ती नीटपणें समजणारही नाहीं. हल्लींचे व्यवस्थेप्रमाणें प्रयोगरचनेचा प्रकार केवळ संस्कृताचें अनुकरण असा होऊन बसला आहे त्या पलीकडे त्याचा उपयोग होत नाहीं. वाक्याची रचना

व अर्थ शिकणारास नीटपणें कळणें हा जो या व्यवस्थेचा उद्देश, तो मुळींच सिद्धीस जात नाहीं; याकरितां सध्याची व्यवस्था नवीन ठरविली आहे.

## प्रयोगांचे संबंधानें सामान्य विचार.

५७३ शुद्धवर्तमानकाळीं, रीतिभूतकाळीं व शुद्धभविष्यकाळीं व संकेतार्थीं सकर्मक धातूंवरून कर्तरिप्रयोगच होतो; जसें, 'तो काम करी;' 'तो काम करील;' 'जर तो काम करिता तर,—' इ०.

५७४ 'करिजे, करिजेल' इत्यादि वर्तमानकाळाचीं व भविष्यकाळाचीं कर्मणि रूपें काळप्रकरणीं सांगितलीं आहेत, तीं गद्यामध्यें येत नाहींत. पद्यांत ही सांप्रत त्यांचा उपयोग कमी झाला आहे. हीं रूपें वाक्यांत असतां मात्र वर्तमान व भविष्यकाळीं कर्मणि व भावीप्रयोग होतील.

५७५ 'उमज' धातूचा गण व विकल्पें 'आचर' धातूचा गण खेरीजकरून बाकीच्या सर्व सकर्मक क्रियापदांवरून भूतकाळीं नेहमीं कर्मणि किंवा भावीप्रयोग होतात.

५७६ कर्मणिप्रयोग केव्हां करावा व भावीप्रयोग केव्हां करावा, या विषयींचे नियम मागें सांगितले आहेत. (नि० ५५९)

५७७ उमज धातूच्या गणांतील सकर्मक धातु किंवा त्यांच्या अर्थाचे धातु असतां भूतकाळीं निरंतर कर्तरि प्रयोग होतो. उदा० 'मी कारण उमजलों;

'मी पुस्तक पढलों;' 'तो भात जेवला;' 'पाग्वरूं बोल बोलतें;' इ०.

९७८ आचार-धातूच्या गणांतील धातूंवरून कर्तरि किंवा कर्मणिप्रयोग विकल्पेंकरून होतात; जसें, 'मी धर्म आचरिलों किंवा म्यां आचरिला;' 'मी चार वेद पढलों किंवा म्यां पढले,' 'मी द्यूतांत सर्वस्व हरलों किंवा म्यां हरिलें,' इ०.

९७९ 'उमजणें' 'पढणें' 'जेवणें' या धातूंचे जसे अर्थ आहेत, त्याप्रकारचा 'मी स्नान केलों, भोजन केलों,' इ० कित्येक वाक्यांत 'स्नान करणें, भोजन करणें,' एवढयाचा अर्थ असतो; या भ्रमानें 'कर' धातूचा उपयोग क्वचित् वरील धातूंप्रमाणें करितात. परंतु असले प्रयोग अशुद्ध आहेत. कारण 'स्नान' याचे बद्दल 'काम' शब्द कर्माचे जागीं घातल्यास 'मीं काम केलों' असा प्रयोग होणार नाहीं.

९८० आज्ञार्थीं किंवा विध्यर्थीं धातू सकर्मक असल्यास कर्तरि किंवा कर्मणिप्रयोग होतो; व धातू अकर्मक असल्यास कर्तरिप्रयोग होतो; परंतु कर्तृपद प्राणिवाचक नाम किंवा सर्वनाम असल्यास कर्तरि किंवा भावीप्रयोग होतो. जसें, 'ईश्वर तुमचें कल्याण करो;' 'मुलांनों, तुह्मी आईबापाच्या आज्ञा माना;' हे कर्तरिप्रयोग. तसेंच 'तो बसो' हा कर्तरि व 'त्यानें बसावें' हा भावी.

'साधकाची दशा उदास असावी ॥ उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥'

तुका०

'परि मन्निकट असावे मज साह्य वसंत, काम, पवमान।'
शर्मिष्ठा त्यासि ह्मणे, बैसावें जैं सभेंत मत्तातें,
वत्तातें व्हावें तैं बंदी, तूं विसरलीस मत्ता, तें । मोरो०

९८१ सकर्मक धातूंचा भावीप्रयोग शुद्ध भूतकाळीं व विध्यर्थीं मात्र होतो. जसें, 'त्यानें वाघास धरिलें;' 'रामानें भाषण करावें;' इ० परंतु अकर्मक धातूंचा भावीप्रयोग केवळ विध्यर्थीं मात्र होतो. जसें, त्यानें बसावें,' 'तिनें जावें,' इ०.

९८२ सकर्मक शक्य क्रियापद असतां वर्तमान, भूत किंवा भविष्यकाळीं कर्मणिप्रयोग होतो. उदा० 'माझ्यानें किंवा मला काम करवतें, करवलें किंवा करवेल, इ०. परंतु क्रियापद अकर्मक असतां भावीप्रयोगच होतो; उदा० माझ्यानें किंवा मला जाववतें.'

९८३ क्रियापदाचें कर्मपद कर्तरिप्रयोगांत द्वितीयान्त असतें, व तें द्वितीया प्रत्यय लावून किंवा न लावितां करितात, हें मागें सांगितलेंच आहे. त्या नियमावरून लक्षांत येईल कीं, ज्या ठिकाणीं स-प्रत्यय द्वितीया करितात, त्याच ठिकाणीं भूतकाळीं क्रियापद असतां भावी प्रयोग करितात. साधारणतः पाहिलें तर हा केवळ वाक्य रचनेचा भेद असून अर्थांत फरक पडत नाहीं. परंतु कित्येक ठिकाणीं अर्थांत ही फरक पडतो.

९८४ उदाहरणार्थ, 'मार' धातु असतां कर्तरिप्रयोगांत कर्मपद अप्रत्यय द्वितीयाविभक्तींत घातलें असतां अथवा भावीप्रयोग केला असतां एक 'ठार मारणें' असा अर्थ होईल, किंवा 'कमला [illegible]री आघात करणें' असाही अर्थ होईल. परंतु अप्रत्यय द्वितीया केली असतां किंवा कर्मणिप्रयोग केला असतां फक्त 'ठार मारणें' हा एकच अर्थ संभवेल. जसें, 'तो पोरास मारितो' किंवा 'त्यानें पोरास मारिलें' या वाक्याचा अर्थ 'पोरास ठार मारितो, किंवा मारिलें' असा होईल, किंवा 'पोराचे शरीरावर

आघात केला' असाही अर्थ होईल. परंतु 'तो पोर मारितो अथवा त्यानें पोर मारिलें, याचा अर्थ ठार मारणें' एवढाच फक्त होईल.

५८५. अशा रीतीनें दुसऱ्या कित्येक धातूंचा प्रयोग असतां-ही अर्थांत फरक होतो; उदाहरणार्थ, 'तो घर बांधितो' म्हटलें म्हणजे 'घराची नवीन इमारत बनावितो' असा अर्थ होतो; परंतु 'तो घरास बांधितो' असें म्हटलें असतां 'दुसरी कांहीं तरी वस्तु घरास आणून बांधितो' असा अर्थ होतो. तसेंच, 'तो घोडा हा-कितो, किंवा गाडी हाकितो' असें म्हटलें म्हणजे त्या वाहनावर स्वतः बसून हाकितो, असा अर्थ होतो. परंतु 'तो घोड्यास हाकितो, किंवा गाडीस हाकितो,' याचा अर्थ हाकण्याची क्रिया करितांना त्या वाहनावर स्वतः बसला आहे, असा अर्थ होत नाहीं.

टीप-अशा वाक्यांत पुष्कळवेळां स-प्रत्यय द्वितीया अर्थावरून चतुर्थी मानावी लागेल. उदा० 'तो हात लावितो,' म्हणजे दु-सऱ्या एखाद्या पदार्थास हात लावितो. परंतु 'तो हातास लावितो.' म्हणजे हातास दुसरा कां. । पदार्थ लावितो असा अर्थ; या ठि-काणीं 'हातास' ही चतुर्थी आहे. हें उघड दिसून येईल.

५८६ मराठी व्याकरणांत कर्तरिप्रयोगाचे व भावीप्रयोगाचे 'सकर्मक-कर्तरि' व 'अकर्मक-कर्तरि,' 'सकर्मक-भावी,' व 'अकर्मक भावी,' असे भेद करण्याची चाल पडली आहे. परंतु प्रयोग सांगणें म्हणजे क्रियापद कर्त्याशीं जुळून आहे किंवा कर्माशीं जुळून आहे, हें सांगणें; तें सांगतांना क्रियापद सकर्मक आहे किंवा अकर्मक आहे, हें सांगण्याची जरूर नसते. शिवाय क्रि-यापद चालवितांना त्याची जात अगोदर सांगितलेली असतेच. यामुळें हा अपेक्षा जास्त गोष्टी सांगण्याचा प्रकार निरुपयो-गी आहे.

५८७ मराठींत वरील प्रयोगांप्रमाणें 'भावकर्तरि' व 'कर्मकर्तरि' असे आणखी दोन प्रयोग मानीत अस-

तात. 'मला कळमळतें;' 'त्याला फावत नाहीं;' इत्यादि वाक्यें या प्रयोगाचीं उदाहरणें म्हणून दिलीं आहेत. परंतु 'भावीप्रयोग' व 'भावकर्तरिप्रयोग' यांच्या नावांच्या अर्थांत व त्यांच्या रचनेंत काहीं फरक नाहीं. "जेथें क्रियापद कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें असत नाहीं, तो भावीप्रयोग" हें लक्षण भावकर्तरीवर ही सारखेंच लागू पडेल. म्हणून हा निराळा प्रयोग मानण्याचें कारण दिसत नाहीं.

टीप—'कळमळतें.' 'माजावलें,' इत्यादि क्रियापदें अकर्तृक क्रियापदें आहेत (पहा. कलम २००).

९८८ 'शिपायानें किंवा शिपायाकडून चोर धरिला जातो,' 'कालच्या सभेंत अर्ज वाचिला गेला' इत्यादि वाक्यांस 'कर्मकर्तरिप्रयोग' असें म्हणतात, परंतु 'कर्मणिप्रयोग' व 'कर्मकर्तरिप्रयोग' या नावाचा अर्थ एकच आहे, म्हणून 'कर्मकर्तरि' हा एक निराळा प्रयोग मानण्याचें कारण नाहीं; पाहिजे तर अशा प्रयोगास कर्मणिप्रयोग' म्हणावें. शिवाय 'धरिला जातो,' 'वाचला गेला' इत्यादि संयुक्त क्रियापदांत 'धरिला' 'वाचला' इत्यादि रूपें धातुसाधित विशेषणें आहेत. [ पहा, कलम ७०९, (२) ].

९८९ प्रयोग कोणता आहे या संबंधानें संशय उत्पन्न झाल्यास कर्तृपद व कर्मपद यांस निरनिराळीं लिंगें व वचनें लावून व त्यांचे पुरुष बदलून वाक्यें करून पहावीं; कर्त्याप्रमाणें क्रियापद बदलत असलें तर कर्तरिप्रयोग, कर्मपद कर्ता होऊन त्याप्रमाणें क्रियापद फिरत असल्या

स कर्मणि, व दोन्ही पदांप्रमाणें तें फिरत नसून निरंतर तृतीय पुरुषाच्या एक वचनाचें नपुंसकलिंगच कायम राहिलें, तर भावीप्रयोग समजावा.



## कारक व विभक्ती.

५९० विभक्तीच्या योगानें नामाचा क्रियापदाशीं जो संबंध दाखविला जातो, त्यास **कारक** ह्मणतात; हीं कारकें **कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान** आणि **अधिकरण** अशीं सहा आहेत.

५९१ (अ) हा कारकांचा संबंध नामांस प्रत्यय लागून अथवा शब्दयोगी अव्ययें लागून दाखविला जातो, हें मागें सांगितलेंच आहे. विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें हीं नामांस लागतांना सामान्यरूप होऊन पुढें तो प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय व मुळचा शब्द मिळून एकच शब्द होतो.

(ब) परभाषेंतील विशेषनामें व कित्येक सामान्यनामेंही असतां त्यांस कित्येक प्रत्ययांपूर्वी—विशेषतः 'ला,' 'ने,' 'हून,' 'शीं,' 'ना' यांपूर्वी—सामान्यरूप होत नाहीं. उदा० **टॉमला** बोलाव; '**जॉनने जेम्सशीं** मारामारी केली;' 'तो **लंडनहून** आला;' 'मुंबईच्या **गव्हरनरनें** हुकुम दिला;' इ०. परंतु हीं विशेष नामें भाषेंत येऊन विशेष प्रचारांतील झालीं असल्यास सामान्यरूप केलें पाहिजे; उदाहरणार्थ, अकबर, औरंगजेब साहेब, निजाम गव्हरनर, जज्ज, इत्यादि जीं परभाषेंतील नामें प्रचारांत आलीं आहेत, त्यांचें सामान्यरूप होतें. (पहा, क० १९०, १९१).

(क) कर्ता, कर्म, इत्यादि जीं कारकें, तीं प्रथमादि विभक्तींस अनुक्रमें वाटून दिलीं आहेत. जुन्या व्याकरणांतून अशी व्यवस्था करून प्रथमेचे अर्थ कर्ता व कर्म, द्वितीयेचा अर्थ पुनः

कर्म असें ठरविलें आहे. परंतु विचारपूर्वक पाहिलें तर 'रामा काम करितो,' या वाक्यांत 'रामा' या शब्दाचा जो कारकसंबंध 'करितो' या क्रियेकडे आहे, तोच 'काम' या शब्दाचा नाहीं, हें उघड दिसून येईल. 'रामा' याचा संबंध कर्तृत्वाचा व काम याचा कर्मत्वाचा आहे. तेव्हां 'रामा' व 'काम' या शब्दांचीं रूपें जरी सारखीं असलीं, तथापि त्यांची विभक्ति एकच आहे असें म्हणतां येत नाहीं.

यावर कोणी असें म्हणेल, कीं एका विभक्तीच्या कडे दोन कारकें असलीं म्हणून काय झालें? परंतु विभक्ती मानणें हा व्यवस्थेचा व सोयीचा प्रकार आहे; व मराठी भाषेंत जर आपण निरनिराळ्या विभक्ती मानितों, तर कारकांची वांटणी ही तशीच करणें व्यवस्थेशीर होईल. तृतीया, चतुर्थी, पंचमी, सप्तमी इत्यादि विभक्ती व त्यांचीं कारकें हीं कर्ता व कर्म यांचे इतकीं महत्वाचीं नसूनही त्यांची जर आपण निराळी व्यवस्था करितों, तर अत्यंत महत्वाचें कारक जें 'कर्म' तें अर्धे प्रथमेकडे व अर्धे द्वितीयेकडे देणें, ही व्यवस्था कोणच्याही दृष्टीनें रास्त आहे असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून प्रस्तुत पुस्तकांत कर्म असतां द्वितीया म्हणून, शब्दास प्रत्यय असतां सप्रत्यय द्वितीया, व प्रत्यय नसतां अप्रत्यय द्वितीया असें म्हणण्याचें ठरविलें आहे (पहा, क० १२८). शिवाय ज्याभाषांशीं मराठी भाषेचा नेहमीं [illegible] संबंध येतो, त्या संस्कृत व इंग्रजी भाषांत अशीच व्यवस्था असल्यामुळें तीच मराठी भाषेंतही असणें सोयीचें आहे.

(ड) कर्ता आणि कर्म यांचा अर्थ मागें स्पष्ट झालाच आहे; करण ह्मणजे क्रियेचें साधन; संप्रदान ह्मणजे कारण किंवा प्रयोजन; अपादान ह्मणजे वियोग, आणि अधिकरण ह्मणजे स्थान. प्रथमादि विभक्तींनीं कारकांचा अर्थ अनुक्रमें दाखविला जातो. परंतु भाषेच्या संप्रदायाप्रमाणें या कारकांत आणखी बरेच बारिक सारिक अर्थ निघतात. व एका विभक्तीचें कारक क्वचित दुसऱ्या विभक्तीसही लागतें. विभक्तीच्या कारकास त्यांचा अर्थ असेंही

म्हणतात. या विभक्तीच्या अर्थाचें जास्त विवरण करितों.

## प्रथमा.

९९२ प्रथमेचा मुख्य अर्थ कर्ता आहे. त्यापासून क्रियाकर्तृत्वाचा बोध होतो. उदा० 'रामा काम करितो,' 'हरी जातो' इत्यादि वाक्यांत 'रामा' आणि हरी हे शब्द 'करणें' आणि 'जाणें' या क्रियार्थांचें जनक किंवा उत्पादक आहेत.

९९३ कर्मणिप्रयोग असतां कर्मपद प्रथमान्त असतें व त्याच्याप्रमाणें क्रियापदाचें रूप फिरतें, ह्मणून त्यास त्या क्रियापदाचा कर्ता असें ह्मणतात. परंतु त्यापासून क्रिया-कर्तृत्वाचा बोध होत नाहीं. उदा० 'मी गाई बांधिल्या;' 'त्यानें पुस्तक वाचिलं;' 'हरीनें पत्रें लिहिलीं;' इ०

९९४ वाक्यांत जो कर्ता असतो, त्याचे पर्यायवाचक शब्द त्या कर्त्याचा बोध विशेष स्पष्ट व्हावा ह्मणून घातलेले असतात. ह्या वेळीं मुख्य कर्त्यास कर्ता ह्मणून तत्पर्यायवाचक इतर शब्दांच्या प्रथमेचा अर्थ उद्देश समजावा. उदा० 'तो गृहस्थ ब्राह्मण आहे' या वाक्यांत 'आहे' या क्रियापदाचा 'ब्राह्मण' हा शब्द कर्ता असून 'तो' आणि 'गृहस्थ' या प्रथमाविभक्तींचा अर्थ उद्देश होय. हीस उद्देशार्थी प्रथमा असें म्हणतात.

९९५ वाक्यांत पुष्कळ वेळा शुद्ध क्रियापद न येतां धातुसाधित नामें, विशेषणें आणि अव्ययें यांच योगानें क्रियापदाचें काम होतें. तेव्हां क्रियार्थाचा कर्ता प्रथ-

मान्त ( क्वचित् तृतीयान्त ) असतो. अशा कृदन्ताच्या कर्त्यास ' कर्ता ' म्हणूं नये. कारण क्रियार्थ दाखविणारें कृदन्त त्याच्या धोरणानें पालटत नाहीं. यास ' **कर्तृ-पद** ' असें म्हणावें. उदा०

' **मी असतां** का माझ्या बापें केशग्रहासि पावावें ?' मोरो. ' **पंतोजी** तेथें **असून** मुलानीं दंगा केला;' ' **मी** रागें **भरत** असतां त्याच्यानें ब्र काढवला नाहीं.' इ०.

**टीप**—इंग्रजी भाषेत कृदन्ताचे कर्त्यास ' नामेनिटिव्ह ऑब्सोल्यूट ( भावी प्रथमा )' म्हणण्याची चाल पडली आहे. परंतु मराठींत शुद्ध क्रियापद नसतांही त्याचा कर्ता, कर्म सांगण्याची चाल असल्यामुळें तशी एकादी नवीन व्यवस्था करण्याचें कारण दिसत नाहीं.

## द्वितीया.

९९६ द्वितीयेचा मुख्य अर्थ कर्म आहे. सकर्मक क्रियापद असतां वाक्यांत जो शब्द त्या क्रियापदाचें कर्म असतो, तो द्वितीयान्त असतो; उदा० 'रामा **काम** करितो;' ' बाप **मुलांस** पोशितो. '

९९७ जेथें संख्येचें, वजनाचें किंवा मापाचें वगैरे परिमाण दर्शविलें असतें, तेथें द्वितीया विभक्ती होते; जसें, ' दोन तोळे सोने;' 'पांच बिघे जमीन; ' ' चार पायली तांदूळ.' इत्यादि उदाहरणांत तोळे, बिघे, तांदूळ, या द्वितीया होत. हिला परिमाणार्थी द्वितीया म्हणावें.

९९८ कालदर्शक नामांनीं कालाची मर्यादा होत असतां तीं द्वितीयान्त असतात; उदा० 'मी **चार दिवस** मुंबईस होतों;' ' **पांच मिनीटें** पडदा पडेल;' ' एक

घटका मला थांब;' आज आठ दिवस पाऊस पडत आहे;'

'ऐशी सेवा बहुत दिवस करीत असे निजप्रेमें।'
महिपती.

५९९ याच प्रमाणें दोन ठिकाणामधील अंतराची मर्यादा होत असल्यासही द्वितीया विभक्तीच येते; उ० 'येथून चार कोस रान आहे;' 'खंडाळ्याहून पुढें तीन कोस सारखे बोगदे आहेत;' इ०

६०० कर्माचे पर्यायवाचक शब्द जेव्हां त्याचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वगैरे घातलेले असतात, तेव्हां ते द्वितीयान्तच असतात; जसें, 'मला ब्राह्मणाला बोलवा;' 'त्याला लबाडाला ठोकला पाहिजे! इ० ही उद्देशार्थी द्वितीया होय.

## तृतीया.

६०१ तृतीयाविभक्तीचा मुख्य अर्थ करण ह्मणजे क्रियेचें साधन; जसें, 'मी तरवारीनें वाघ मारिला;' 'ईश्वर भक्तीनें वश होतो;' 'द्रव्यानें सर्व मिळतें;' इ०.

६०२ कर्मणि व भावी प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असतें; उ०–'गोपाळानें गाय बांधिली;' 'मुलांनीं रडावें;'

'सत्यातें जोणावें सुज्ञें, धर्मासि पळ न सोडावें;'
'निष्फळ होती मेघें त्याजिलीं, आलीं ही जीविका शेतें.'
ही कर्तृपदार्थी तृतीया. मोरो.

६०३ ज्यानें कांहीं वस्तु होते, किंवा जें नाम क्रिया घडून येण्यास साधनीभूत असतें, तें तृतीयान्त असतें;

उदा० 'चाकूनें लेखणी कर;' 'मी डोळ्यांनीं पाहतों व कानांनीं ऐकतो.' इ०.

१०४ प्रसंग, हेतु किंवा मूळ दाखविणारीं नामें तृतीयान्त असतात; उदा० 'आपल्या कृपेनें माझा संभाळ झाला,' 'त्या बातमीनें त्यास हुशारी आली;' 'अशा दांडगाईनें तुला मी काढून लावीन. ही हेत्वर्थी तृतीया.

१०५ 'त्यास अनुसरून' किंवा त्यावरून असा अर्थ असतां तृतीया योजितात; जसें, 'माझ्या मतें तो आज परत येईल;' 'ही गोष्ट कायद्यानें तुला करितां येणार नाहीं.' इ० ही निदानार्थी तृतीया.

१०६ 'सहित,' 'बरोबर' असा अर्थ असतां तृतीया होते; उदा० 'एका धोत्रानें जाऊं नको;' 'थोराशीं गांठ घालूं नये;' 'शिवाजी हजार स्वारांनीं किंवा स्वारांनीं-शीं (येथें दोन प्रत्यय एकदम लाविले आहेत) शत्रूवर चालून गेला.' 'तो जिवानिशीं (जिवासहित, जीव राखून) सटला.' इ०. ही सहार्थी तृतीया.

१०७ मार्ग किंवा गति दाखवितांना स्थळवाचक शब्दांची तृतीया योजितात; जसें, "मी सहज वाटेनें चाललों होतो."

'प्राणि संसारासि आला॥ तितुका मृत्युपंथें गेला.' तुका०

'झंप घाली सत्वरी गगनपंथें' रघु०

ही अधिकरणी तृतीया.

१०८ कालिजात्मक मापें किंवा परिमाण दाखविण्यास तृतीयाविभक्ती योजितात; जसें, 'तो माझेपेक्षां दोन वर्षांनीं मोठा (किंवा लहान) आहे.' 'पांचांनीं

उणें,' 'तीहींनीं जास्त,' इ०. ही परिमाणार्थी तृतीया.

१०९ शक्यार्थक क्रियापद असतां कर्तृपदाच्या संबंधी विशेषणाची तृतीया करितात; उदा० '**माझ्यानें** हें काम करवत नाहीं;' इ०.

११० ज्या विशेषणांनीं गुणांची न्यूनता, आधिक्य किंवा प्राप्ती दाखविली जाते, त्यांचे अगोदर तृतीया येते; उदा० '**पैशानें** उणा,' '**नावानें** मोठा,' '**गर्वानें** फुगलेला,' '**पायानें** लंगडा;'

> 'स्वर्गी **इंद्रसभेसि** तुल्य दुसरी धात्रीवरी शोभली'
>
> विठ्ठल.

> 'तुजकरितां **मजशीं** हो पावोनि विचार शीलसम, राजा'।
>
> मोरोपंत.

या तृतीयेचा अर्थ तुलना.

१११ "कालाचा नियमित भाग झाल्यावर" असा अर्थ असतां कालबोधक नाम तृतीयान्त असतें; उदा० 'मी चार **घटकांनीं** येईन;' 'केवढ्या **वेळानें** येशील!'

> 'राजा वधाल पांडवबळ किती **दिवसां** असें वदे भीष्मा'।
>
> मोरो०

या तृतीयेचा अर्थ अवधी.

## चतुर्थी.

११२ **संप्रदान** म्हणजे ज्याकारणें किंवा ज्यासाठीं अथवा ज्यास उद्देशून क्रिया घडते, असा पदार्थ दर्शविण्याच्या क्रियेचा अर्थ, तो; उदा० 'राजा ब्राह्मणांस दक्षिणा देतो;' 'मी हरीस असें सांगितलें;' इ०.

११३ 'देणें,' 'सांगणें' या अर्थांची क्रियापदें असतां

ज्यास द्यावयाचें, सांगावयाचें वगैरे, तद्दर्शक शब्द चतुर्थ्यन्त असतो; उदा० 'मी त्यास बातमी सांगतली;' 'गरीबांस धान्य दे;' 'तो ब्राह्मणास गाय देतो;' या शब्दांस अप्रत्यक्ष कर्मपदें असें म्हणावें.

६१४ संप्रदानात्मक चतुर्थी असतां तो शब्द पुष्कळ वेळा क्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्मपद असतो; कारण क्रियेचा अर्थ जो व्यापार, तो त्या शब्दावर व कर्मपदावर, असा दोहोंवर ही पडतो: उदा० 'मी कृष्णास गोष्ट सांगितली.' या वाक्यांत सांगण्याची क्रिया 'कृष्णास,' व 'गोष्ट' या दोहोंवर ही पडते.

६१५ प्रमाण किंवा तुलना दाखविण्यास ही विभक्ती योजितात;. जसें, 'पांचांस जसे चार, तसे दाहांस आठ;' 'तो जशास तसा आहे;'

> 'श्रीकृष्ण रुक्मिणीला, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी, आतां
> दमयन्तीस नळ, नळा दमयन्ती, आयकों जनें गातां;'
>
> मोरो०

ही तुल्यार्थी चतुर्थी.

६१६ किंमतीचें प्रमाण किंवा मोबदला मागतांना ज्या पदार्थाशीं प्रमाण सांगावयाचें किंवा मोबदला करावयाचा, त्याची चतुर्थी येते; जसें, 'अंबे पैशास चार मिळतात;' 'हें भाषांतर शब्दास शब्द असें आहे;' इ०. ही साम्यतादर्शक चतुर्थी.

६१७ गतिवाचक क्रियापदें असतां स्थळवाचक आणि काळवाचक नामांस ही विभक्ती होते; जसें, 'तो मुंबईस गेला;' 'मी दिवसास निजत नाहीं;' 'डोक्यास पागोटें घाला;' इ०. या चतुर्थीचा अर्थ अधिकरण.

६१८ कारण, हेतु, परिणाम, किंवा उपयोग दाख-

विण्यास ही विभक्ती येते; उदा० 'तो तुमच्या नाशास कारण होईल;' 'तो कीर्तीस झटतो;' 'मुलांस खाऊ आण;' 'तो शिकावयास आला;' 'भुकेला कोंडा, निजेला धोंडा;' इ०. ही हेत्वर्थक चतुर्थी.

११९ कित्येक वेळा चतुर्थीचे प्रत्यय व तिचें शब्दयोगी अव्यय 'स्तव' शब्दांस लागून तृतीयेसारिखा बोध होतो. उदा० 'तूं अशी दांडगाई केली, त्यास किंवा यास्तव (या-कारणानें मुळें) तुला शिक्षा पाहिजे;' 'पाऊस न पडल्यास(पडल्यानें)दुष्काळ पडेल;'

'झाला क्षीण बहु क्षुधेस्तव (क्षुळें-मुळें-नें) जरी, कीं व्यापिला वार्धकें;'
वामन.

'पुनःहि म्हणतों, बरें श्रवण हें करा, यास्तव (याकारणानें);'
मोरो०

'धाता करींच करिता, मृदु नें न होती,
या कारणास्तव (कारणानें) मनोमय मूस ओती।' रघु०

ही **कारणबोधक** चतुर्थी होय.

१२० सत्ता, मिळकत किंवा मालकी दाखवितांना सत्ताधारी, मालक वगैरे यांबद्दल ही विभक्ति येते: जसें, '**त्यास** चार मुलें आहेत,' '**विष्णूस** सध्या पंचवीस रुपये मिळतात.' इ०. या चतुर्थीचा अर्थ **स्वामित्व**.

१२१ मुकणें, घालविणें, किंवा तोटा होणें, या अर्थाचें क्रियापद असतां ज्या पदार्थांत तोटा आला, त्याबद्दल चतुर्थी घालतात; असें, 'तो हजार **रुपयांस** बुडाला;' 'तूं **जिवास** मुकशील' इ०. या चतुर्थीचा अर्थ वियोग.

१२२ कित्येक प्रसंगवाचक नामें असून त्या त्या प्रसंगीं अमुक घडलें असें सांगावयाचें असतां त्या नामाची चतुर्थी होते.

उदा० 'हें पागोटें मीं **दिवाळीला** घेतलें;' 'पाहटेस भूपाळ्या म्हणतात;' 'दसऱ्यास सोनें वाटतात;' इ०.

६२३ मोबदला किंवा बदल देणें. या अर्थी चतुर्थी येते; जसें. '**जिवास** जीव घेणें;' '**शिवीला** शिवी;' इ०.

६२४ योग्य, गोड, वगैरे विशेषणें असतां त्यांच्या मागें चतुर्थी येते; जसें, 'हा नवरा **आवडीला** योग्य आहे;' '**खाण्यास** गोड;' '**पाहण्यास** चांगलें;' इ०.

६२५ नमस्कार. रामराम, इ० नमनाच्या प्रकारांत ज्यास नमस्कार करावयाचा, त्याबद्दल चतुर्थी येते; जसें, 'तुम्हास नमस्कार' 'सर्व लहान थोरांस रामराम;' 'विठोबास दंडवत, जोहार;' इ०.

६२६ इंद्रियजन्य अशा क्रियेचें ज्ञान करणारीं रुचणें, वाटणें, भासणें, आवडणें, दिसणें, समजणें, येणें, साजणें, सावणें, शोभणें, खपणें, इत्यादि अर्थांची क्रियापदें असतां ज्याला ज्ञान इत्यादि होतें, त्याची चतुर्थी येते; जसें, 'मला रुचत नाहीं;' 'विष्णूस भक्ति आवडते;' 'देवाला सर्व दिसतें;' 'मला व्याकरण येतें' इ०. ही कर्तृपदार्थी चतुर्थी.

६२७ शक्यर्थक क्रियापद असतां कर्तृपदाची चतुर्थी (विकल्पेंकरून तृतीया) असते. जसें, 'मला जाववतें.' इ०. ही कर्तृपदार्थी प्रथमा.

६२८ करावयास, जावयाचें, करावयाचें, जावें, बोलावें, बोलूं, इ० क्रियावाचक व धातुसाधित नामें किंवा विशेषणें वाक्यांत कर्ते असतां त्यांच्या धात्वर्थाचें कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें. ही कर्तृपदार्थी चतुर्थी आहे उदा० 'मला मुंबईस जावयाचें आहे;' 'तुला सभेंत बोलावयाचें आहे;' 'त्यास जावें लागलें.' इ०.

६२९ 'करितां नये,' 'जातां नये,' इ० 'न' हें अव्यय घालून केलेल्या वाक्यांत व 'दे' धातूचें रूप घालून केलेल्या आज्ञार्थक वाक्यांत कर्तृपद चतुर्थ्यन्त घालितात; जसें, 'मला बोलतां नये;' 'रामरावास जाऊं दे;' इ०.

६३० शक्य धातूंचा कर्मणि किंवा भावी प्रयोग झाला असतां कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें; जसें, 'मला करवतें,' 'त्यास जाववतें, बसवलें,' इ०.

## पंचमी.

६३१ अपादान ह्मणजे एकाचा दुसऱ्याशीं वियोग; जसें, 'तो मुंबईहून आला;' 'तो नगराहून येईल;' इ०.

६३२ ज्या पदार्थापासून किंवा स्थानापासून कार्याची उत्पत्ति होते, तो पदार्थ किंवा स्थान पंचम्यन्त असतात; उदा० 'इंग्रज इंग्लंडाहून आले,' 'झाडापासून पान पडलें,' 'हिमालयांतून गंगा निघते.' इ०.

६३३ मऊ, कठीण, उंच, ठेंगणा, अन्य, वेगळा, दुसरा, इत्यादि विशेषणें घालून दोन पदार्थांची तुलना करावयाची असतां या पूर्वोक्त विशेषणांमागील नामें पंचम्यन्त असतात; उदा० 'लोकरीहून मऊ;' 'दगडाहून कठीण,' 'मजहून वडील,' 'सांब विष्णूहुन वेगळा,' इ०.

टीप—वरील प्रकारच्या वाक्यांत दोन पक्षांमध्यें तुलना केली आहे, यामुळें ते दोन्हीं परस्परांपासून भिन्न असले पाहिजेत, व दोनच पदार्थ किंवा त्यांचे समुदाय पाहिजेत. पुष्कळ पदार्थांपैकीं एकाचीच बाकीच्यांशीं तुलना कर्तव्य असतां सप्तमी घालतात:

उदा०—'तो आपल्या वर्गांतील सर्व मुलांत उंच आहे;' येथें सर्व मुलां-पेक्षां किंवा-हून मोठा आहे, असें ह्मणणें चूक होईल.

१३४ कालावधि किंवा अंतर दाखवावयाचें असल्यास जेथून आरंभ झाला, तद्वाचक शब्दाची पंचमी होते; उ० 'काशीहून मुंबई सातशें कोस आहे;' 'कालपासून मला चैन नाहीं;' इ०.

## सप्तमी.

१३५ ज्याकाळीं किंवा ज्या स्थळीं क्रिया घडते, तद्दर्शक नामें सप्तम्यन्त असतात, जसें, 'तो शहरांत राहतो;' 'गाय चिखलांत बुडाली;' 'मी रात्रीं जागतों;' 'झाडाखालीं गुरें विश्रांति घेतात;' इ०.

१३६ क्वचित् तृतीयेबद्दल ही विभक्ती येते; जसें, 'तोंडीं नको लेखी पाहिजे.' 'तो पायीं चालतो;' इ०.

'होत असे भला भल्याचे संगतीं। जाय अधोगती दुष्टसंगें'।
तुका०

ही निमित्तवाचक किंवा करणी सप्तमी होय.

१३७ शक्ति, चातुर्य, प्रावीण्य, इत्यादि दाखविणाऱ्या विशेषणांमागें ही विभक्ति येते; उदा० 'शास्त्रांत चतुर;' 'वेदांत पारंगत;' 'सुतारकामांत हुषार;' इ०.

१३८ अनेक व्यक्तींतून एक व्यक्ती वेगळी कारितांना सप्तमी योजितात; जसें, 'प्राण्यांत मनुष्य श्रेष्ठ आहे;' 'कावळ्यांत काऊ, माणसांत म्हाऊ;' इ०. (पहा, नि० १३३, टीप).

१३९ विश्वास, श्रद्धा, आसक्ति, प्रीति, वगैरे-दर्शक

नामें व क्रियापदें असतां सप्तमी येते; उदा० 'त्यांत माझा विश्वास नाहीं;' 'त्याचेवर माझी श्रद्धा नाहीं;' इ०.

६४० सप्तमीविभक्तीचा प्रत्यय जो 'ई' त्यास कधीं कधीं संबंधी विशेषणाचे प्रत्यय लागून विशेषणें होतात. उदा०:—

आतां वंदूं संतसज्जन, जे वैराग्यवनींचे पंचानन ।
श्रीधर.

'आमच्या मनींचें हितगुज कांहीं'। तुका०

— गुण पहा स्वयें मज सदाश्रमींचा करा' ।
मे.रो०



## विभक्त्यर्थक अव्ययें.

६४१ वर जे निरनिराळ्या विभक्तींचे उपयोग सांगितले तसेच तद्विभक्त्यर्थक अव्ययांचेही योग्य प्रसंगीं तयेंन सांगितले आहेत. आतां त्याच्या संबंधाच्या कित्येक विशेष गोष्टी सांगतों.

६४२ 'कडून' या तृतीयेच्या अव्ययानें कारण किंवा उगम अथवा क्रियेचें आदिस्थान यांचा बोध होतो. उ०—'मी तुझ्याकडून हें काम करवीन;' 'पावसाकडून सर्वांस सुख होईल;' 'त्याकडून मला रुपये पोंचले;' इ०.

६४३ 'जवळ,' 'लागीं' (कवितेंत) या द्वितीयेच्या अव्ययांपासून कर्मपदाचा बोध होतो; उदा० 'त्याच्याजवळ दे,' 'पंताजीजवळ तुझा अपराध सांगेन.' (कवितेंत)—'तयालागीं(-स), माते लागीं(-स) सांगितलें' इ०. 'लागीं' यावरून पुष्कळदां संप्रदानार्थीं चतुर्थी किंवा अप-

त्यास कर्मपद बोधित होतें; उदा०(कवि०) 'फळ पत्नीलागीं दिलें;' 'सुखालागि आरण्य सेवीत जावें;' इ०.

६४४ 'जवळून' या पंचम्यर्थक अव्ययानें क्रिया कर्तृवाचा बोध होतो; उदा० 'मजजवळून एक नोट हरवली,'

६४५ 'वरून' यानें स्थल वियोगाचा बोध होतो, व याच प्रमाणें स्थलचा किंवा सानिध्याचाही बोध होतो; उदा० 'तो माडीवरून (वियोग) खालीं आला,' 'डोंगरावरून (वर,स्थल) नौबदी वाजतात;' 'तो माझ्या घरावरून गेला;' इ०.

(अ) 'वरून' यानें करणार्थाचा बोध होतो; उदा० 'तुमच्या सांगण्यावरून मीं असें केलें.'

६४६ 'आंत' या सप्तम्यर्थक अव्ययाचा पुष्कळदां—विशेषकरून पोषाखाच्या वगैरे संबंधानें बोलतांना 'वर' अशा अर्थीं उपयोग करतात. जसें, 'डोकींत (डोकीवर) पागोटें घाल;' 'त्याच्या बोटांत आंगठी आहे;' 'त्यानें पायांत जोडा घातला;' 'अंगांत बंडी किंवा अंगरखा आहे.'

६४७ जेवढीं शब्दयोगी अव्ययें आहेत, तितकीं सर्व वस्तुतः पाहतां विभक्त्यर्थक अव्ययेंच आहेत, कारण त्याच्यापासून विभक्तींच अर्थाचा बोध होतो, व त्यांचे पूर्वी विभक्तिकार्य म्हणजे सामान्यरूपही होतें. परंतु या ठिकाणीं शब्दयोगी अव्ययांचा विभक्तिप्रत्ययांशीं निकट संबंध आहे, तेवढ्यास 'विभक्त्यर्थक' अव्ययें असें म्हटलें आहे, तें केवळ शिकणाराचा घोंटाळा होऊं नये, म्हणून म्हटलें आहे. सर्व शब्दयोगी अव्ययें विभक्तींचें कार्य करितात, हें त्यांचे लक्षांत येईलच.

६४८ इंग्रजी भाषेंत व दुसऱ्या कित्येक भाषांत दोन तीन वि-

भक्ती शिवाय बाकी विभक्ती शब्दयोगी अव्ययें लावून करितात; या गोष्टीच्या आधारानें कित्येक इंग्रज व्याकरणकारांनीं मराठींत प्रथमा व द्वितीया या विभक्ती ठेवून बाकीच्या विभक्तिप्रत्ययांस शब्दयोगी अव्ययें म्हणण्याचा यत्न केला आहे. परंतु सर्व विभक्तिप्रत्ययांस हल्लीं स्वतःचा अर्थ नाहींसा झाल्यामुळें त्यास शब्द म्हणता येणार नाहीं, व यामुळें शब्दयोगी अव्ययेंही म्हणतां येणार नाहीं. त्याप्रमाणें आमच्या दोहोंपेक्षा जास्त विभक्ती मानण्याच्या संवयीमुळें व संस्कृताच्या साम्यामुळें वरील व्यवस्था स्वीकारणें अशक्यच आहे.

६४९ कित्येक विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें यांच्या मधील भेद करणें कठीण आहे;-म्हणून प्रत्यय कोणचे व अव्ययें कोणचीं हें समजणें कित्येक वेळा कठीण पडेल. सर्व प्रत्यय मुळचीं शब्दयोगी अव्ययें असून सांप्रत संक्षेप होऊन त्यांचे प्रत्यय बनले आहेत. यासाठीं या संबंधानें असा नियम करावा कीं, ज्या प्रत्ययांना अर्थ आहे, त्यांना अव्ययें असें ह्मणून ज्यांना आतां कांहीं स्वतःचा अर्थ नाहीं, त्यांना प्रत्यय म्हणावें.

उदाहरणार्थ,—'नें,' 'स,' 'ला,' 'हून,' इत्यादिकांस अर्थ नाहीं, म्हणून हे प्रत्यय होत; व 'घरांतून' यांतील 'आंतून' व 'घरांत' यांतील 'आंत' यांस अर्थ आहे, ह्मणून तीं शब्दयोगी अव्ययें होत. कित्येक व्याकरणांत पंचमीचा 'तून' व सप्तमीचा 'त' प्रत्यय दिला आहे. परंतु 'तून' व 'त' एवढेच जर प्रत्यय आहेत, तर मागचा अनुस्वार कोठचा, हा प्रश्न राहतो. ह्मणून यांस शब्दयोगी अव्ययें मानून पूर्वरूपसंधी झाला, असें मानिलें आहे.

टीप—परंतु या संबंधानेंही नियम ठरविणें फार कठीण आहे. 'प्रत,लागी,' 'स्तव,' 'कडून,' 'करवीं.' यांस स्वतःचा अर्थ आहे कीं नाहीं, याचा स्पष्ट निर्णय कसा करावा? तथापि [illegible] स्वतंत्र उपयोग अजून भाषेंत पुष्कळ वेळा करितात [illegible]

ह्यावरून त्याना अव्ययें मानिलें आहे. यापेक्षा जास्त निर्णयात्मक व्यवस्था करणें अशक्य आहे.



## पदानुक्रम.

६९० मराठी भाषेंत प्रथम कर्ता (उद्देश्य), मग अनुक्रमें कर्म, क्रियाविशेषण, क्रियापद, अशी बहुधा वाक्यांत पदरचना असते; उदा० 'तो काम मन लावून करितो;' 'हरी पुस्तक चांगलें वाचितो;' इ०.

६९१ मराठी भाषेंत वाक्यें कोणच्याही प्रकारचीं असलीं, तरी विशेष कारण असल्याखेरीज त्यांच्या पदानुक्रमांत भेद असत नाहीं; उदाहरणार्थ, खालचीं वाक्यें अर्थाला निरनिराळ्या तऱ्हेचीं आहेत, तरी पदानुक्रम बहुधा सारखाच आहे:—

**विधानार्थक**—'माझें पागोटें खोलींत आहे.'
**प्रश्नार्थक**—'माझें पागोटें खोलींत आहे?'
**आज्ञार्थक**—'माझें पागोटें खोलींतून आण.
**उद्गारबोधक**—'माझें पागोटें खोलींत आहे!'
**संकेतबोधक**—'[जर] माझें पागोटें खोलींत आहे (असेल)—' इ०
**निषेधार्थक किं. अकरणरूपी.** } 'माझें पागोटें खोलींत नाहीं.'

वरील वाक्यांवरून दिसून येईल, कीं प्रत्येक वाक्याचा अर्थ जरी निराळा आहे, तरी वाक्यांतील शब्दानुक्रम फिरला नाहीं. अलीकडे विरामचिन्हांचा उपयोग करूं लागल्यापासून निरनिराळ्या प्रकारचे अर्थ त्यावरून दाखविता येतात. बोलतांना हे अर्थ बोलणाऱ्याच्या स्वरावरून किंवा विवक्षित शब्दावर जोर देण्यावरून समजतात

१५२ वाक्यांत शब्दांचा अनुक्रम कसा असावा, याविषयीं नियम असे आहेत :—

(अ) वाक्यांत प्रथमा व द्वितीया यांशिवाय दुसऱ्या विभक्ती असतां, तृतीया व चतुर्थी या विभक्ती कर्तृपदात्मक असल्या तर त्या विभक्तींतले शब्द वाक्याचे आरंभीं घालितात.

(ब) वाक्यांत साधारणतः सर्व विभक्ती त्यांच्या अनुक्रमानें घालाव्या.

(क) कर्मपद मात्र होईल तितकें करून क्रियापदाचे जवळ घालावें.

(ड) दोन कर्मे असतां मुख्यकर्म, व एक द्वितीया विभक्तींत व दुसरें संप्रदानात्मक चतुर्थी विभक्तींत अशीं कर्मे असतां द्वितीयाविभक्त्यन्त कर्मपद क्रियापदाजवळ घालावें.

(ई) वरील नियमांचीं उदाहरणें:—'त्यानें काम केलें;' 'मला अन्न करणें आवडत नाहीं;' 'रामा चावकानें बैलास तडाखे देत आहे;' 'मी मुंबईहून काल सकाळीं आलों;' 'हरीनें विष्णूस दोन पुस्तकें दिलीं;' 'शाहूनें बाळाजी विश्वनाथास पेशवा केलें;' इ० इ०.

१५३ स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्ययें व तशा अर्थाचीं विभक्त्यन्त नामें वाक्यांत असतां त्यांच्यावर बहुधा बोलणाराचा विशेष रोख असतो; म्हणून अशीं पदें वाक्यांत कर्त्याच्या नंतर लागलींच घालितात; उ० 'तो वर आपल्या मित्रास पत्रें लिहित बसला आहे.' 'मी दिवाणखान्यांत रामाजवळ बोलत बसलों होतों.' 'तो काल सकाळीं मुंबईहून आला.'

१५४ कोणताही शब्द वाक्यांत विशेष महत्वाचा आहे, किंवा ऐकणाराचें त्याचेकडे विशेषतः लक्ष गेलें पाहिजे असें बोलणारास वाटलें, तर तो अशा शब्दावर जोर

देऊन बोलतो; जसें, 'तो घरांत बसला आहे.' या वाक्यांत ज्या शब्दांवर बोलणारा जोर देईल, तो विशेषें-करून सांगावयाचा आहे, असा बोध होईल; उदाहरणार्थ, 'बसला' याचेवर जोर देऊन बोलणारा बोलला, तर 'बसला' आहे, ह्मणजे 'निजला' नाहीं, किंवा 'चालत' नाहीं, अथवा 'उभा' नाहीं, असा अर्थ होईल.

६५५ परंतु लिहिण्यांत असा कांहीं प्रकार करितां येत नाहीं. म्हणून ज्या शब्दास महत्व द्यावयाचें असेल, किंवा ज्या शब्दाकडे ऐकणाराचें विशेष लक्ष जावें असें बोलणारास वाटेल, तो वाक्यांत प्रमुखस्थानीं घालावा.

६५६ मराठी भाषेमध्यें वाक्यांत अशा प्रकारचीं प्रमुख स्थानें मुख्यतः तीन आहेत; १ वाक्यांत आरंभीं, २ कर्त्यानंतर आणि ३ क्रियापदापूर्वीं.

६५७ जर, तर, जेव्हां, तेव्हां, इ० अव्ययें जीं नेहमीं वाक्यांत आरंभींच असलीं पाहिजेत, त्यांचा विचार वरील नियम लावितांना करूं नये. तीं वाक्यांत आरंभींच असलीं पाहिजेत. —तथापि केव्हां त्यांचे अगोदरही वाक्यांत दुसरे शब्द घालितात; जसें, '**रामा** जर आला, तर मी येईन.'

६५८ हे जे नियम सांगितले, यांशिवाय आणखी कांहीं नियम बांधितां येत नाहींत. कारण ही गोष्ट संवयीवर व प्रचारावर अवलंबून आहे. यासाठीं खालीं कित्येक उदाहरणें देऊन त्यांत काय विशेष गोष्ट आहे, हें सांगतों:—

(अ) भेट देऊन बोलावयाचें असतां किंवा एकाद्या अर्थाचा अतिशयपणा दाखविणें असतां क्रियापद आरंभीं घालतात; व कचित् त्याची द्विरुक्तिही करितात; उदाहरणें:—'घे सुरी चाक

उरीं;' यांत कोणच्याही कामाचा अतिशयपणा दाखविला आहे. '**भर** आतां दुष्टा!' '**भर** ओंजळ घाल भिक्षा, असें करून त्यानें सर्व धान्य संपविलें.' '**दे दे** करून त्यानें उच्छाद आणिला.' 'आतां **खा खा** चालविली आहेस, पुढें **माग** भिक्षा. '**पाहिली** नदी **घातली** उडी.' '**असतील** शिरें तर मिळतील भुतें.' '**सांपडला** मऊ बिच्छाना, **निजले** ताणून!' '**गावें** तर भावड्यानेंच.' 'सभेंत **बोलावें** तर माधवरावानींच.' 'नाचावें तर सखूनेंच.' इ० इ०.

६९९ आतां आणखी कित्येक उदाहरणें त्यांचे अर्थाचे स्पष्टीकरणासह सांगतों:—

'तूंच जर जाशील तर काम होईल;' यांत 'तूं' शब्दास विशेष महत्व दिलें आहे; 'जाशील तर जा;' यांत 'जाशील' हा शब्द महत्वाचा आहे; 'मार त्याचे एक थोबाडींत;' यांत 'मार' हें मुख्यतः सांगितलें आहे. 'पुस्तक मी हरीला दिलें;' यांत दुसरी कांहीं वस्तु कोणालाही दिली असेल, पण '**पुस्तक**' हरीला दिलें असें बोलणारा सांगतो. 'घरांत हरी आहे' यांत मागणारास घरांत कोण आहे हें विशेषतः सांगावयाचें आहे. '**मुंबईहून** रामा काल सकाळीं आला.' यांत दुसरे कोठून केव्हांही आला असेल, पण मुंबईहून अमुक वेळेस आला हें सांगावयाचें आहे. इ० इ०.



## कर्तृपद व कर्ता (उद्देश्य) यांची व्यवस्था.

**७१०** क्रियापदाचें कर्तृपद किंवा उद्देश्य हें नाम, विशेषण, सर्वनाम, नामवाक्य किंवा वाक्यांश होऊं शकेल; उदाहरणें:—

'**व्यायाम** शरीरास हितकारक आहे' (नाम).

'शहाणा कधीं आळसांत वसत नाहीं' (विशेषण).

'तो कधीं कधीं येथें जातो' (सर्वनाम).

'मुलांनीं नित्य फिरावयास जावें, हें चांगलें' (नामवाक्य).

'फिरावयास जाणें, आरोग्यास चांगलें' (वाक्यांश).

टीप—नामवाक्य किंवा वाक्यांश कर्ता असल्यास नेहमीं हें किंवा असें हीं सर्वनामें पुढें घालतात.

६६१ कर्त्याची नेहमीं प्रथमा विभक्ति असते; परंतु कर्तृपद तृतीयान्त अथवा चतुर्थ्यन्त ही असतें.

६६२ कर्मणिप्रयोगांत व भावेप्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असतें. उ० 'चोरानें त्याचें घर फोडलें;' 'त्यानें रामास मारिलें;' इ०.

६६३ शक्यार्थी असतां कर्तृपदाची तृतीया किंवा चतुर्थी होते; जसें, 'माझ्यानें किंवा मला बोलवतें.'

टीप—याविषयीं साधारण नियम असा आहे, कीं क्रियापद करणरूपी असतां तृतीया होते, व अकरणरूपी असतां चतुर्थी घालणें चांगलें दिसतें.

६६४ करावें, बोलावें, इत्यादि विध्यर्थक व करावयाचें, बोलावयाचें इ० सत्तादर्शक विशेषणें असतां कर्तृपद चतुर्थ्यन्त घालितात. जसें, 'मला बोलावें लागलें;' 'त्याला बोलावयाचें आहे.' इ०.

६६५ क्रियापदास 'आणि' या अव्ययानें जोडलेले एकापेक्षां अधिक कर्ते असल्यास क्रियापद अनेक वचनीं असतें; उदा० 'राम आणि लक्ष्मण वनांत गेले,' 'धर्म, भीम आणि अर्जुन कुंतीचे पुत्र होते.'

(अ) एकापेक्षां जास्त कर्ते असल्यास पुष्कळदां पुढें दर्शक

सर्वनाम घालतात. कर्ते एकाच लिंगाचे असल्यास सर्वनामाचें त्याच लिंगाचें बहुवचनीं रूप घालतात; परंतु ते अनेक लिंगांचे असल्यास सर्वनामाचें नपुंसकलिंगी बहुवचनी रूप घालितात.

११६ (अ) सर्व कर्ते एकाच लिंगाचे असल्यास क्रियापद त्याच लिंगाचें असतें; जसें 'रामा आणि त्याचा बाप हे आले;' 'वेणु आणि गंगा आज गांवास गेल्या;' इ०.

(आ) परंतु कर्ते निरनिराळ्या लिंगांचे असल्यास क्रियापद नपुंसकलिंगी अनेकवचनीं घालितात; जसें, 'राम आणि सीता [हीं] वनास गेलीं;' 'हरीचा भाऊ आणि त्याची बायको व मुलें गांवास गेलीं आहेत.' इ०.

(इ) एकापेक्षां जास्त कर्ते असून जर ते मनुष्येतर प्राणिवाचक नामें किंवा मिश्र प्राणिवाचक नामें असलीं, तर क्रियापद शेवटच्या कर्त्याप्रमाणें असतें; जसें, 'आमची गाय आणि बैल आला;' 'आमचा रामा गडी आणि हरवलेलें बकरें आतांच सांपडलें.'

(ई) मनुष्यवाचक नामें कर्ते असतांही असी रचना असते; परंतु त्यावेळीं बहुधा दोहोंपेक्षां ज्यास्त कर्ते असतात; जसें, 'विनू, नाना, आणि कृष्णी आलीं;' इ०.

(उ) 'किंवा' या अव्ययानें जोडलेले कर्ते असल्यास क्रियापद एकवचनीं असतें; व कर्ते भिन्नलिंगी असल्यास क्रियापद शेवटच्या कर्त्याप्रमाणें असतें. उदा०—'रामा किंवा गोविंदा येईल;' 'तेथें विष्णू किंवा सिता होती;' इ०.

११७ एकापेक्षां जास्त नामें कर्त्याचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां घातलीं असतां तीं वाक्यांत केवळ विशेष-

प्रमाणें असतात; त्यांचा विभक्त्यर्थ 'उद्देश' असतो; व त्यांच्या योगानें क्रियापदाचे लिंगादिकांत बदल होत नाहीं. उ० 'इंग्लंडचा राजा व हानोवरचा संस्थानिक पहिला जार्ज, हा हल्लींच्या राजघराण्याचा मूळ पुरुष होय;' 'फ्रेंच लोकांनीं व्यक्तिमात्राच्या वर्तनाची स्वतंत्रता हें एक मोठें दैवत मानिलें आहे;' इ०. या दोन्ही उदाहरणांत क्रियापद 'पुरुष' व 'दैवत' या मुख्य कर्त्याप्रमाणें आहे.

११८ प्रयोज्य क्रियापद असतां वाक्यांत दोन कर्तृपदें असतात; एकापासून क्रिया करणाराचा बोध होतो, व प्रयोज्य क्रियापदाचे संबंधानें हेंच कर्तृपद मुख्य असतें. प्रयोग कर्तरि, कर्मणि अथवा भावी असेल, त्याप्रमाणें याची प्रथमा अथवा तृतीया विभक्ति असते. परंतु दुसरें कर्तृपद, जें मूळ क्रियापदाचे संबंधानें कर्तृस्थानीं असतें, त्यास 'कडून' हें तृतीयाविभक्त्यर्थक अव्यय लावितात; उदा०-'हरीनें गोविंदाकडून हें काम करविलें;' 'त्यानें आपले मुलाकडून गीता वाचून (वाचवून) घेतली;' इ०.



## कर्मपद.

११९ कर्तृपदाप्रमाणेंच कर्मपद नाम, विशेषण सर्वनाम, नामवाक्य किंवा वाक्यांश असतें; उदा० 'तो काम करितो,'(नाम)'एखाद्या शाहण्यास बोलाव,' (विशे०), 'तो त्यास बोलावितो' (सर्वनाम), 'मी तो लबाड आहे, हें समजतों' (नामवाक्य). 'त्याचें मुंबईस जाणें त्यानें पसंत केलें नाहीं' (वाक्यांश). इ०.

टीप—कर्मपदाचे संबंधाचे सर्व विशेष नियम प्रयोगप्रकरणीं दिले आहेत.

१७० (अ) वाक्यांत पुष्कळदां एकापेक्षां जास्त कर्मपदें असतात, जसें 'तो पान आणि सुपारी खातो.'

(ब) कर्मणिप्रयोगात 'आणि,' 'व,' 'किंवा' या अव्ययांनीं जोडलेलीं अनेक कर्मपदें असल्यास क्रियापद शेवटच्या कर्मपदाप्रमाणें असतें; जसें, 'मीं मुरंबा आणि पोळी खाल्ली;' 'त्यानें एक आंबा, दोन सुपाऱ्या आणि पांच चार द्राक्षें खाल्लीं असतील;' इ०.

टीप—अशा वाक्यांत सर्व कर्मपदांचे शेवटीं 'हा' किंवा 'असा;' या सर्वनामाचीं रूपें घालितात; सर्व कर्में एकाच लिंगाचीं असल्यास सर्वनामाचें रूप त्याच लिंगाचें बहुवचनीं असतें; परंतु तीं भिन्नलिंगी असल्यास तें रूप नपुंसकलिंगी बहुवचनीं असतें.

१७१ कित्येक क्रियापदांस दोन कर्में असतात. यांतलीं मुख्य क्रियापदें करणें, बनविणें, नेमणें, बोलावणें, म्हणणें, देणें, शिकविणें, लिहिणें, मागणें, पाठविणें समजणें, म्हणविणें इ० आहेत. याच अर्थाच्या दुसऱ्या क्रियापदांसही दोन कर्में असतात. अशा वाक्यांत ज्या शब्दांवर क्रिया प्रत्यक्ष घडते, तीं 'प्रत्यक्षकर्में' असून त्यांची प्रत्ययरहित द्वितीया होते; व ज्यांच्या संबंधानें किंवा ज्यां त्यांवर अप्रत्यक्ष रीतीनें क्रिया घडते, ते शब्द सप्रत्यय द्वितीया विभक्तींत असतात; जसें, 'त्यानें ब्राह्मणांस धर्म केला काय?' 'लोकांनीं त्यास राजा बनविलें;' 'त्यानें मला पत्र लिहिलें;' 'शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें.' इ०.

टीप—वरील वाक्यांत बहुतेक ठिकाणीं अप्रत्यक्ष कर्मपदाची चतुर्थी विभक्ती मानण्याची सध्या भाषेत चाल पडली आहे; आणि तसें करणें हें व्यवस्थेच्या दृष्टीनें विशेष चांगलें दिसतें.

६७२ अप्रत्यक्षकर्म व प्रत्यक्षकर्म हीं दोन्ही किंवा त्यांतील एक मनुष्येतर-प्राणिवाचक नाम किंवा क्वचित् मनुष्य-प्राणिवाचक नाम असतांही कर्तरिप्रयोगांत दोन्ही कर्मांची अप्रत्ययद्वितीया होते; व भूतकाळीं क्रियापद असलें तर कर्मणिप्रयोगही होतो; उ० 'ईश्वरानें नाम सकल पातक भस्म करितें;' 'इंग्लिशांनीं नार्मंडीचा ड्यूक वुईलियम हा आपला राजा केला.' इ०.

टीप—अशा प्रसंगीं मनुष्यप्राणिवाचक नाम कर्म असतां व वर्तमानकाळ असल्यास गौण कर्मपदाची द्वितीया करावी, व भूतकाळ असता भावीप्रयोग करावा, हें विशेष प्रशस्त दिसतें.

६७३ प्रत्यक्षकर्म जेव्हां धातुसाधित क्रियार्थ दर्शक नाम ( करणें, लिहिणें, इ० ) असतें, तेव्हां त्याबद्दल विध्यर्थक धातुसाधित नामाची (करावें, लिहावें, इत्यादिकांची) चतुर्थीही चालिनात; उ०—'मीं त्यास लिहिणें, किंवा लिहावयास शिकविलें;' 'त्यानें त्यास शिव्या देणें कि० द्यावयास सोडिलें नाहीं;' अशा वाक्यांत 'णें'-प्रत्ययान्त धातुसाधित नाम कर्म असल्यास भावीप्रयोग करावा.

६७४ अप्रत्यक्ष कर्मपदाचे ठिकाणीं जेव्हां क्रियार्थ असतो, तेव्हां त्याबद्दल -ता-तांना-प्रत्ययान्त धातुसाधित-अव्यय येतें. उ०—'मीं रामास सकाळीं रस्त्यानें जातांना पाहिलें.'

६७५ करणें, समजणें, मानणें, म्हणणें, नेमणें, जाणणें,

इत्यादि क्रियापदांचें अप्रत्यक्ष कर्मपद द्वितियान्त नाम असतें. परंतु क्रियापद त्याच्याशीं जुळून कर्मणिप्रयोग होत नाहीं; उदाहरणें:—

'शिवानें बाजीरावास पेशवा केलें;' 'जर्मनीच्या राजास बादशाहा असें म्हणतात;' 'सरकारानें त्यास जज्ज नेमिलें;' इ०. अशा ठिकाणीं भावीप्रयोग करितात.

६७६ क्रियापदाचें कर्मपद जेव्हां वाक्य असतें, तेव्हां तें क्रियापदाचे पूर्वी किंवा मागाहून येतें; पूर्वी येतें तेव्हां 'हा' 'असा' या सर्वनामांचीं रूपें किंवा 'म्हणून' हें अव्यय घालून मुख्य क्रियापदाशीं त्याचा संबंध जोडतात, बरेच वेळा कवितेंत हीं सर्वनामें किंवा अव्यय हीं गुप्त असतात; जसें, 'मी तुझें काम करीन असें (किंवा) म्हणून तो म्हणाला;' 'तो म्हणाला कीं मी तुझें काम करीन,' 'तो म्हणाला, मी तुझें काम करीन.'

'विश्वामित्र ह्मणे, मी क्षत्रिय, आधार जाण तेजाचा;'
मोरोपंत.

'म्हणे विश्वामित्र स्वमनिं, सकळांचे भरवसे
कळों आले, आतां मजजवळि विश्वंभर वसे;' ।
वामन.



## उद्देश्य व विधेय, आणि त्यांचा परिवार.

६७७ वाक्यांत ज्या विषयीं आपण विधान केलें असतें, ह्मणजे ज्याविषयीं आपण कांहीं सांगतों किंवा बोलतों, त्यास उद्देश्य असें ह्मणतात; उ० 'रामा लिहितो' या वाक्यांत 'लिहितो' ही गोष्ट रामाबद्दल सांगितली, म्हणून 'रामा' हा शब्द विषय होय.

६७८ कर्तरिप्रयोगांत आपण कर्त्याबद्दल विधान

करितो, म्हणून तेथें जो कर्ता तोच वाक्यांत उद्देश्य असतो; कर्मणिप्रयोगांत कर्मपदाबद्दल विधान केलें असतें, म्हणून तेथें कर्मपद उद्देश्य असतें; उ० 'रामा बसतो' किंवा 'रामा काम करितो,' या वाक्यांत 'रामा' याबद्दल विधान केलें आहे, म्हणून तो शब्द उद्देश्य; परंतु 'रामानें काम केलें' या वाक्यांत 'केलें' हें विधान 'काम' या शब्दाबद्दल केलें आहे, म्हणून तो शब्द उद्देश्य होय.

टीप—यावर कोणी असें म्हणतील, कीं 'रामानें काम केलें' या वाक्यात 'रामानें' या शब्दाबद्दल विधान केलें आहे. पण असक्याबद्दल विधान केलें, असें समजण्याचें प्रमाण अर्थात हें होय कीं ज्याबद्दल आपण विधान करितों, तो शब्द वाक्यांत मुख्य असतो, व केलेलें विधान दाखविणारे शब्द त्याचे धोरणानें वागतात. एकादे घरांत जसा नोकरांच्या सर्वांवर यजमानाचा अमल असतो, त्याप्रमाणें वाक्यांत इतर पदांवर—मुख्यतः विधेयावर उद्देश्याचा विशेष अमल असतो. कर्मणि वाक्यांत असा अमल ठेवणारा शब्द कर्मपद असतो, व म्हणूनच त्या प्रकारच्या रचनेस **'कर्मणिप्रयोग'** अशी संज्ञा आपण दिली आहे. वरील वाक्यांत 'रामानें' या शब्दाचें मुख्यत्व जाऊन त्यास तृतीया विभक्तीनें रूप देऊन गौणत्वानें राहावें लागलें आहे. शिवाय हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं **उद्देश्य** म्हणजे वाक्यांतला प्रधानशब्द. त्याचेवर विधेयाचा अंमल कधींही असणार नाहीं. त्यानें विधेयास आपले प्रमाणें वागवावयाचें. असा स्वतंत्र शब्द नेहमीं प्रथमा विभक्तींतच असावयाचा, कारण स्वतंत्र विभक्ति काय ती तीच आहे. म्हणून 'रामानें' या तृतीयान्त पदास उद्देश्य म्हणूं नये. शिवाय कर्मणिप्रयोग असतां पुष्कळदां वाक्यांत कर्तृपद घातलें नसलें तरी वाक्यार्थांत उणेपणा दिसत नाहीं. 'आज आमचेकडे जेवायला ब्राह्मण बोलाविले आहेत,' 'पानें वाढलीं' इत्यादि वाक्यांत कर्तृ-

पदाची गरज नाहीं. तेव्हां कर्मणि वाक्यांत कर्मपदच उद्देश्य-पद होय, असें उघड दिसून येईल.

१७९ वाक्यांतला कर्ता व उद्देश्य हीं नेहमीं एकच असतात. उद्देश्यपद नेहमीं प्रथमाविभक्तींत असतें, हें या वरून स्पष्ट समजेल.

(अ) भावीप्रयोगांत बोलणारा कोणच्याच गोष्टी-बद्दल विधान न करितां केवळ सामान्येंकरून क्रिया घडली यवढेंच मागतो, म्हणून या प्रयोगामध्यें प्रत्यक्ष उ-द्देश्य पद नसतें. उ० 'रामानें रावणास मारिलें,' 'त्या-नें जावें,' इत्यादि वाक्यांत प्रत्यक्ष रीतीनें विधान कोण-च्याही शब्दाबद्दल केलें नाहीं. ह्मणून या वाक्यांत उद्देश्य नाहीं.

टीप—उद्देश्य नाहीं म्हटलें यावरून उद्देश्याखेरीज वाक्य कसें झालें? हा प्रश्न राहातो. तर उद्देश्य नाहीं याचा अर्थ **प्रत्यक्ष उद्देश्य नाहीं**, असा होय. वाक्याचें पृथक्करण व मीमांसा करणें हा प्रकार संस्कृतांत प्रयोगांपलीकडे नसल्यानें त्या भाषेत असला विचारच केलेला नाहीं. इंग्रजींत हा विचार जास्त केला आहे, ह्मणून त्या भाषेत '*rains*,' '*shines*,' '*thunders*' इत्यादि भावी किंवा अकर्तृक क्रियापदें आलीं अ-सतां '*it*' हें **भावी सर्वनाम** (*impersonal pronoun*) मुद्दाम घालून त्यास उद्देश्य करितात. मराठींत सुद्धां जर इंग्रजी मधली वाक्यपृथक्करणाची रीत आणावयाची, तर असला प्रकारही आणिला पाहिजे. 'मला कळमळते,' 'त्याला फावेल,' 'तुला समजलें,' इत्यादि वाक्यांत 'कळमळणें,' 'फावणें,' 'समजणें' इत्यादि क्रियेच्या भावार्थास, 'व रामानें रावणास मारिलें' यांत 'रामा' या व्यक्तीनें काय केलें हें सांगितलें आहे, म्हणून 'रामानें' यांतील 'रामा' शब्दास पाहिजेतर उद्देश्य म्हणावें. परंतु 'मला'

'त्याला,' 'तुला' 'रामानें' या प्रथमेतर विभक्तींतल्या शब्दांस उद्देश म्हणणें प्रशस्त दिसत नाहीं. मराठींतील भावीप्रयोगाची रचना मनांत आणिली तर त्या वाक्यांत 'उद्देश्य' सांगण्याची गरज नाहीं; तथापि 'उद्देश्य' सांगणेंच असेल, तर सोयी क-रितां व एकंदर व्यवस्थेशीं जुळण्यासाठीं वरील शब्दांना 'उद्देश्यपदें' असें म्हणावें; म्हणजे उद्देश्य सांगण्याचें काम होईल व त्यांचा अप्रत्यक्षपणाही स्पष्ट होईल.

१८० संस्कृतांत व त्याचप्रमाणें मराठींत उद्देश्य, विधेय, इत्यादिकांचा स्पष्टपणें जरी विचार नाहीं, तरी या भाषेंतील प्रयोगप्रकरण म्हणजे सर्व उद्देश्य-विधेय यांच्या परस्पर सं-बंधाचाच विचार होय. क्रियाकरणारासच उद्देशून जेव्हां आपण बोलतों, तेव्हां कर्तरिप्रयोग. कर्मपदास उद्देशून बोलतों, व त्याचे विषयींच जेव्हां मुख्यतः सांगण्याचा उद्देश असतो तेव्हां कर्मणिप्रयोग. व सामान्येंकरून विधान करितों, तेव्हां भावीप्रयोग. तेव्हां हे जे उद्देश्य-विधेय-संबंध सांगण्याचे आमचे ठरीव प्रकार आहेत, त्यांचे बाहेर वाक्यपृथक्करणाची व्यवस्था आपणास नेतां येत नाहीं; ती चालू प्रयोगव्यवस्थेस जुळून असली पा-हिजे; हें उघड आहे.

१८१ क्रियेचें कर्तृपद व कर्मपद ज्याप्रमाणें नाम, सर्वनाम, विशेषण, नामवाक्य किंवा नामवाक्यांश असूं शकेल, त्याचप्रमाणें उद्देश्यही तसें असूं शकेल; याचीं उदाहरणें :—

(१) 'हरि पक्ष्यांस दाणे घालितो' (नाम).
(२) 'तो घरीं आला' (सर्वनाम).
(३) 'चांगले कधीं कोणाचा द्वेष करीत नाहींत' (विशेषण).

(४) 'त्यानें म्हटलें [कीं] **मी आतां जातो**' (नामवाक्य).

(५) '[असें करणें] बरें नव्हे' (वाक्यांश).

१८२ वाक्यांत उद्देश्यपद एकाकी शब्द असेल, किंवा त्याचा विस्तार केला असेल. उ० 'हरी जातो,' यांत उद्देश्य एकाकी आहे. परंतु 'गोविंदरावाचा मुलगा हरी,' किंवा शाहणा हरी,' अथवा 'आमचा हरी' असें म्हटलें कीं त्याचा विस्तार झाला.

१८३ उद्देश्याचा विस्तार विशेषणें, सविभक्तिक शब्द, व उद्देश्याचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वाक्यांत घातलेले शब्द (ज्यांच्या प्रथमाविभक्तीचा अर्थ 'उद्देश्य' असतो) यांच्या योगानें होतो.

१८४ उद्देश्याचा विस्तार केला नसतां त्यास '**शुद्ध-उद्देश्य**' किंवा '**असंकीर्णउद्देश्य**' असें म्हणावें; व तें विस्तृत असतां त्यास '**विस्तृतउद्देश्य**' किंवा '**संकीर्ण-उद्देश्य**' असें म्हणावें.

१८५ वाक्यांत उद्देश्याचे स्थितीबद्दल किंवा कृतीबद्दल जें कांहीं आपण सांगतों, त्यास 'विधेय' असें म्हणतात. उ० 'हरी जातो,' यांत हरीबद्दल 'जातो' ही गोष्ट सांगितली, म्हणून तें विधेय होय. (पहा, क. १७७).

१८६ **विधेयपद** बहुधा क्रियापद असतें. परंतु 'अस' धातूचा अर्थ 'अस्तित्वांत असणें' असा नसून केवळ उद्देश्याबद्दल विधान करणें इतकाच जेव्हां असतो, तेव्हां त्या धातूबरोबर नामें, सर्वनामें, विशेषणें वगैरे शब्दही 'विधेय' होतात. उ० 'हरी गोविंदरावाचा मुलगा आहे (नामें);' 'काल मीं जो गृहस्थ पाहिला तो **तोच आहे**' (सर्वनाम); '**कृष्णा हुषार** आहे' (विशे०).

१८७ संयुक्त क्रियापद असतां त्याच्या गौण अवयवांसुद्धां सर्व क्रियापदास 'विधेय' असें ह्मणावें; परंतु जेव्हां वाक्यांत त्या गौण भागापैकीं कांहीं भाग क्रियावाचक नाम समजून जेव्हां आपण त्यास क्रियापदाचा कर्ता किंवा कर्म मानितों, तेव्हां त्यास वाक्यांतील व्यवस्थेप्रमाणें उद्देश्य, किंवा कर्मपद मानणेंच उचित आहे.

उदाहरणें;—'मला काम **करितां** येतें;' 'त्यास मुंबईस **जावयाचें** आहे;' 'आईनें मुलास **जेवूं** घातलें;' या वाक्यांत जाड्या अक्षरांतले शब्द विधेयाचे अवयव नव्हत; ते शब्द त्या त्या वाक्यांतलीं उद्देश्यपदें आहेत. परंतु 'तो **जावयास** किं. **जाऊं** लागला,' 'मी काम **करीत** आहे' 'त्यानें तें पुस्तक **वाचून** टाकिलें,' यांतील जाड्या अक्षरांतले शब्द विधेयाचे अवयव होत.

१८८ कित्येक वेळा विधेयाच्या अर्थाची पूर्तता होण्यास वाक्यांत दुसरे शब्द घालावे लागतात. विधेयदर्शक क्रियापद सकर्मक असल्यास अधिक शब्द घालण्याची जरूर पडते. अशा शब्दांस *'विधेयपूरक'* असें म्हणतात;' उदा० 'हरी पुस्तक वाचितो,' या वाक्यांत 'वाचणें' या क्रियावाचक विधेयशब्दाची पूर्तता कांहीं तरी शब्द घातल्यांवांचून होत नाहीं. असा शब्द 'पुस्तक' होय, म्हणून हें 'विधेयपूरक.'

१८९ व्याकरणांतलें कर्मपद हेंच नेहमीं *'विधेयपूरक'* असतें. म्हणून *'विधेयपूरक'* हा शब्द त्यास न लावितां *'कर्म'* किंवा *'कर्मपद'* हाच शब्द लाविला तरी चालेल.

१९० कर्मपदाचा दुसरीं विशेषणें इत्यादि व सविभक्ति

क शब्द वगैरे यांचे योगानें उद्देश्याप्रमाणेंच विस्तार करितां येईल. म्हणून अशा विस्तार करणाऱ्या शब्दांस '**कर्मपदविस्तार**' असें म्हणावें; व कर्मपद विस्तृत किंवा अविस्तृत असेल, त्याप्रमाणें त्यास '**संकीर्ण**'–किंवा '**विस्तृतकर्मपद**' अथवा '**असंकीर्ण**'–किंवा '**शुद्धकर्मपद**' असें म्हणावें.

६९१ कित्येक क्रियापदास संप्रदानार्थक अप्रत्यक्ष कर्मपदें असतात (पहा, कलम ६७१): हीं '**अप्रत्यक्षविधेयपूरकें**' होत अथवा या शब्दांस **विधेयविस्ताराखालीं** घालण्यास चिंता नाहीं.

६९२ विधेयाचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वाक्यांत क्रियाविशेषणें, क्रियाविशेषण-वाक्यें, किंवा क्रियाविशेषण-वाक्यांश घालितात. यास **विधेयविस्तार** असें म्हणतात; कारण त्यांचे योगानें विधेयाच्या अर्थाचा विस्तार होतो. उदा० 'तो पुस्तक **चांगलें** वाचतो'(क्रि. वि.); '**तूं तेथें होतास**, तेव्हां तो आला'(वाक्य); '**तूं घरीं असून** मला भेटला नाहींस'(वाक्यांश).

६९३ विधेयविस्तारापासून क्रियाविशेषणाप्रमाणें काल, स्थल, रीति, संकेत, आश्चर्य, कार्य, कारण, परिणाम, इत्यादिकांचा बोध होतो; त्या त्या प्रमाणें त्यांस कालदर्शक, स्थलदर्शक इत्यादि विधेयविस्तार असें म्हणावें.

६९४ वाक्यामध्यें जीं शब्दाचीं सविभक्तिक रूपें असतात यापासून विधेयाच्या गुणाचा बोध होतो; म्हणून तीं व्याकरणाचे निरनिराळ्या शब्दांचे दृष्टीनें जरी नामाचीं रूपें आहेत तरी वाक्यार्थाचे दृष्टीनें तीं क्रियाविशेषणें होत. म्हणून प्रथम

व द्वितीया याव्यतिरिक्त सर्व सविभक्तिक शब्द कांहीं विशेष कारणानें विशेषणें होऊन त्यांचा नामाकडे संबंध मात नसल्यास त्यांस **विधेयविस्तार** असें म्हणावें.

(अ) कर्मणी व भावे प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त असतां त्याच्याकडून क्रियेच्या कारणाचा बोध होतो; म्हणून त्यास 'विधेयविस्तार' च म्हणावें.

टीप—वरील सर्व वाक्यमीमांसे संबंधी विचार जरी वाक्यपृथक्करणाचा भाग आहे, तरी त्याच्यावर जास्त विचार केला असता ग्रंथविस्तार फार होणार आहे. यासाठीं त्याचा येथें थोडक्यांत विचार केला आहे. यापेक्षां जास्त विचार त्या विषयावरील स्वतंत्र पुस्तकांत पहावा.



## विशेषण.

१९५ वाक्यांत विशेषण विशेष्याचे पूर्वीं येतें; परंतु असधातूचें क्रियापद असतां तें मागाहून येतें; जसें. 'चांगला मुलगा आईबापांची आज्ञा मानितो;' 'तो चांगला आहे;' इ०. या दुसऱ्या प्रकारच्या विशेषणांस **'विधिविशेषणें'** असें म्हणतात.

१९६ आकारान्त विशेषणांस विशेष्यांच्या लिंगवचनांच्या अनुरोधानें फेरफार होतात; व विशेष्य सविभक्तिक असल्यास त्या विशेषणाचें सामान्यरूप होतें. हें सामान्यरूप विकल्पें 'या' किंवा 'ए' लागून होतें; उदा० 'तो चांगला मुलगा आहे;' 'ती चांगली मुलगी आहे;' 'तें चांगलें मूल आहे;' 'तीं चांगलीं मुलें आहेत;' 'त्यां चांगल्या मुली आहेत;' 'ते चांगले मुलगे आहेत;' 'चां-

गले किंवा चांगल्या मुलांस शिक्षा करावी लागत नाहीं,' इ०.

१९७ (१) चा,-ची,-चें-प्रत्ययान्त संबंधी विशेषणाचें सामान्यरूपही अशाच रीतीनें दोन प्रकारांनी होतें. उदा० 'रामा-च्या किं०-चे घरीं', 'हरीचे हातांत' इ०. ह्या विशेषणाचें जें विशेष्य, त्याचें पुनः संबधी विशेषण आलें असतां पुर्वींच्या संबंधी विशेषणाचें सामान्यरूप होतें; उ० 'हरीच्या घराचें दार'—इ०. या विशेषणाचे पुढें कित्येक विशेषणें व क्रियाविशेषणें येऊन ही यांचें सामान्यरूप होतें (पहा, नि० १९३ व ७११). त्या वेळीं वस्तुत त्यांचा नामाप्रमाणें उपयोग असतो (खालचा नियम पहा).

(२) या संबंधी विशेषणांचीं विशेष्यें केव्हां केव्हां गुप्त असतात, किंवा त्यांचा त्या विशेषणांतच सामावेश करितात उ० 'माझें असें आहे, कीं मला रोज दोन तास फिरलें पाहिजे'; म्ह० 'माझी रीत अशी आहे,' इ०. याच प्रमाणें 'तुमचें घरचें (घरची व्यवस्था) कसें काय आहे!' 'मुंबईचें (वर्तमान) कांहीं समजलें काय!' इत्यादि उदाहरणांत समजावें. या ठिकाणीं हीं विशेषणें असतां नामांमारिखा त्यांचा उपयोग केला आहे.

१९८ (अ) वाक्यांत एकापेक्षां ज्यास्त विशेष्यें असून विशेषण केव्हां एकच असतें; अशा वेळीं आकारान्त विशेषण असल्यास तें जवळच्या विशेष्याप्रमाणें चालतें; उ० 'त्याला मोठा भाऊ आणि बहीण आहे.'

(ब) एकापेक्षां ज्यास्त विशेषणें असल्यास त्यांचे पुढें 'असा, 'हा' इ० सर्वनाम घातलें तरी वरचे सर्व विकार होतात; उ०

'चांगल्या आणि शाहण्या अशा मुलास' इ०. परंतु पुष्कळ वेळा हा फेरफार करीतही नाहींत. उदा० 'दांडगा आणि निर्लज्ज अशा एका मुलानें हरीस मारिलें.' इ०.

६९९ विधिविशेषणें जेव्हां एकापेक्षां जास्ती विशेष्यांस लावितात, तेव्हां तीं विशेष्यें एकाच लिंगाचीं असल्यास विशेषण त्याच लिंगाचें अनेकवचनीं घालितात; परंतु विशेष्यें भिन्नलिंगी असल्यास विशेषण नपुंसकलिंगी बहुवचनीं घालावें; उदाहरण—'रामा आणि गोविंदा चांगले आहेत;' परंतु, 'विष्णु आणि मनी चांगलीं आहेत.

७०० या ठिकाणीं विधिविशेषणास शेवटच्या विशेष्याचीं लिंग-वचनें लावण्याचाही प्रचात आहे. परंतु विशेष्यें निर्जीवपदार्थ-वाचक नामें असल्यास विशेषकरून अशी रचना असते; उदा० 'त्या पक्ष्याचें डोकें आणि मान पांढरी होती.'

टीप—येथें 'असा' किंवा 'हा' या सर्वनामाचा सर्व विशेष्यानंतर उपयोग करितात.

७०१ विशेषणाचा सकर्मक क्रियापदाचे कर्माचे जागीं नामाप्रमाणें उपयोग होतो; उदा० 'आपण कोणाचें वाईट करूं नये.

(१) आकारान्त विशेषण क्रियापदाचें कर्मपद असल्यास तें नपुंसकलिंगी एकवचनीं असतें; उ० 'रामानें काय झालें तें खरें सांगितलें.

(२) आकारान्त विशेषण क्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म असून प्रत्यक्ष कर्माची अप्रत्यय-द्वितीया झाली असतां विशेषणास फक्त लिंग व वचन यांचा विकार होतो; त्याचें सामान्यरूप होत नाहीं. उदा० 'त्यानें आपले हात शाईनें काळे केले.

(१) परंतु प्रत्यक्ष कर्म सप्रत्यय द्वितीया विभक्तींत असल्यास विशेषण नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें; जसें, 'लोक त्यास चांगलें म्हणतात.'

टीप—क्वचित् अशा ठिकाणीं दुसरा नियम लागतो; उ०- 'गुरूनें त्यास शहाणा केलें.' परंतु तिसऱ्या नियमांतील प्रयोगाचा प्रचार विशेष आहे. दुसऱ्या नियमाप्रमाणें फेरफार होणें तो 'कर' धातूचें क्रियापद असल्यास मात्र होतो.

७०२ करणें, समजणें, मानणें इत्यादि थोड्या क्रियापदांसि फक्त विशेषणात्मक अप्रत्यक्ष-कर्मपद असतें.

७०३ जेव्हां उद्देश्याची प्रथमा असते, किंवा जेथें 'हा' किंवा 'असा' या सर्वनामांचीं रूपें अनेक नामांच्या पुढें घातलेलीं असतात, तेव्हां विशेषणें क्रियापदाचा जो कर्ता किंवा कर्तृपद असेल, त्याच्याशीं अन्वय पावतात; जसें, 'गोविंदा, कृष्णी आणि विनू हीं रामरावाचीं चांगलीं मुलें माझ्या ओळखीचीं आहेत;' 'मुंबई बेट शंभर वर्षांपूर्वी इतकें मोठें नव्हतें;' 'विष्णू,' कृष्णा आणि गोदू या चांगल्या मुलांनीं बापाची मर्जी राखिली आहे,' इ०.

७०४ **विशेषणांचा तारतम्य-भाव**:—मराठींत विशेषणांस तारतम्य-भाव नाहीं. संस्कृतांत तारतम्य-भाव दाखविण्याचे प्रत्यय 'ईयस्' व 'इष्ट' आणि 'तर' व 'तम' हे आहेत. हे विशेषणांस लागून तीं विशेषणें मराठींत येतात; जसें, श्रेष्ठ, उत्कृष्ट, वरिष्ठ, कष्टतर उच्चतम धर्मिष्ठ, प्रथम, पुण्यतर, पुण्यतम, इ०.

टीप—'तर' किंवा 'ईयस्' यावरून पहिल्यापेक्षा जास्त असा अर्थ होतो: 'तम' किंवा 'इष्ट' यापासून सर्वांत जास्त असा अर्थ होतो.

७०५. मराठींत तारतम्य-भाव दाखविणें तो 'त्यापेक्षां मोठा,' 'सर्वांत मोठा,' इ० शब्दांचा उपयोग करून दाखवितात.

७०६ 'थोडकासा' 'किंचित्' अशा अर्थीं विशेषणास 'सा'(असा), 'सर' किंवा 'ट' प्रत्यय लावितात; उदा० काळसर, पिवळट, पिंगट, काळासा, गोरासा, चांगलासा, इ०.

७०७ (अ) विशेषणप्रदर्शित गुणांचें आधिक्य किंवा त्याचा प्रकर्ष याचा बोध करणें असल्यास विशेषणाची द्विरुक्ति करितात. उदा० 'तेथें मुख्य मुख्य सर्व आले होते;' 'काहीं चांगले चांगले अंबे मला दे;'

'मोठे मोठेहि मठद्वारींहुनि भेट घेति पायाची.'

मोरो०

(ब) विशेषणाची द्विरुक्ति झाली असतां अर्थाचा बोध तीन प्रकारांनीं होतो:—(१) निरनिराळी वाटणी; उदा० 'प्रत्येकास एक एक लाडू वाटा.' (२) क्रमानें वाढणें किंवा कमी होणें; उ० 'थोडें थोडें इंग्रजी वाचीत जा;' 'पर्वत उंच उंच होत गेला आहे;' (३) प्रकर्ष दाखविणें; उदा० 'सूर्य लाल लाल दिसतो.'

७०८ परस्परांशीं उलट अशा अर्थांचीं दोन विशेषणें घालून तत्संबंधी किंवा त्याच्या मधील अर्थाच्या सर्व गोष्टींचा समावेश दाखविला जातो; जसें, 'लहान मोठीं शंभर पानें होतील;' 'तो रागानें हिरवा पिवळा झाला.'

७०९ जेव्हां विशेषणांचीं विशेष्यें सहज समजण्यासारखीं असतात; तेव्हां त्या विशेषणांसच नामें मानून त्यांचा

तसा उपयोग करितात; उदा० बऱ्यांची (बऱ्यां लोकांची) संगत धरा;' 'शहाण्यास (शहाण्या माणसास) मार शब्दांचा.'

७१० संबंधी विशेषण:—'चा' प्रत्यय लागून होणारें जें संबंधीविशेषण त्याचा उपयोग खालीं लिहिलेल्या निरनिराळ्या प्रकारांनीं होतो:—

(१) पदार्थाशीं मालकाचा स्वामित्वसंबंध—जसें, 'शाआचा वाडा,' 'मोंगलांचें राज्य,' 'विष्णूचें देवालय,' इ०.

(२) क्रियेशीं किंवा क्रियेच्या फळाशीं कर्तृकार्य संबंध—जसें, 'पक्ष्याचें घरटें;'—पक्ष्यानें बांधलेलें घरटें; 'रामाचें पत्र'—रामानें लिहून धाडलेलें पत्र.

(३) मनुष्यांचा परस्परांशीं नात्याचा संबंध—उदा० 'माझा भाऊ,' 'रामाचा चाकर.'

(४) भागाचा व सर्व पदार्थाचा अंशाशीं संबंध—'गाडीचीं चाकें;' 'हानाचीं बोटें;' 'सुपारीचें खांड.'

(५) वस्तूशीं गुणांचा धर्मधर्मी संबंध—'योग्यतेचा माणूस' 'रागाचा पुतळा.'

(६) ज्याचा पदार्थ बनविला आहे, त्याचा व मूळ द्रव्याचा प्रकृतिविकृत संबंध जसें—'लोखंडाची कांब' 'रेशमाचा कांठ.'

(७) जेथें पदार्थ ठेवावयाचा त्या स्थळाचा पदार्थाशीं आधाराधेय संबंध; 'रुपयांची पिशवी,' 'पुस्तकांचें कपाट.'

(८) कुल, गोत्र किंवा वंश यांचा संबंध—'तो देशपांड्याचा मुलगा.'

(९) राग-लोभ-भयादि मनोविकारांचा ज्याचे मुळें ते मनोविकार सहज उत्पन्न होणार, अशा मनुष्याशीं अगर पदार्थाशीं संबंध—'आईची माया,' 'पेंढाऱ्यांची भीति.'

(१०) अंगचा स्वभाव किंवा धर्म—'अंगचें बळ' 'मनाचा मोकळा.' 'पराची भिंत,' इ०.

(११) पदार्थाचा उपयोग—'स्नानाची जागा,' 'बसावयाची खोली,'—'बसावयाचा घोडा.'—'टेंकावयाची काठी,' 'उन्हाची छत्री.' इ०.

(१२) स्थित्यंतर—'गरीबाचा श्रीमंत'—'या संस्कृत श्लोकाचें प्राकृत करा.'

(१३) 'दोष' किंवा 'आरोप' या शब्दामागें ज्या अपराधाचा आरोप असतो, त्यास हा प्रत्यय लावितात; जसें—'बालहत्येचा दोष.' 'खुनाचा आरोप,' इ०. तसेंच शिक्षा सांगताना जी शिक्षा होते. तीबद्दल हें विशेषण येतें; जसें 'सात महिन्याची सक्तमजुरी,' इ०.

(१४) कोठें शब्दांची द्विरुक्ति होऊन पूर्वशब्दाचें संबंधी विशेषण होतें, व पुढला द्विरुक्त शब्द त्याचें विशेष्य म्हणून पुढें येतो; हा संबंधी विशेषणाचा उपयोग समाहारार्थी किंवा अवधारणाबोधक असतो. पूर्व संबंधी विशेषणाचें रूप पुढल्या द्विरुक्त शब्दाचे धोरणानें फिरतें; उदा० 'दुष्काळानें गावचे गाव ओस पडले.' 'पैशाचा पैसा गेला, व बायकोपरी बायको गेली.' 'कोणाचें कोण आणि कशाचें काय !' 'हजाराचे हजार पाहिजे तें म्हणती-ल;' 'तुमचे तुम्ही, आमचे आम्ही,' 'त्याचा तो;' इ०.

टीप—या प्रकारांत पूर्वविशेषण अकारान्त असतां वर दाखविलेल्या अर्थाचा बोध असल्यास त्याचें फक्त सामान्यरूप न होतां संबंधीविशेषणाचा प्रत्यय लागतो.

(१५) काळाचा नियमितपणा दाखवावयाचा असतां अशा रीतीनें द्विरुक्त संबंधी विशेषणाचा उपयोग करितात; उदा०-'तारखेच्या तारखेस.' 'मंगळवारच्या मंगळवारीं'—म्हणजे प्रत्येक मंगळवारीं नियमितपणानें,—मंगळवार न चुकवितां—इ०.

(१६) कोठें या संबंधी विशेषणाचा उपयोग करणार्थी किंवा निमित्तार्थी होऊन त्या करणाचा परिणाम पुढील शब्दानें दर्शित असतो; उदा० 'मनाचा मोकळा,' 'वजनाचा जड,' 'बुद्धीचा मंद,' 'अन्नाचा मारलेला खालीं पाहितो, पण तरवारीचा मारलेला वर पाहतो.' इ०.

(१७) स्थळ व काळ यांची मर्यादा विवक्षित असतां अधिकरणार्थी या विशेषणांना उपयोग करितात; अन्यतः अशा ठिकाणीं त्या त्या शब्दाच्या सप्तमीचा, व क्वचित् अधिकरणी चतुर्थी विभक्तीचा उपयोग होईल; उदा० 'मी **घरचा** एकटा आहे.' 'हा मनुष्य दोन **दिवसांचा** उपाशी आहे.' 'तो दिवसाचा निजतो व रात्रीचा जागतो.' 'तो उद्याचा माझे घरींच राहील;' इ०.

(१८) कोठें अपादानार्थी या विशेषणाचा उपयोग होतो; उदा० 'तिला त्याच्या **पोटचीं** दोन मुलें आहेत.' 'असें करिशील तर पंतोजीच्या **हातचा** चांगला मार मिळेल.'

७११ कित्येक विशेषणें शब्दापुढें आलीं असतां नामाचें सामान्यरूप होतें, हें मागें सांगितलेंच आहे (पहा, क० १९३). संबंधी विशेषणापुढें कित्येक विशेषणें व क्रियाविशेषणें येऊन या संबंधी विशेषणाचें सामान्यरूप होतें. पुढलीं विशेषणें बहुधा स्थलवाचक असतात; उदा० 'माझ्या येथें आज कीर्तन आहे;' 'हरीच्या तेथें मी आज विष्णुस पाहिलें.' इ० या उदाहरणांत 'येथें' व 'तेथें' यांचा अर्थ 'घरीं' अशा सारखा आहे. तसेंच 'तुझें पुस्तक मीं **हरीच्या** स्वाधीन केलें' यांत 'स्वाधीन' या विशेषणानें किंवा क्रियाविशेषणानें सामान्यरूप झालें आहे. याचा अर्थ 'हरीचें स्व, म्हणजे हरी जो स्वतः त्याच्या आधीन असें तें पुस्तक केलें.' याप्रमाणें 'तो शत्रूच्या हस्तगत झाला' येथेंही सामान्यरूप झालें आहे. कारण 'शत्रूचा' हें 'हस्त' याचें विशेषण आहे, व 'हस्त' हा शब्द सविभक्तिक झाला आहे.

७१२ संबंधी विशेषणाचा क्रियापदाचे कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें उपयोग होतो. उ० 'मला आज मुंबईस जावयाचें आहे.' यांत 'जावयाचें' हा कर्ता. 'मी त्याचें ऐकत नाहीं'(कर्म).

टीप—अशा ठिकाणीं वस्तुतः 'आपयाचें कारण,' 'त्याचें काम किंवा म्हणणें,' अशी रचना असून 'कारण' व 'काम' हे शब्द आध्याहृत घ्यावयाचे. अशा पहिल्या प्रकारच्या नामांस क्रिया-वाचक किंवा विधिवाचक नामें व विशेषणास विधिवाचक विशे-षणें असें म्हणावें.

७१३ स्थलवाचक व कालवाचक शब्दांस 'चा' हा प्रत्यय लागताना सामान्यरूप होतें किंवा होत नाहीं; जसें—वराचा, घरचा; परंतु या दोन शब्दांच्या अर्थात फरक आहे. सामान्यरूप होतें तेव्हां या विशेषणाचें विशेष्य त्या प्रत्यय लागलेल्या शब्दाचा भाग असतें जसें, 'घराचा वांसा;' परंतु जेव्हां सामान्यरूप होत नाहीं, तेव्हां 'तत्संबंधी' असा अर्थ असतो; उदा०—'घरचा मनुष्य—'

७१४ 'चा' बद्दल 'ला' हा प्रत्यय विशेषें करून अव्ययांस लागतो;—जसें='वरला,' 'खालला,' 'मधला,' 'तेथला,' 'येथला,' इ०.

७१५ या विशेषणांचा संबंध दुसऱ्या विशेषणांशीं व क्रियाविशेषणाशीं असतो; उ० 'तो जातीचा शंख व स्वभा-वाचा शांत (विशे.) आहे.' 'घराचे बाहेर बसूं नका.' (क्रियाविशेषण.)

७१६ कित्येक क्रियाविशेषणांचे व शब्दयोगी अव्ययांचे पुढें 'चा, ची, चें,' व 'ला, ली, लें' हे प्रत्यय लागून त्यांचीं विशेषणें बनतात; जसें, आंतचा, आंतला वरचा, वरला, पासूनचा, पर्यंतचा, खालचा इ०. शब्दयोगी अव्ययांस हे प्रत्यय लागले असल्यास या विशेषणांचे योगानें मागील शब्दाचें सामान्यरूप होतें.

(अ) 'इत्यादि,' 'वगैरे,' 'संबंधी,' 'विषयीं,' या व अशासारख्या अव्ययास हा प्रत्यय लागून विशेषणें होतात; प्रत्यय लावण्यापूर्वीं पूर्वशब्दाचे अंत्यस्वरावर अनुस्वार देऊन त्याचें सामान्यरूप करितात; आणि संबंधी, विषयीं, हीं शब्दयोगी अव्ययें असल्यामुळें त्यांचेपासून झालेल विशेषणांचे योगानें पूर्वशब्दाचें सामान्यरूप होतें; उदा० 'वाघ, सिंह वगैरेचें किंवा इत्यादींचें वर्णन;' 'या संबंधींचा, किंवा या विषयींचा विचार.' इ०.

(ब) ला, ली, लें याबद्दल 'ईल' असाही प्रत्यय लागतो; उदा० वरील, खालील, आतील, बाहेरील इ०.

(क) सामान्यतः हे प्रत्यय स्थलवाचक शब्दयोगी व क्रियाविशेषण अव्ययास लागतात. उ० वरचा, खालचा, तेव्हांचा केव्हांचा, कालचा, उद्यांचा, परवांचा, जेव्हांचा, इ०. यांचा उपयोग क्रि. वि. अव्ययासारखाही होतो.



## सर्वनामें.

७१७ प्रथम- व द्वितीयपुरुष सर्वनामें किंवा तो, ती, तें, हीं सर्वनामें असतां त्यांच्या अनेकवचनांचा अर्थ नामांच्या अनेकवचनाच्या अर्थापेक्षां निराळा असतो: आम्ही म्हणजे मी+ दुसरे; तुम्ही म्हणजे तूं+ दुसरे; आणि ते म्हणजे तृतीय पुरुषी अनेक जण, असा अर्थ होतो.

७१८ सर्वनामाचे प्रथमपुरुष, व द्वितीयपुरुष किंवा तृतीयपुरुष वाचक शब्द (एकवचन किंवा अनेकवचन) 'आणि' यानें जोडलेले असतां प्रथम पुरुषी अनेकवचनी सर्वनाम आहे असें मानून क्रियापद असें योजितात; उदा० 'मी आणि तूं (म्हणजे आम्ही) जाऊं

आलों;' 'मी आणि हरी (ह्मणजे आह्मी) काल गेलों होतों;' त्याच प्रमाणें द्वितीय व तृतीयपुरुष असतां द्वितीयपुरुष अनेकवचन योजितात; उदा०—'तूं आणि तो (ह्म० तुह्मी) आलांत;' व प्रथम, द्वितिय व तृतीय अशीं तिन्ही पुरुषीं सर्व नामें एकदम कर्ते असतां प्रथम पुरुष बहुवचन घालितात; उदा०, 'मी, तूं आणि तो (आम्ही) उद्यां जाऊं'—इ०.

७१९ वस्तुतः एक व्यक्ति असतां सर्वनामाचें पुष्कळवेळां अनेकवचन योजितात; यास आदरार्थी अनेकवचन ह्मणतात. (१) बोलणाराचे अंगीं स्वतः थोरपणा नेण्याची योग्यता असतां स्वतःकारितां तो प्रथमपुरुषींही अनेकवचनीं सर्वनामाची योजना करितो; (२) राजे, वर्तमानपत्रकार व ग्रंथकार हे आपले लेखांत स्वतःबद्दल बहुवचन घालतात; (३) द्वितीयपुरुषीं व तृतीयपुरुषींही थोर पुरुषांचे संबंधानें बोलतांना अनेकवचन योजितात.

७२० 'आम्ही' याबद्दल पुष्कळदां 'आपण' असें योजितात. त्याचप्रमाणें आदरार्थी 'आपण' याचा द्वितीयपुरुषीं उपयोग होतो.

७२१ मराठीमध्यें पत्र लिहिण्यांत किंवा मंडळीमध्यें बोलत असतां द्वितिय पुरुषाचे एकवचनाचा उपयोग करीत नाहींत. एकवचनाचा प्रयोग बोलणारापेक्षा खालच्या पायरीच्या मनुष्याबद्दल व केवळ अत्यंत सलगीनें किंवा सासरगीरितीनें बोलतांना होतो. बहुतेक ठिकाणीं द्वितीयपुरुषीं अनेकवचनाचा उपयोग करावा, अशी सभ्यपणाची रीत गणिली आहे.

७२२ ज्यांची एकमेकांवर विशेष ममता असते, किंवा ज्यांचें परस्परांमध्यें संघटन फार असतें, ते पत्रां-तून व समाजामध्यें किंवा मंडळींत परस्परांशीं बोलणें, याशिवाय सर्वत्र द्वि.पु. चें एकवचनच योजितात.

७२३ कधीं कधीं आपल्यापेक्षा कमी प्रतीच्या मनुष्याबद्दलही रागानें किंवा औपरोधिकरीतीनें बोलतांना 'आपण' या सर्वनामा-चा उपयोग करितात; जसें, 'आपण फार शहाणे आहात, आतां तोंड आटपा;' 'पुनः आपली स्वारी येथें आली तर मारच खाईल!' इ०.

७२४ सर्वनामें नामाच्याबद्दल आलीं असतां ज्या नामाबद्दल तीं येतात तें नाम पुढें असतां व त्यास विभक्तिप्रत्यय लागला असतां सर्वनामाचें सामान्यरूप होतें

७२५ प्रथम व द्वितीयपुरुष सर्वनामें वाक्यांत विशेषण-रूपानें योजिलीं असतां विशेष्यास जी विभक्ति लागते तीच त्यास लागते. द्वितीया, तृतीया व चतुर्थी या विभक्ती यास मात्र लागतात. परंतु पंचमी व सप्तमी या विभक्ती असतां सर्वनामाचें फक्त सामान्यरूप होतें; उद० 'मला गरीब ब्राम्हणाला काय!' 'तुम्ही कुणब्यानीं अलीकडे ताळ सोडिला' इ०. परंतु द्वितीया किंवा चतुर्थी विभक्ति असतां अनेकवचनीं सामान्यरूपच फार करितात; विभक्ति प्रत्यय लावण्याचा प्रघात कमी आहे.

टीप—इतर सर्वनाम असतां कोठेंच सामान्यरूपाबद्दल वि-भक्ति घालितात. पण अशाठिकाणीं त्या सर्वनामानें नामाचा विशेष स्पष्टरीतीनें उल्लेख करावयाचा आहे असें दिसून येतें; उदा० 'त्याला भिकाऱ्याला काय, सांपडेल तें खाईल.' इ०. यांत 'त्याला' यानें विशेष व्यक्ति दाखविली आहे.

७२६ संबंधीसर्वनामें जो, जी व जें, हीं वाक्यांत आलीं असतां त्यांच्या जोडीचीं दर्शकसर्वनामें त्यांच्या-

पुढें आलीं पाहिजेत; तसेंच ज्या गौणवाक्यांत 'जो' वगैरे संबंधी सर्वनामें असतात. तीं वाक्यें संयुक्तवाक्यांत आरंभीं घालितात; उदा० 'जो मनुष्य लोकांशीं तोऱ्यानें वागतो, त्याचा सर्व द्वेष करतात.'

७२७ दर्शक किंवा संबंधी सर्वनामें प्रथम किंवा द्वितीय पुरुष सर्वनामांबद्दल घातलीं असतां क्रियापद प्रथम किंवा द्वितीय पुरुषीं घालितात; उदा० 'मी जो आजच येथें आलों, तो मोवतीशिवाय कसा बाहेर पडूं!' 'जो तूं अक्षरसुद्धां शिकला नाहींस, तो पत्र कसें लिहिशील!'

७२८. दर्शक किंवा संबंधी सर्वनाम ज्या नामाबद्दल घातलें असेल, त्याचें लिंगवचन त्यास लागतें. विभक्तीबद्दल असा नियम करितां येत नाहीं. वाक्यांत अर्थ असेल, त्याप्रमाणें नामाची एक विभक्ति व सर्वनामाची निराळीच असें होणें शक्य आहे; उदा० 'जो माणूस तूं आज पाहिला, त्यास बोलाव;' इ०.

७२९ सर्वनाम भिन्न लिंगांच्या पुष्कळ नामांबद्दल घातलें असल्यास त्यांस जवळच्या नामाचें लिंग वचन असतें; उदा०—'विद्यार्थ्यांस फार जरूरीचीं असीं हीं पुस्तकें, कागद, दौत वगैरे;' इ०.

७३०. संबंधीसर्वनाम कित्येक वेळा वाक्यांत गुप्त ठेवितात; व तद्दर्शित पदार्थ निरनिराळे दाखवावयाचे असतां दर्शक व संबंधी सर्वनामांची द्विरुक्तिही करितात; जसें 'माझे जवळ ( जीं, गुप्त आहे )पुस्तकें असतील, तीं मी तुला पाहून देईन.' 'घरांत जो जो पदार्थ होई तो तो आधीं मैनेकडे देत असे;' इ०.

७३१ दर्शक सर्वनामें 'हा' व 'असा' हीं क्रियापदास अनेक कर्ते व कर्में असतां सर्वांचे शेवटीं घालतात; त्याप्रमाणें एकादें वाक्य क्रियापदाचा कर्ता किंवा कर्म असतांना त्यानंतर घालितात. याचीं उदाहरणें मागें दिलीं आहेत.

७३२ एकाद्या पदार्थाचें लक्षण किंवा हकीगत सांगणें असल्यास त्याच्या पुढें 'हा' हें दर्शकसर्वनाम योजितात; उदा० 'राम हा अयोध्येचा राजा होता.' 'लंडन हें इग्लंडचें राजधानीचें शहर आहे' इ०

७३३ वरील प्रकारचीं वाक्यें 'जो' व 'तो' हीं सर्वनामें योजून ही करितात; व त्यावेळीं अर्थ किंचित् भिन्न असतो, किंवा सांगितलेलें लक्षण अधिक स्पष्ट केलें असतें; उदा० 'जो मुलगा काल तुला सांगितला, तो हाच;' 'भाकरी म्हणून जो पिठाचा पदार्थ करितात, तो खाण्यास फार चांगला असतो;' इ०.

७३४ अशा प्रकारें लक्षण किंवा हकीगत सांगतांना ज्या वाक्यांत लक्षण सांगितलें असेल, त्याचे आरंभीं सर्वनाम येईल; व पुढें त्या पदार्थाचें जें वर्णन केलें असेल, त्यांत त्याचें प्रथमवाक्यांतील लिंग फिरविलें असल्यास या सर्वनामाचें लिंग कोणचें असावें, असा प्रश्न उत्पन्न होतो, व मराठींत लिहितांना या संबंधानें फार चुका घडतात. यासंबंधाचा विचार असा आहे, कीं हें सर्वनाम बोलणारा उच्चारीपर्यंत त्यास पुढील लक्षणादि सांगितले वाक्यांतल्या पदार्थाचें लिंग ठाऊक नसतें; म्हणून हें सर्वनाम योजणें तें मागें ज्या लिंगाचा उपयोग केला असेल, त्या लिंगाचें योजावें. उदा० 'पृथ्वीवर पहिला ग्रंथ प्रगट झाला, ती ऋग्वेदसंहिता होय;' या वाक्यांत 'ती' बद्दल 'तो' पाहिजे. कारण बोलणारा 'ती' या सर्वनामाचा उपयोग करीत असतां त्याचे मनांत 'ग्रंथ' हा शब्द होता, 'संहिता' हा शब्द नव्हता. तसेंच, 'मीं काल जो प्राणी

पाहिला, तें मांजर होतें,' असें न म्हणता 'तो (प्राणी) मांजर होतें.' असें पाहिजे.

७३५ अशा ठिकाणीं दुसऱ्या वाक्यांतील क्रियापद कसें असावें, असाही एक प्रश्न उत्पन्न होईल.—'तो (प्राणि) मांजर होतें' या वाक्यांत वस्तुतः क्रियापदाचा कर्ता 'तो' असून 'मांजर' हा शब्द गौण आहे. म्हणून येथें क्रियपदाचें रूप 'होता' असें करावें हें प्रशस्त होय. परंतु येथें 'मांजर' हा शब्द कर्ता मानून 'होतें' असेंही क्रियापदाचें रूप करण्याचा प्रघात आहे. याचें कारण अर्थात् पहिल्या वाक्यांतील उद्देश्य पद दुसरे वाक्यांत प्रधान शब्द आहे असें आपण समजत नाहीं, हें होय. या संबंधानें एकच व्याकरणशुद्ध पद्धत चालू राहील तर बरें.

७३६ 'असा' यापासून जातीचा किंवा प्रकाराचा बोध होतो; प्रश्नार्थक 'कसा' व दुसरें दर्शकसर्वनाम 'तसा' हींही जाती किंवा प्रकार दाखवितात. 'हा' व 'तो' यांपासून फक्त जवळच्या किंवा दूरच्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा बोध होतो.

७३७ 'कोण' यापासून मुख्यतः व्यक्तीचा किंवा व्यक्तीकरितां घातलेल्या नामाचा व उच्च प्राणिवर्गाचा बोध होतो; व 'काय' ह्यापासून निर्जीव पदार्थाचा किंवा हलक्या प्राणिवाचक नामांचा बोध होतो. 'काय' याचा उपयोग तुच्छपणा किंवा चमत्कार दाखवावयाचा असतां व्यक्तिदर्शक नामांकरितांही करितात.

उदाहरणें:—'तो कोण मनुष्य आहे!' 'तें काय तेथें पडलें आहे!' 'तें कोण जनावर आहे?' काय (किती, केवढा) मूर्ख मनुष्य आहेस रे तूं!'

'कोण आता राज्यस्वीकार करील, आधि ज्यामाजी!'
'ऐसा कोण प्राणी ज्यातें न करील वश हरी नखरें!'

'हा काय रत्नमोत्का! माझ्ं अनुताप पावुनी हाका!' [तुच्छपणा]

'काय रुचिर, काय सुचिर, जाणों हे पिंड काय तेजाचे!'

मोरो.

७३८ 'कोण' व 'काय' यांचीं रूपें तिन्ही लिंगीं सारखींच आहेत. 'कोण' याचा व्यक्तीकडे उपयोग केला असता व्यक्ती कोण हें ठाऊक नसल्यास त्याचा नपुंसकलिंगी उपयोग करितात; उदा० 'कोण तें!' 'तें तिकडे कोण आहे!' इ०.

७३९ 'कोणता,' किं० 'कोणचा' याचा उपयोग 'पुष्कळांपैकीं एक कोण!' असा प्रश्न विचारित असतां करितात; उदा० 'कोणता किं० कोणचा आंगरखा तुला आवडतो!'

७४० 'काय' हें सर्वनाम संबंधीसर्वनामाबद्दल घालतात; असें. 'काय (जें) देईल तें घे.' नमस्कार किंवा वैचित्र्य दाखविण्यांत याचा उपयोग होतो; जसें 'काय हें धैर्य!' 'त्याच्या कृतीविषयीं काय काय म्हणून सांगूं!' इ०.

७४१ 'कोण,' 'कोणीएक,' 'कोण-ता-चा,' 'कांहीं,' 'कांहींएक,' 'कांहींतरी,' यापासून अनिश्चित वस्तूंचा बोध होतो.

७४२ 'कांहीं' यापासून थोडें किंवा नियमित भाग, असाही बोध होतो; उदा० 'कांहीं लोक असें म्हणतात;' 'कांहीं अंबे रामास दे;'

'बर्वी कांहीं कांहीं (थोडे थोडे) 'हरि,' 'कवि,' असे शब्द शिकलों;'

वामन.



## क्रियापद.

७४३ क्रियापद शब्दाचा अर्थ जरी कोणचेंही धातूचें रूप असा आहे, तरी व्याकरणांत धातूचे कालदर्शक रूपांसच क्रियापदें असें ह्मणतात; बाकीच्यांस कृदंतें किंवा धातुसाधितें असें ह्मणतात.

७४४ या धातुसाधितांचा क्रियापदांप्रमाणें उपयोग करितात; उदा० 'तो आज मुंबईस जाणार;'

> 'तों नंदनंदनाशीं **बोलत**, मधुरशी वाचा करुणानाथ ।
> तोंचि तत्क्षणीं आमुचा प्राणनाथ येईल आम्हां निश्चयें.' ॥
>
> श्रीधर.

वरील वाक्यांत क्रियापदाचे ठिकाणीं घातलेल्या कृदन्तापुढें 'अस' धातूचें क्रियापद गुप्त आहे.

७४५ मराठींत शुद्ध धातु फार थोडे आहेत. पुष्कळ धातु नामादिकांस प्रत्यय लागून झाले आहेत, किंवा नामांसच धातु मानिलें आहे. याचीं उदाहरणें मागें दिलीं आहेत. याशिवाय मराठींत क्रियापदें बनविण्याचा दुसरा एक प्रकार आहे. तो असा कीं प्रथमतः एखादें नाम किंवा नामाचें सांबंधिक रूप, अथवा धातुसाधित अव्यय, नाम किंवा विशेषण घालून पुढें क्रियापद घालावें. पुढें जीं क्रियापदें घालितात, तीं कांहीं नियमित संख्येचीं आहेत. आणि अशा रीतीनें केलेल्या संयुक्त शब्दांस क्रियापदाचा अर्थ येतो. या क्रियापदांस **संयुक्त-क्रियापदें** असें ह्मणावें.

७४६ हीं संयुक्त-क्रियापदें दोन प्रकारचीं आहेत. हें मागें सांगितलेंच आहे; तीं अशीः—( अ ) एक सविभक्तिक नामांच्या साह्यानें होणारीं; जसें, 'युद्ध करणें,' 'पारख करणें 'गोंधळ घालणें,' 'अंगांत येणें,' 'डोकीत

घालणें,' 'रागें भरणें,' 'सिद्धीस नेणें,' इ०.

(आ) दुसरीं संयुक्तक्रियापदें धातुसाधितांच्या किंवा कृदंतांच्या साह्यानें होतात, तीं अशीं;—'मारिला गेला,' 'करून टाकणें,' 'बोलून घेणें,' 'करूं जाणें,' 'करितां येणें,' इ०.

७४७ नामांच्या रूपांशीं संयोग पावून ज्यांचेवरून हीं संयुक्त क्रियापदें होतात, त्यांतले मुख्य धातू हे आहेत:—

| | | | |
|---|---|---|---|
| करणें | टाकणें | बसणें | येणें |
| खाणें | देणें | वाळगणें | लागणें |
| घालणें | धरणें | मांडणें | लावणें |
| घेणें | फोडणें | मारणें | इ० |

टीप.—हे धातू मुख्य येथें सांगितले; यावरूनच याच्या अर्थांचे धातूही घेतले पाहिजेत.

७४८ मूळ क्रियापद सकर्मक असल्यास तें क्रियापद ज्या नामाशीं मिळून संयुक्तक्रियापद होतें, तें नाम त्याचें कर्म असतें. व कर्मणिप्रयोगांत क्रियापद त्याच्याशीं जुळतें. जसें, 'तो झोंप घेतो,' 'चोरानें मार खाल्ला;' इ०.

(अ) परंतु संयोग पावणारें नाम जर सविभक्तिक असलें, तर एकत्र संयुक्तक्रियापदाचें तिसरेंच नाम अर्थाप्रमाणें कर्म होतें; जसें, 'त्यानें आंगरखा आंगांत घातला,' 'पायांत जोडा घाल,' इ०. अथवा केव्हां कर्मासह संयुक्तक्रियापद जसें काय अकर्मकच बनतें, व सर्व संयुक्तक्रियार्थाचें जें नाम कर्म असावयाचें, त्याची नियमित विभक्ति होते. जसें, 'आपण या गोष्टीचा विचार करूं,' 'त्यानें मला भय घातलें;' इ०.

टीप—या संयुक्तक्रियापदांस यांच्याशीं संयोग पावणाऱ्या नामांच्या वगैरे रूपांमुद्धां क्रियापदें मानावें, असें कित्येक म्हणतात. परंतु मराठींत त्यांचा भरणा इतका आहे व त्यांवरून निरनिराळे अर्थही इतके उत्पन्न होतात कीं त्यांची मर्यादा करणें फार कठीण आहे. आणखी पुनः संयुक्तक्रियापदें इतकीं मानिलीं, तर संयुक्तकाळ इतके होतील कीं त्यांना नावें मुद्धां देण्याची पंचाईत पडेल. म्हणून मुळचीं क्रियापदें तेवढीं मात्र 'क्रियापदें' मानून नामादिकांच्या रूपांस निराळीं नामें व त्यांच्या विभक्तींचीं रूपें असें मानणें हेंच रास्त आहे.

यांस संयुक्तक्रियापदें मानावीं, असें म्हणतात यांचें दुसरें कारण असें आहे कीं, बहुधा या सर्व संयुक्तक्रियापदांस इंग्रजींत एकेकच क्रियापद असतें. परंतु इंग्रजीशीं जुळण्यासाठीं मराठींत अशी रीत घातली तर घोटाळा होईल, व असंख्य संयुक्तक्रियापदें मानावीं लागतील. शेवटीं असाही प्रश्न उत्पन्न होईल कीं, क्रियापद व कर्म या दोहोंस मिळून नेहमींच संयुक्त क्रियापद कां म्हणूं नये, किंवा अशा क्रियापदांपैकीं कितीकांस संयुक्त म्हणावें, व कितीकांस म्हणूं नये? व 'यत्न करणें' (to try), 'श्रवण करणें' (to hear)' यांना जर संयुक्त क्रियापदें मानावयाचें, तर मग 'काम करणें,' 'पुस्तक वाचणें,' यांनाही संयुक्तक्रियापदें कां न मानावें! तेव्हां ह्या पद्धतीनें सर्वत्र घोटाळा होण्याचा संभव आहे, ती न स्वीकारतां प्रस्तुत पुस्तकांत सोपी व साधी व्यवस्था केली आहे.

७४९ कृदंतांचे साह्यानें जीं संयुक्तक्रियापदें बनतात, त्यांचे अर्थांवरून पुढें लिहिल्याप्रमाणें भेद करितां येतीलः—१ शक्यार्थबोधक किंवा शक्त्यर्थक; २ कर्मणि; ३ प्रकर्षदर्शक; ४ सातत्यदर्शक; ५ इच्छादर्शक; ६ आज्ञार्थक; ७ उपक्रमदर्शक; ८ अनुमोदक; आणि ९ कर्तव्यबोधक.

(१) शक्यार्थबोधक किंवा शक्त्यर्थक संयुक्तक्रियापदें—हीं मुख्यत: 'शकणें,' व 'येणें,' या क्रियापदांपासून होतात. 'शकणें' धातु असतां त्याचे मागें 'ऊं'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय येतें. व 'ये' धातु असतां 'तां'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय किंवा विध्यर्थक धातुसाधित विशेषणाची चतुर्थी येते; जसें, 'मी करूं शकतों,' 'तो आज येऊं शकत नाहीं,' 'मला बोलावयास किंवा बोलतां येत नाहीं,' इ.

(२) कर्मणिसंयुक्तक्रियापदें—हीं 'जा'धातूचे रूपांमागें 'ला'-प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें घालून करितात. हीं विशेषणें कर्मणि असल्यामुळें असलीं संयुक्तक्रियापदें फक्त सकर्मक धातूंवरूनच होतात. उदा०—'शिपायाकडून चोर धरिला गेला,' 'सरते शेवटीं तो पकडला गेला,' इ०.

टीप—हीं रूपें जुन्या मराठींत आढळत नाहींत, व फारशी आणि इंग्रजी भाषेंतील कर्मणिप्रयोगांवरून तीं मराठींत आलीं आहेत, अशी साधारणत: समजूत आहे. मोरोपंताच्या कवितेंत एकठिकाणीं याचें उदाहरण सांपडलें आहे:—

'तों भगवान् कृष्ण म्हणे, रे रे पार्था, पहा पहा, गा तो
सिंह गजसा पार्षद गुरुपुत्रें शीघ्र मारिला जातो ।'

भारत, कर्णपर्व, ३६–३८.

(३) प्रकर्षदर्शक—हीं क्रियापदें 'ऊन'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययापुढें विशेषत: खालच्या धातूंचीं रूपें योजून करितात; ते धातू—घेणें, चुकणें, जाणें, टाकणें, ठेवणें, देणें, बसणें, येणे, राहणे, सोडणें इ०. यांपासून क्रिया होऊन गेली आहे किंवा तिचा परिणाम

चुकला आहे, किंवा जें कार्य होणें त्याचा प्रकर्ष झाला आहे, असा बोध होतो. उ०–'मी जेवून घेतों, तों तुम्ही पत्र लिहा;' 'तळ्यांतलें पाणी आटून गेलें;' 'मी त्याचें कर्ज वारून टाकिलें;' 'मीं त्यास पांच रुपये देऊन टेविले आहेत;' 'तो आपली धनदौलत खर्चून बसला;' 'त्यानें अगदीं बोलबोलून सोडिलें;' 'मी राग गिळून बसलों;' 'एवढे पांच श्लोक वाचून ठेवा किं० वाचून या;' इ०.

(४) सातत्यदर्शक—हीं संयुक्तक्रियापदें वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें जीं 'बोलत,' 'बसत,' 'लिहीत;' 'करीत' इत्यादि. त्यांचे पुढें 'जाणें' 'बसणें' आणि 'राहणें' या धातूंचीं रूपें येऊन सिद्ध होतात. यांपासून क्रिया बराच वेळ चालू असल्याचा बोध होतो. उदा० 'रोज पाहांटेस उठत जा;' 'आमचेकडे येत जा;' 'तो चार तास गप्पा मारित बसला;' 'रामा नुस्ता पाहात राहिला,' इ०.

(५) इच्छादर्शक—'ऊं'-प्रत्ययान्त धातुसाधितापुढें किंवा विध्यर्थक विशेषणाच्या चतुर्थीचे रूपापुढें 'पाहिजे' हें रूप येऊन किंवा 'इच्छिणें' या धातूचीं रूपें येऊन हीं क्रियापदें होतात. जसें, 'तो तुम्हांशीं बोलूं पाहतो, किंवा इच्छितो;'

'घालूं पाहसि देश उपटाया अहिमुखांत आंगोळी.'
'पहासि विकाया तूं कस्तर मौन्यं कसें हारिद्रें.'

मोरो०.

(६) आज्ञार्थक—हीं 'ला'-प्रत्ययान्त कृदंतापुढें 'पाहिजे' हें क्रियापद घालून करितात. हीं क्रियापदें असतां नेहमीं भावप्रयोग असतो, व कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें; उदा० 'तुला

गेलें पाहिजे.' 'रामाला आज हें पुस्तक वाचिलें पाहिजे.

[अ] या क्रियापदांचीं दुसरीं रूपें विध्यर्थक विशेषणापुढें 'लाग'धातूचीं रूपें येऊन होतात. हीं रूपें ही भावीच असतात व त्यांचें कर्तृपद चतुर्थ्यंत असतें. उदा० 'तुला जावें लागेल, 'मला आज सभेंत बोलावें लागलें;' इ०.

[आ] या ठिकाणीं सहाय धातूच्या रूपांच्या मागें असलेलीं रूपें धातु सकर्मक असल्यास कर्माचीं विशेषणें होत; व धातु अकर्मक असल्यास तीं क्रियावाचक नामें आहेत; उदा०— 'तुला पुस्तक **दिलें** पाहिजे किं० **द्यावें** लागेल,' येथें तीं क्रियारूपें विशेषणें असून विशेष्याप्रमाणें त्यांचें रूप ही बदलेल. येथें मुख्य क्रियापदाचा कर्ता 'पुस्तक'हा शब्द आहे. परंतु 'मला **गेलें** पाहिजे किंवा **जावें** लागेल,' येथें हे शब्द क्रियावाचक नामें असून 'पाहिजे' याचे कर्ते होत.

(७) उपक्रमदर्शक संयुक्तक्रियापदें 'ऊं' प्रत्ययान्त धातुसाधितापुढें किंवा विध्यर्थक विशेषणाचे चतुर्थीपुढें 'लाग' धातूचीं रूपें घालून करितात. यांपासून आरंभ होण्याचा बोध होतो. उदा० 'तो बोलूं लागला;' 'मला मळमळायास किंवा मळमळूं लागलें;' इ०.

(८) अनुमोदक संयुक्तक्रियापदें—हीं 'ऊं'-प्रत्ययान्त धातुसाधितापुढें किंवा विध्यर्थक चतुर्थीपुढें 'दे' धातूचीं रूपें घालून करितात. उदा० 'तो मला बोलावयास किंवा बोलूं देत नाहीं.' 'मी तुला मुळींच येऊं देणार नाहीं.'

(९) कर्तव्यबोधक—हीं क्रियापदें होतांना धातुसाधित नाम जें 'करणें' किंवा त्याचें विध्यर्थक विशेषण 'करावें' याची चतुर्थी होऊन किंवा त्याच्या संबंधी विशेष-

णाचें सामान्यरूप होऊन त्याचे पुढें 'पड' धातूचीं रूपें ये-तात; जसें, 'मला उगाच तुजकडे खेपा घालाव्यास किं॰ घालावयाच्या किंवा घालण्यास पडल्या.' ही रूपें व कलम (६) यांतील रूपें सारखींच आहेत असें म्हण-ण्यास चिंता नाहीं.

टीप—नामांच्या रूपांनीं झालेल्या संयुक्तक्रियापदांप्र-माणेंच या कृदन्तांच्या रूपांनीं झालेल्या संयुक्तक्रियापदांसही अर्था पुरतीं संयुक्त क्रियापदें मानावीं. व्याकरण करितांना सर्व रूपांस संयुक्तक्रियापदें मानण्याची रीत घातल्यास कांहींच म-र्यादाकरितां येणार नाहीं, व संयुक्तक्रियापदें आणि काळ यांची संख्या अनियमित रीतीनें वाढेल. यासाठीं कृदन्तांचे रूपांस त्यांचे अर्थाप्रमाणें क्रियावाचक नामें, धातुसाधित नामें, विशेषणें किंवा अव्ययें मानावें.

नामें, विशेषणें किंवा अव्ययें कोणचीं मानावीं, हें अर्थावरून सहज कळणार आहे, यासाठीं जास्त विस्तार करीत नाहीं. या प्रकारचीं कित्येक संयुक्तक्रियापदांनीं युक्त अशीं वाक्यें घेऊन पुढें 'व्याकरण चालविणें' या प्रकरणांत चालवून दाखविलीं आहेत.

कृदन्तांस शुद्ध क्रियापदें म्हणूं नये असें म्हटलें; परंतु त्यांत मुख्य क्रियार्थ असतो; यामुळें वाक्यांत त्यांस **विधेय** असें म्ह-णावें लागेल. विधेयपद नेहमीं क्रियापदच असलें पाहिजे असा नियम नाहीं. 'अस' धातु असतां शुद्ध विशेषण सुद्धां **विधेय** असूं शकेल. याकरितां वाक्यपृथक्करण-प्रसंगीं जरी या कृदन्तां-स क्रियापदांबरोबर घ्यावें लागलें, तरी व्याकरण चालवितांना त्यांस निराळीं विशेषणादि मानण्यास चिंता नाहीं.

मागें जे संयुक्तकाळ सांगितले आहेत, तेही संयुक्तक्रियाप-देंच होत. त्यांचे रचनेच्या व अर्थाच्या संबंधानें योग्य ठिकाणीं विचार केलाच आहे. हे जे संयुक्तकाळ सांगितले आहेत,

त्याचे शिवाय बाकीच्या संयुक्तक्रियापदातील मुख्य क्रियापदास मात्र शुद्ध क्रियापद मानून त्याचे अवयवास अर्थाप्रमाणें विशेषणादि मानावें.



## प्रयोज्य व शक्य क्रियापदें.

७५० प्रयोजक साधितधातु नेहमीं सकर्मक असतात. अकर्मक धातूस विकार होऊन प्रयोज्य धातु झाला असता मूळ धातूचा कर्ता प्रयोजक साधितधातूचें कर्म होतो; जसें, 'फळें पडतात,' 'वारा फळें पाडितो;' 'भाजी शिजते,' 'आचारी भाजी शिजवितो;' इ०.

७५१ मूळ धातु सकर्मक असल्यास त्याचें जें कर्म तेंच प्रयोजक धातूचें कर्म असतें; परंतु मूळचा जो कर्ता असतो, त्याचे पुढें 'कडून' हे शब्दयोगीअव्यय लागतें; व क्रिया करविणारा तो कर्ता होतो; उदा० 'विद्यार्थी पुस्तक वाचितो;' 'गुरू विद्यार्थ्याकडून पुस्तक वाचवितो;' इ०.

७५२ शक्य क्रियापदें हीं प्रयोजक क्रियापदांचींच कर्मणि व भावी रूपें होत. मूळ धातु सकर्मक असल्यास शक्यक्रियापद कर्मणि असतें; व धातु अकर्मक असल्यास तें भावी असतें; जसें, 'तें काम मला करवतें,' 'मला जाववतें,' इ०.

७५३ शक्यक्रियापद असतां क्रियेचें जें मूळचें कर्तृपद त्याचें संबधी विशेषण होऊन त्याची तृतीया होते, किंवा तें चतुर्थ्यंत असतें. उदा० 'माझ्यानें किंवा मला कामकरवतें,' 'रामाच्यानें तेथें जाववते,' इ०.

७९४ कर्मणि व भावीप्रयोग असतां क्रियापद भूतकाळींच असतें, असा नियम मागें सांगितला आहे. परंतु शक्यक्रियापदांचा कर्मणि किंवा भावी प्रयोग तिन्हीं काळीं होतो; उदा० 'रामाला काम करवतें,' 'रामाला काम करवलें, करवेल' इ०( कर्मणि ); 'रामाच्यानें जाववतें, जाववेल' इ० (भावी).

७९५ शक्य क्रियापदें कर्मणि असल्यामुळें चालू भाषेंतील इतर कर्मणि क्रियापदांप्रमाणें तीं सर्वकाळ तृतीयपुरुषी असतात, परंतु प्रथमपुरुषवाचक किंवा द्वितीयपुरुषवाचक सर्वनामें कर्म असतां त्या कर्मवाचक पदापुढें द्वितीयेचे प्रत्यय लागतात; व कर्तृपदाचीं संबंधी विशेषणें होऊन त्यास तृतीया विभक्ती लागून क्रियापदें सकर्मक असतांही भावी होतात; उदा० 'माझ्यानें किंवा मला ( कर्तृ० ) तुला ( कर्म ) आवरवतें;' 'तिच्यानें किंवा तिला मला धरवत नाहीं;' इ०.

७९६ शक्य क्रियापदांचा प्रयोग सचेतन कर्ता असतां मात्र होतो; अचेतन पदार्थ कर्म असतां या क्रियापदांचा उपयोग करणें अशक्य आहे. उदा० 'बेडकास पुष्कळ वेळ पाण्यांत राहवतें,' 'मृगास जलाच्या वाळूच्या पायांनें चालवतें,' असे प्रयोग कर्ता सचेतन, असल्यामुळें होतील; परंतु 'लांकडास पाण्यांत तरंगवतें;' 'पतंगास हवेंत उडवतें,' असे प्रयोग होणार नाहींत.

७९७ कधीं कधीं शक्य क्रियापदांचा उपयोग करण्याचे जागीं फक्त तद्वेतक अकर्मक धातूंचा प्रयोग करितात; उदा० 'माझ्यानें ह० मला हा घोडा हालवतो,' अशा उपयोगाच्या ठिकाणीं 'माझ्यानें

अ० मला हा धोंडा हालतो,' 'त्याला तें ओझें उचलत नाहीं,' असे प्रयोग करितात.

७०८ कधीं कधीं सकर्मक धातूंसही अकर्मक करून अशा रीतीचे प्रयोग करितात; उदा० 'त्यास ही अक्षरें वाचत नाहींत, पण मला वाचतात;' 'दूरचा मनुष्य मला ओळखत नाहीं, तुला ओळखतो,' इ०.

७०९ शक्य क्रियापद असतां कधीं कधीं कवितेंत शुद्ध तृतीयान्त ही कर्तृपद घालितात; किंवा संबंधी विशेषणाचे सामान्यरूपापुढें तृतीयान्त विशेष्य योजितात, उदा०—

'आम्हीं शक्तिहीनें केसें करवेल तें नेणें'।

'आपुलीया बळें नाहीं बोलवत। सखा भगवंत वाचा त्याची'। तुका०

---

## काळ व त्यांचे उपयोग.

७१० शुद्ध वर्तमानकाळ—या काळापासून चालू क्रियेचा बोध होतो; जसें, 'तो आहे,' 'रामा वाचितो,' इ०.

(अ) यापासून क्रियेचा आतां आरंभ होणार असाही बोध होतो; जसें, 'चल, मी तुला एक गोष्ट सांगतों.'

(ब) या काळापासून साधारणतः रीतीचा किंवा संवयीचा बोध होतो; जसें, 'दुधांत साखर घातली असतां त्यास रुचि येते;' 'तो उजाडत स्नान करितो.''

(क) गोष्ट खचित घडेल, असा बोलणारास भरवसा असतां वर्तमानकाळाचा उपयोग करितात; उदा० 'मी उद्यां त्यापासून आपलें सर्व द्रव्य घेतों.'

(ड) इतिहासांतील गोष्ट सांगत असतां किंवा

ग्रंथकाराचे लेखांतलें अवतरण करावयाचें असतां वर्तमानकाळ योजितात; जसें, 'भोजराजा ह्मणतो–' 'तो त्याच्या बापाजवळ जाऊन सांगतो–' 'तुका ह्मणे–' इ०.

(इ) कवितेंतील वर्तमानकाळाचा उपयोग कसा करितात, हें मागें सांगितलेंच आहे.

७६१ अपूर्णवर्तमानकाळ—(अ) यापासून साधारणतः क्रिया चालू आहे असा बोध होतो. उदा० 'मी त्याची वाट पहात आहें.' (ब) यापासून क्रिया फार दिवस चालू आहे असाही बोध होतो; उदा० 'पृथ्वी सूर्याभोंवती फिरत आहे.' 'मी करितों आहें.' इ० (क) यापासून क्रिया एकसारखी फार दिवस चालू आहे, अजून संपली नाहीं, असाही बोध होतो; उदा ' त्याला हींवताप येत असतो;' 'तो घोड्यावर बसावयास शिकत आहे; इ०.

७६२ रीतिवर्तमान—यापासून कर्त्याची तसें करण्याची रीत किंवा संवय आहे असा बोध होतो; उदा० 'मी रोज सात वाजतां स्नान करीत असतों.'

७६३ पूर्णवर्तमान—या काळापासून आणखी असा बोध होतो कीं, क्रिया होऊन गेली, परंतु तिचा परिणाम अद्यापि कायम आहे. उदा० 'तो बरा झाला आहे.' क्वचित् याचा उपयोग पूर्ण भूतकाळाबद्दलही करितात; जसें, मी चाललों आहें [होतों] इतक्यांत तो वरीं आला.'

७६४ शुद्धभूतकाळ—यापासून होऊन गेलेल्या काळांत घडलेल्या गोष्टीचा बोध होतो; उदा० 'तो काल गेला.' संकेतार्थ असतां पाहिले वाक्यांत हा काळ

असता तर संभवाचा बोध होतो; उदा० 'तो आला तर मी जाईन.' भविष्यकाळीं निश्चयानें होणाऱ्या गोष्टीचा बोध भूतकाळापासून होतो; जसें, 'मी हा आलोच पहा.' नम्रतेनें कांहीं इच्छा दर्शविणें असल्यास वर्तमानकाळाबद्दल हा काळ योजितात; जसें, 'मला थोडी साखर पाहिजे होती.'

७१९ अपूर्णभूत—यापासून क्रिया घडत होती, परंतु पूर्ण झाली नव्हती असा बोध होतो; उदा० 'तो बोलत होता.' तसें कोणी करणार होता परंतु उद्देश सिद्धीस गेला नाहीं, अशा अर्थीही याचा उपयोग करितात; उदा० 'रामा त्यास रुपये देत होता, परंतु मी तो लबाड आहे असें सांगितलें.

७१९ रीतिभूत—यापासून गतकाळांतील रीतीचा किंवा संवयीचा बोध होतो. उदा० 'तो रोज पर्वतीस जाई, कि० जात असे.'

(अ) या काळाचे रूपांपुढे 'ना' हें अव्यय घातलें असतां क्रिया करणाराची खुषी किंवा ती होण्याची अवश्यकता दिसून येते; जसें, 'तो जाईना,' 'मला लिहितां येईना' इ०.

टीप—असा उपयोग असतां क्रियापदाचे व्यंजनादि प्रत्यय क्वचित् 'ना' या निषेधार्थक अव्ययाचे पुढें घालण्याची चाल आहे; जसें, 'ते लिहीत ना, किंवा लिहीना-त;' ते बोलत-ना, किं. बोलु(ले)-ना-त;' 'तूं करी-स-ना किं. करी ना-स' इ०. या क्रियापदाचे रूपांस रीतिभूतकाळाचीं रूपें म्हणावीं, किंवा कवितेंतल्या वर्तमानकाळाचीं रूपें (कलम ३४४) म्हणावीं ही शंका येण्यासारखी आहे. परंतु हीं अर्थदृष्ट्या मूळचीं रीतिभूत काळाचीं रूपें असून सादृश्यामुळे कवितेतल्या वर्तमानकाळाचा उपयोग त्याबरोबरच होऊं लागला आहे, असें दिसतें.

(ब) गौणवाक्यांत याचा उपयोग केला असतां प्रधान-वाक्यांतील क्रियार्थाच्या परिणामाचा बोध होतो; असें, 'माझी प्रकृति पुनः पहिल्यासारखी होईल असें औषध द्या.' 'त्याचें मनास वाईट न वाटे असा बोध मीं त्यास केला.'

७६७ **पूर्णभूत**—एका घडलेल्या क्रियेपूर्वीं दुसरी क्रिया झाली आहे, असा या काळाचा अर्थ होतो; उदा० 'रामानें हें पुस्तक वाचिलें होतें;' 'तो काल पुण्यास गेला होता;' या वाक्यांत पुण्यास जाण्याची क्रिया संपून तो आतां पुण्याशिवाय दुसरें कोठें आहे, असा बोध होतो. नम्रता दर्शवितांना या काळानें पूर्णवर्तमानकाळाचाही बोध होतो; उदा० 'मी तुम्हांजवळ कांहीं रक्कम उसनी मागण्यास आलों होतों.' म्हणजे 'आलों आहें;' इ०.

७६८ **शुद्धभविष्य**—यानें पुढें होणाऱ्या क्रियेचा बोध होतो; उ० 'मी तुला तें पुस्तक उद्यां देईन;' इ०. प्रश्नार्थक वाक्यांत हा काळ आला असतां तसें होण्याची अशक्यता बोधित होते; उदा० 'मी कां पळेन!' 'तो उगाच तेथें कशाला जाईल!' इ०.

(अ) प्रश्न असतांना याप्रमाणें शक्यतेचा बोध होतो. असें, 'तो तेथें कसा जाईल!' 'मी कसें करूं!' इ०.

(ब) संकेत असतां पहिल्या वाक्यांत हा काळ असल्यास विनंति, कल्पना, किंवा पुढील वाक्यांतील अर्थाचे संबंधानें बोलणाराचा निष्काळजीपणा दिसून येतो; असें, 'मला पांच रुपये उसनें द्याल तर पहा.' 'मी तेथें गेलों तर तें होऊं देणार नाहीं.' 'आवडेल तर या;' म्हणजे या, किंवा नका जाऊं. मला पर्वा नाहीं; इ०.

(क) याचा पुष्कळदां वर्तमानकाळाबद्दल उपयोग होतो; उदा० 'तुला वाटेल तर जा.' 'भूक लागेल तर जेव,' इ०.

(इ) आज्ञार्थी विषय आदरपूर्वक काहीं सांगावयाचें असतां किंवा आज्ञा करावयाची असतां हा काळ योजितात; उदा० 'आपण एवढें वाचून पहाल काय!'

७६९ अपूर्णभविष्य—ह्या काळापासून भविष्यकाळीं होणारी क्रिया त्यावेळीं संपली नसेल, असा बोध होतो; उदा० 'तो तेव्हां वाचीत असेल,' 'मी तुमची वाट पहात राहीन.'

टीप—वाचीत, करीत, इत्यादि अपूर्णतादर्शक धातुसाधितें व 'अस' धातूचें मुख्य क्रियापद यांचेमध्यें केव्हां केव्हां बसला इ० भूतकालवाचक अव्ययें येऊन या काळाचा बोध होतो. परंतु अशा ठिकाणीं 'बसला' वगैरे यांस विशेषणें मानावें, व 'असेल' एवढेंच क्रियापद समजावें; उदा०'तो वाचीत बसला असेल,' 'तो बोलत बसला असेल,' इ०. येथें 'वाचीत,' 'बोलत' हीं अव्ययें होत. किंवा 'वाचीत' एवढें अव्यय मानून 'बसला असेल' हा 'पूर्णभविष्य' काळ मानिला, तरी चालेल.

(अ) या काळापासून अजमास, अटकळ, संशय, अनिश्चितपणा वगैरे यांचाही बोध होतो; उदा० 'कोंकणांत हा पाऊस पडत असेल;' 'एव्हां माझा भाऊ माझी वाट पाहत बसला असेल;' इ०.'

७७० पूर्णभविष्य—यापासून विवक्षितकाळीं क्रिया झालेली असेल असा बोध होतो; उदा० 'तो आतां जेवला असेल;'

(अ) वर अटकळ वगैरे अपूर्ण भविष्याचे जे अर्थ सांगितले, ते याकाळीं ही संभवतात; उदा० 'कोंकणांत हा पाऊस पडला असेल;' 'तो असें बोलला असेल;' इ०



## आज्ञार्थ व विध्यर्थ.

७७१ प्रथमपुरुषीं आज्ञार्थाचा उपयोग प्रश्न करण्याकडे करितात; जसें, 'मी आज मुंबईस जाऊं?' किंवा यांपासून संमति किंवा परवानगी यांचा बोध होतो; उदा० 'चला आपण माडीवर जाऊं,' इ०.

(अ) द्वितीयपुरुषीं यापासून आज्ञा किंवा हुकूम यांचा बोध होतो; उदा० 'तूं आपलें काम कर.'

(ब) तृतीयपुरुषीं यापासून आशीर्वादाचा किंवा शापाचा बोध होतो; उदा० 'ईश्वर तुमचें कल्याण करो'! 'मरो तो एकदांचा;' 'आग लागो त्या तोंडाला;' इ०.

७७२ विध्यर्थ हा आज्ञार्थाचा कर्मणि किंवा भावीप्रयोग आहे; जसें, 'तूं काम कर,' 'त्वां हें काम करावें;' 'रामा, घरीं जा,' 'रामानें घरीं जावें;' इ०.

(अ) विध्यर्थापासून सभ्यरीतीचा किंवा नम्रतेचा आज्ञार्थ बोधित होतो; उदा० 'तुम्हीं आपल्या प्रकृतीस थोडें जपावें;' 'आतां आपण तोंड आटोपावें,' इ०.

(ब) यापासून धर्म, शक्यता, योग्यता, अटकळ, मागील आठवण, इत्यादिकांचा बोध होतो; उदा० 'रावसाहेबांना लागलीच दया यावी;' 'दोन आण्यांस इतके अंडे यावे;' 'राजानें रथांत बसावें;' 'आज पाऊस पडावा;' 'त्यानें नित्य प्रहर प्रहर रडावें' इ०.

(क) 'करणें' या धातुसाधित नामाबद्दल या काळाचा उपयोग करितात. परंतु त्यावेळीं पुढें 'हें' किंवा 'असें' हें सर्वनाम येतें; जसें, 'तुम्हीं असें करावें हें (करणें) मला आवडत नाहीं.'

(ड) प्रश्न असतां विध्यर्थापासून आश्चर्याचा किंवा दुःखोद्गाराचा बोध होतो; उदा० 'तुह्मांसुद्धां असें करावें ना!' 'तुला काय म्हणावें?'

(ई) 'दे' धातूच्या तृतीयपुरुषीं आज्ञार्थाच्या रूपाचे मागें 'ऊं' प्रत्ययान्त धातुसाधित नाम घालून दुसऱ्याकरितां किंवा स्वतःकरिता परवानगी मागण्याचा बोध होतो. यावेळीं ज्यास परवानगी द्यावयाची, त्याची चतुर्थी होते; उदा० 'मला आतां जाऊं दे;' 'त्यास तें काम करूं दे;' इ०.

टीप—'जाऊं दे,' 'करूं दे,' यास कोणी संयुक्तक्रियापदें मानितात. परंतु तसें न करितां 'जाऊं' 'करूं' हीं क्रियावाचक नामें करून तीं 'दे' या क्रियापदाचीं कर्मे समजावीं.

(फ) 'नको' आणि 'नये' हीं रूपें 'ऊं'कारान्त धातूसाधित अव्ययांपुढें लावून निषेधार्थक आज्ञार्थ होतो. 'नको' हें क्रियापद लागून होणारा वाक्यें कर्तरी व 'नये' लागून होणारीं भावी असतात, म्हणून 'नये' हा विध्यर्थ होय. 'नको' हे क्रियापद असता कर्तृपद प्रथमान्त असतें; व 'नये' असतां तृतीयांत असते; जसें, 'तूं आमचे घरीं येऊं नको;' 'त्वां आमचे घरीं येऊं नये,' इ०.

टीप—नये हें शुद्ध क्रियापद नसून 'न' अव्यय आहे व 'ये' क्रियापदाचें रूप आहे, हें मागें सांगितलेंच आहे. या वाक्यांत 'येऊं' हें क्रियावाचक नाम 'ये' याचा कर्ता आहे. (पहा, क. २४४ व ३०९)

७७३ विध्यर्थाचें अकरण रूप खालीं लिहिल्याप्रमाणें करितातः—

(१) वाक्यांत न हें अव्यय घालून—उदा० 'मीं असें न करावें,' 'त्यानें न बोलावें,' 'तुम्हीं न जावें,' इ०

(२) वरचे (फ)कलमांत सांगितल्याप्रमाणें—उदा० 'तुम्हीं हें काम करूं नये,' (पहा, नि० २४४ व ३०९)

(२) कारितां, बोलतां, जातां, वगैरे क्रियावाचकनामें घालून त्याचे पुढें 'न ये' घालतात. याप्रसंगीं कर्तृपद चतुर्थ्यन्त असतें; जसें, 'मला बोलतां नये;' 'त्यास जातां नये.' इ०.

## संकेतार्थ.

७७४ ज्यावरून संकेताचा बोध होतो, अशीं क्रियापदाचीं विशेष रूपें मागें सांगितलीं आहेत. या अर्थीं वाक्यांत नेहमीं 'जर' व 'तर' हीं अव्ययें येतात; परंतु वाक्यांत पुष्कळदां 'जर' व कित्येक वेळां 'तर' हें अव्यय गुप्त असतें; उ०—'मी (जर) मुंबईस नसतों तर कसें झालें असतें!' 'रामा आला तर मीही येईन.' इ०.

(अ) या पासून कल्पना किंवा अनुमान यांचा बोध होतो, उदा० 'असा पाऊस पडला असता तर बरें होतें;' 'तो आज येता तर तुम्ही भेटला असता.'

(ब) भूतकाळीं या अर्थापासून अमुक होण्याचा रंग होता, किंवा अमुक घडणें असतें, असा बोध होतो; उदा० 'थोडक्यात चुकलें, नाहीं तर तो मरणार होता.' यापासून अजमासही दाखविला जातो; जसें, 'तो मुंबईहून आला असला तर मला कळवील.'

## संशयार्थ.

७७५ या अर्थावरून नेहमीं संशयाचा किंवा अटकळीचा बोध होतो; उदा०—'तो गेला असेल;' 'रामा जात असेल;' 'तो आतां पत्र लिहीत असेल.'

(अ) संशयार्थ हा विध्यर्थाचा पोटभेद आहे.

(ब) 'अस' धातूचे विध्यर्थाचे रूपांमागें करीत, जात, गेला, रूपें येऊन जो संशयार्थ होतो, त्यामध्यें कर्तृपद प्रथमान्त [illegible]. उ० 'तो करीत असेल;' 'मी गेलों असेन,' इ०.

## धातुसाधित नामें, विशेषणें आणि अव्ययें.

७७६ 'इत'-व 'अत'-प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक विशेषणें किंवा अव्ययें जीं करीत, बोलत, इ०, तीं 'अस' धातूचे रूपांमागें योजून अपूर्णकाळ व रीतिदर्शक काळ करितात; जसें, 'तो करीत आहे,' 'तो जात होता,' 'मी बोलत असतों,' 'मी करीत असतां,' इ०.

(अ) अस धातूच्या रूपांखेरीज बाकीच्या धातूंच्या रूपांमागें हीं योजिलीं असतां तीं क्रियाविशेषण अव्ययें असतात; जसें, 'तो चार तास बोलत राहील;' 'मी त्याचें तोंडाकडे पहात बसलों;' इ०.

(ब) या अव्ययांवरून क्रिया चालू असण्याचा बोध होतो. ज्या 'अस'धातूच्या रूपांबरोबर हें योजिलें असेल, त्याचा जो काळ त्या काळीं ती क्रिया चालू आहे असें समजावें; उदा० 'तो करीत असेल,' यांत भविष्यकाळीं . क्रिया चालू आहे असा बोध होतो. अथवा यावरून पुढील क्रियेचें लक्षण किंवा तिचें स्वरूप-बाधन यांनाही अर्थ निष्पन्न होतो. उदा० 'तूं देवास भजत जा' म्हणजे असा 'जा' म्हाणजे 'वाग,' कीं तूं देवाचें भजन करीत असशील.

(क) अकरणरूप असतां यापासून इच्छेचा किंवा खुशीचा बोध होतो; उदा० 'तो तुमजवळ बोलत न 'तो अलीकडे माझ्याशीं नीट वागत नाहीं;' इ०.

टीप—या धातूंच्या रूपांस विशेषणें मानावें किंवा क्रियाविशेषणें मानावें, याविषयीं संशय उत्पन्न होईल. हीं मुख्यची विशेषणें आहेत; परंतु यांचा क्रियापदांशीं व वाक्य-

थीशीं निकट संबंध असल्यामुळें त्यांस क्रियाविशेषणें मानणें हें विशेष प्रशस्त दिसतें. 'अस' धातूशीं योग असतां हीं व तें रूप मिळून संयुक्तक्रियापद असतें. यांचा शुद्ध विशेषणांसारखा उपयोग होतो, व तेव्हां त्यांस आकारान्त विशेषणांप्रमाणें लिंगादिविकार होतात; उदा० 'रांगतें मूल,' 'चालता बोलता' मनुष्य 'जळत्या घराचा वासा.' 'नसती उठाठेव,' इ०. हीं कदाचित् वर्तमानकाळदर्शक क्रियापदाचीं रूपें असून विशेषणांसारखा त्यांचा उपयोग केला आहे असें वाटेल. परंतु हीं 'अत'-प्रत्ययान्त रूपेंच होत.

७७७ 'तां' व 'तांना'-प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक अव्ययें जीं करितां, करितांना, बोलतांना, इ०, यांपासुन पुढील क्रियापदानें दर्शित जी क्रिया, ती या अव्ययानें दर्शित जो धात्वर्थ त्याची क्रिया चालू असतां घडली, असा अर्थ होतो; उदाहरण—'तो घोड्यावरून जात असतां, किंवा असतांना पडला.'

(अ) असा अर्थ असतां या अव्ययाची द्विरुक्ति करितात; असें, 'तो चालतां चालतां समजला;' 'त्यानें बोलतां बोलतां प्राण सोडिला.' इ०.

(आ) यांचा क्रिया चालू आहे तोंपर्यंत, असाच अर्थ न होतां ती क्रिया जेव्हा होईल तेव्हां, असाही अर्थ होतो; उ० 'वारा वाजतां या;' 'तो त्यास न कळतां गेला;' इ०.

(इ) या अव्ययांचा क्रियेच्या अप्रत्यक्ष कर्माचे ठायीं उपयोग होतो (पहा, क० ६७४). उदा० 'मी

त्यास बोलतां-तांना ऐकिलें;' 'रामास मी घोड्यास मारितांना पाहिलें;' इ०.

(ई) 'ये' धातू असतां करणरूपी व अकरणरूपी यांना धातुसाधित नामासारखा उपयोग होतो. उदा० 'मला बोलतां येतें;' 'त्यास घोड्यावर बसतां येत नाहीं;' 'म्हातारी, उठतां न येचि तिजला—' इ०.

(उ) वरील दोन्ही प्रकारचीं धातुसाधितें एकदम आलीं असतां त्यांपासून त्यांच्या क्रियेमागच्या अर्थाचा ('अ' कलम पहा) बोध होतो. उदा० 'भगीरथ राज्य करीत असतां प्रजा फार सुखी होती.' किंवा नुसता केवळ क्रिया चालू आहे असाही अर्थ होतो.

(ऊ) धातुसाधितापुढें 'ही' अव्यय आलें असतां संकेतार्थाचा बोध होतो. उदा० 'मी जाऊं नको म्हणून सांगत असतांही तो गेला,' म्हणजे, 'मी सांगत होतो तरी,'—इ०.

७७८ भूतकाळवाचक विशेषणें 'केला' व 'केलेला' इत्यादि. यांतील पहिल्या प्रकारचीं विशेषणें यांचा भूतकाळाचे जागीं मराठींत उपयोग होतो; तथापि तीं मुळचीं विशेषणें आहेत, व कवितेंत शुद्ध विशेषणांसारखा त्यांचा उपयोग आढळतो. गद्यभाषेतही त्यांचा विशेषणांसारखा उपयोग होतो; उदा० 'पिसाळला कुत्रा;' 'वाळलें गवत;' 'मेल्या माणसाचे दोष काढूं नये;' 'देखल्या देवा दंडवत.'

'कीं आर्जविला नामप्रतिनिधि हा असून उधळितो सैर;'
'कीं बहुकाळ विसरला, फारचि संकोचला सखा लाजे;'

'अशी पदरत्नें दिला, परि असे नव्हे **शापिली**
धवें हरि-मनोहराकृति सती अयें **व्यापिली**'।
'निष्फळ होती मेघें **साजिलीं, आलींहि** जीविका शेतें'
'जरि उकिरड्यांत **पडला, मळला**, न हिरा तथापि सामान्य'।

(अ) गौण वाक्याचे शेवटीं भूतकाळानें क्रियापद असून त्या वाक्यास विभक्तिप्रत्यय लावावयाचा असतां त्या क्रियापदास विशेषण मानून त्यास तसा प्रत्यय लाविनात; उदा० 'पाश्चात्य लोकांत पंचमहाभूतांसच देव **मानिल्याचें** (किंवा **मानिलेलें**) आढळतें;' या वाक्यांत 'मानिल्याचें' व 'मानिलेलें' हे शब्द क्रियावाचक नामें असून 'आढळतें' याचे कर्ते आहेत. 'म्हातारी **मेल्याचें** दुःख नाहीं, पण काळ मातला,' **गेल्याचा** शोक वृथा न करावा,' इत्यादि वाक्यांत व वर सांगितलेल्या उदाहरणांत याचा उपयोग शुद्ध विशेषणासारखा केला आहे. कित्येक ठिकाणीं त्यास संबंधी विशेषणाचे प्रत्यय लावून त्यांची नामें किंवा विशेषणें केलीं आहेत.

(आ) या विशेषणापुढें 'असतां' हें अव्यय घातलें असतां (१) पहिली क्रिया दुसरीचें कारण आहे असा अर्थ होतो; किंवा (२) यास चतुर्थी लागून जसा संकेताचा बोध होतो, तसा अर्थ होतो; अथवा (३) 'तरी' या अव्ययाचा अर्थ उत्पन्न होतो: उदा० (१) 'रामा आला असतां त्याची बुद्धि फिरली;' [illegible] असतां (केल्यास) तो सुधारेल (३) 'इतकें आ[illegible] असेल[illegible] [illegible]ला' इ०

**टीप—**तिसरे उदाहरणांत 'असतां' या पुढें साधारणतः '**ही**' घालितात. या उदाहरणांत 'आला' 'केला' 'सांगितलें' इ० विशेषणें आहेत. व त्यांची विशेष्यें 'रामा' वगैरे शब्द हे 'असतां' याचीं कर्तृपदें आहेत.

७७९. 'ऊन' प्रत्ययान्त भूतकाळवाचक अव्ययें करून,' 'बोलून' यांचा अर्थ ती क्रिया झाल्यानंतर असा होतो; व दोन क्रिया 'आणि' या अव्ययानें जोडिल्या असतां पहिल्या वाक्यांत भूतकाळ असतो, तेथें क्रियापदाचे जागीं हीं योजितात उ० 'त्यानें रामाचे पायां पडून(तो–पायां पडला आणि त्यानें) आपलें काम करून घेतलें.' इ०.

टीप—'ऊन' प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययानें क्रिया दाखविली असते, ती कर्तरि असल्यास कर्तृपद प्रथमान्त असतें; व कर्मणि किंवा भावी असल्यास तें तृतीयान्त असतें उदा०—'तो असें बोलून गेला; (कर्त०) 'त्यानें काम करून टाकिलें(कर्म०).

(अ) यापासून पुढील क्रियार्थाच्या कारणाचा बोध होतो; उदा० 'तो ताप येऊन मेला.' 'गोळी लागून त्याचीं बोटें गेलीं.' इ०.

(ब) दोन क्रिया एकामागून एक लागल्याच झाल्या असतां किंवा दुसऱ्या क्रियेच्या अर्थास जोर आणण्याकरितां पहिल्या क्रियापदाच्या जागीं याचा उपयोग करितात; जसें, 'बोलून जा;' 'धुऊन टाक;' 'करून टाकणें.' 'मी हें जाणून आहे,' 'तो पुणें पाहून आला;' इ०.

७८० 'ऊ'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांपासून पुढील धात्वर्थावर अवलंबून राहणाऱ्या धात्वर्थाचा बोध होतो.

(१) यांचा उपयोग वस्तुतः नामांप्रमाणें होऊन त्यांनीं प्रदर्शित असी जी क्रिया, तिचें क्रियापद अकर्म-

क असल्यास या अव्ययाचें कर्तृपद चतुर्थ्यंत असतें. उदा० 'मला आज घरीं जाऊं दे.' 'त्यानें मला आपलेकडे येऊं दिलें.' इ०.

(२) धातु सकर्मक असल्यास कर्तृपदाची चतुर्थीच होते; कर्मपदाची विभक्ति होण्याचे जे नियम प्रयोगप्रकरणीं सांगितले आहेत, तेच लागतात. (पहा, क्र० ११९)

(३) यांचा उपयोग आल्यावर विशेषतः इच्छिणें, जाणें, पाहणें, देणें, शकणें, लागणें, इत्यादि क्रियापदें पुढें येतात.

(४) कित्येक वेळा यांचा शुद्ध नामांप्रमाणें उपयोग होऊन इतर क्रियापदांशीं त्यांचा कर्तृ-कर्मत्वाचाही योग होतो. उदा० 'तिनें मुलास जेवूं (जेवायास, जेवण) घातलें' त्यानें मला पुस्तक देऊं केलें आहे.' 'गोविंदानें हरीस आपलें काम करूं सांगितलें;' 'तोच ही गोष्ट करूं जाणे;' इ०.

७८१ 'णार'-प्रत्ययान्त भविष्यकालवाचक विशेषणाचा अर्थ असा होतो कीं, त्यानें दर्शित अशी क्रिया करण्याचा कर्त्याचा उद्देश आहे. उ० 'तो आज माझे घरीं येणार आहे.'

(अ) याचा उपयोग वाक्यांत केला असतां पुष्कळदां 'आहे' क्रियापद गुप्त असतें. असें, 'आज पाऊस खास पडणार,' इ०

७८२ 'णें'-प्रत्ययान्त धातुसाधित नामांचा इतर नामांप्रमाणें—विशेषतः भाववाचकनामांप्रमाणें—उपयोग होतो. यांना अनेकवचन होत नाहीं. तथापि भाववाचकनामांप्रमाणेंच तत्सदर्शित गोष्टीचे अनेक प्रकार दाखविणें

अवश्याय अनेकवचन होतें; उदा०–'त्यांची आमची या संबंधानें पुष्कळदां बोलणीं झालीं,' इ०.

(अ) क्रियार्थाचा उल्लेख करावयाचा असतां या नामांचा किंवा आज्ञार्थी द्वितीयपुरुष एकवचन याचा व्याकरणात उपयोग करितात; जसें 'करणें, बोलणें, चालणें, इत्यादि धातु, अथवा कर, बोल, चाल, हे धातु, इ०.

(आ) मध्यगीतीनें विनंति, आज्ञा किंवा हुकूम करावयाचा असतां विध्यर्थक 'जावें,' बोलावें,' 'लिहावें, इत्यादि रूपांचा जसा उपयोग करितात, तसा करणें, बोलणें, इत्यादिकांचाही करितात; येथें क्रियापद गुप्त असतें. उ० 'वारंवार पत्र पाठवीत जाणें,' इ०.

(इ) 'अस' धातूच्या रूपांशीं यांचा संयोग असतां जरूरी किंवा कर्तव्य याचा बोध होतो; जसें, 'कधीं तरी आपणास मरणें आहे;' 'गोविंदपंतास सावकाराचें फार देणें आहे;' 'जा तुला काय करणें असेल तें कर;' इ०.

७८२ विध्यर्थक विशेषणें व नामें करावें, बोलावें, जावें, यांचा नामाप्रमाणें उपयोग होतो. व वस्तुतःहीं विशेषणें व नामें असतां त्यांस हल्लीं क्रियापदांप्रमाणें मानण्याचा प्रघात पडला आहे. 'त्यानें नेहमीं असेंच बोलावें' या वाक्यांत 'बोलावें' हें नामाप्रमाणें वापरलें आहे. व पुढें 'असें आहे,' किंवा नुसतें 'आहे' हा शब्द गुप्त आहे. शिवाय या गोष्टीचें प्रमाण असें आहे कीं त्यांस कोणत्याही पुरुषीं आख्यातप्रत्यय लागत नाहींत. अलीकडे मात्र त्यांनीं द्वितीयपुरुषीं 'बोलावेंस' 'बोलावेत,' अशीं रूपें विकल्पेंकरून करण्याचा प्रघात पडला आहे.



## क्रियावाचकनामें.

७८४ शुद्ध क्रियेचा किंवा क्रियार्थाचा नामांप्रमाणें बोध होत असतां वरील कृदन्तांपैकीं कित्येकांचा शुद्ध नामांप्रमाणें उपयोग करितात. त्यांस **क्रियावाचकनामें** किंवा **विधिवाचकनामें असें म्हणावें.***

**हीं क्रियावाचकनामें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत;—**

(१) विध्यर्थक विशेषणास व 'णें' प्रत्ययान्त धातुसाधित नामास चतुर्थीचे प्रत्यय 'स' व 'ला' हे लागून नामें होतात. उदा० 'मला हें पुस्तक **वाचावयास** किंवा **वाचण्यास** येतें.' 'मला इंग्रजी **वाचावयास** येतें, पण **लिहिण्यास** येत नाहीं.' 'त्याला बोलायाला फार पाहिजे,' इ०.

---

*सध्याच्या व्याकरण करण्याचे रीतीप्रमाणें म्हटलें असतां हा 'क्रियावाचक' नामें मानण्याचा प्रकार केवळ नवीन आहे. परंतु अशा शब्दांचा प्रयोग केवळ नामाप्रमाणें होत असल्यामुळें त्यांस नामें मानणें उचित आहे. या नामांत विभक्तींचीं रूपें बहुधा होत नाहींत. वाक्यरचनेवरून यांच्या बहुतेक ठिकाणीं प्रथमा व द्वितीय ह्या विभक्ती मात्र मानतां येतात. संस्कृतांत अशा नामांचा प्रयोग सध्या आढळत नाहीं, परंतु मूळधातूंस चतुर्थीचे प्रत्यय लावून क्रियावाचक नामासारिखा उपयोग केल्याचीं स्थळें वेदांसारख्या प्राचीन ग्रंथांत आढळतात. इंग्रजींत क्रियापदास चतुर्थीचें शब्दयोगीअव्यय 'to' लावून Infinitive नांवाचें रूप तयार करितात; व त्याचा नामासारखा उपयोग करितात. तेव्हां त्यास 'Infinitive of Purpose' किंवा Gerund हीं नावें देतात. तशाच प्रकारचा हा मराठींतला उपयोग होय; व यांस नामें मानिलें असतां व्याकरण करण्याच्या पुष्कळ अडचणी दूर होतील.

(२) 'तां'- व 'तांना'-प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक अव्ययांचा नामाप्रमाणें उपयोग करितात; उदा० 'त्यास अजून चांगलें **चालतां** येत नाहीं,' 'त्यास कोणी **बोलतां** नये;' इ०.

(३) 'ऊं'-प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययांचा नामाप्रमाणें उपयोग करितात; उदा० 'आईनें मुलास **जेवूं** घातलें;' 'त्यानें मला हें काम **करूं** सांगितलें;' 'ही गोष्ट मीच करूं जाणें;' इ०.

(४) अशा ठिकाणीं चतुर्थीचे प्रत्यय लावून धातुसाधित नामांचा पहिल्या कलमांत सांगितल्याप्रमाणें उपयोग करितात; असें– '**जेवायास** घातलें,' '**करावयास** सांगितलें,' इ०.

(५) विध्यर्थक विशेषणांचा नामाप्रमाणें उपयोग करितात; उदा० 'सांगतांच पुढें **धावें** लागलें,' 'तुला पायीं **चालावें** लागेल.'

(६) विध्यर्थक विशेषणास संबंधी विशेषणाचे 'चा,ची,चें'-प्रत्यय लागून नामें होतात. उदा० 'रामास मुंबईस **जावयाचें** आहे;' 'मला हें पुस्तक वाचावयाचें आहे.' इ०.

७८५ वरील सर्व क्रियावाचकनामांचा उपयोग असतां कलम (२) यांत सांगितलेल्या उपयोगाखेरीज सर्वत्र ज्या धातूंवरून क्रियावाचकनाम साधलें असतें, त्या धातूचें कर्तृपद चतुर्थ्यंत असतें; (२) या कलमांतील उपयोग असतां मात्र तें तृतीयान्त किंवा प्रथमान्तही असतें. या नामांचा उपयोग असेल त्याप्रमाणें तीं पुढील क्रियापदांचे कर्ते किंवा कर्में असतात. ज्या धातूंवरून तीं साधतात, ते सकर्मक असल्यास त्यांस कर्मेंही असतात.

७८६ संबंधीविशेषणाचे प्रत्यय लागून होणाऱ्या क्रियावाचक नामांचा 'पड' व 'अस' या धातूंच्या रूपां-

नीं योग असतां जरूरी किंवा कर्तव्य यांचा बोध होतो. उ०—'मला हें काम करावयाचें पडेल, असें दिसतें;' त्यास उद्यां मुंबईस जावयाचें आहे;' इ०.

(अ) अशा ठिकाणीं 'णे'-प्रत्ययान्त धातुसाधित नामांचाही उपयोग होतो.

(आ) निश्चय किंवा संभव याचा अर्थ असतां क्रियापद घातल्याखेरीज यांचा उपयोग करितात; उदा० 'तो काल खचित मरावयाचा, पण आयुष्याची दोरी बळकट होती;' 'हा वाघ पुरा एकादवेळ पंचाईत करावयाचा;' इ०. या ठिकाणीं यांस विशेषणें मानून पुढें 'अस'धातूचें क्रियापद अध्याहृत घ्यावें.

(इ) 'करावयाचें,' 'बोलावयाचें,' हीं रूपें 'करायचें,' 'बोलायचें,' 'बोलायाचें,' अशींही लिहितात.

७८७ धातुसाधितनामें व क्रियावाचकनामें यांच्या अर्थांतील भेद असा आहे कीं, पूर्वोक्तनामें म्हणजे धातूंपासून साधलेलीं नामें; जसें कृति, कर्म, भावना, हीं 'कृ' व 'भू' धातूंपासून साधलेलीं नामें होत. परंतु क्रियावाचकनामें म्हणजे ज्या धातूंपासून तीं साधतात, त्या धातूंचा क्रियार्थ जो व्यापार, तो प्रदर्शित करणारीं नामें; जसें, 'हें काम करावयास पडलें' म्हणजे काम 'करण्याचा व्यापार करणें भाग पडलें,' असा अर्थ समजावयाचा.

७८८ धातुसाधित शब्द (नामें, विशेषणें व अव्ययें) यांस मूळ धातूंच्या सकर्मकत्वावरून कर्में असतात, व त्यांस कर्तेही असतात, हें मागें सांगितलेंच आहे. सकर्मक धातूपासून झालेलें विशेषण असतां त्याचा अर्थ कर्मणि असून तें मूळधातूच्या कर्माचें विशेषण असतें; उदा०—'वडिलांस पुणें पावें लागलें;' 'मला हक्क सोडून द्यावा लागला.' इ०. परंतु बसावें लागलें, येथें क्रियापद अकर्मक असल्यानें 'बसावें' हें नाम कर्ता आहे. कित्येक धातू (जसें, भासणें, येणें, रुचणें,

आवडणें, वगैरे; पहा, क्र० ६२६) अकर्मक असून अर्थावरून ते सकर्मक आहेत असें भासतें, व त्यास्तव त्यांवरून होणाऱ्या विशेषणादिकांशीं आपण कर्मपदें घालितों; उदा० -'संसार स्वप्नवत भासलेला (ज्यास भासला, असा) मनुष्य सन्यास घेणार आहे;' 'इंग्रजी येणारे (ज्यांस येतें, असे) मनुष्य मुंबईत गल्लोगल्लीं आहेत;' 'लबाडी रुचणारा (ज्यास आवडते, असा) मनुष्य लबाडच होय;' 'स्तुति न आवडणारा मनुष्य जगांत एक सुद्धां सांपडणें कठीण;' इ०. अशा प्रकारचीं वाक्यें इंग्रजी भाषेच्या पद्धतीवर मराठींत आलेलीं दिसतात, परंतु तीं मराठी भाषापद्धतीस नीट दिसत नाहींत, असें मानणें बरें दिसतें.



## गौणवाक्यांविषयीं कांहीं विचार.

७८९ नामवाक्य मिश्रवाक्यांत आलें असतां तें वाक्यांत क्रियापदाचा कर्ता असलें तर याचे पुढें 'हें' किंवा 'असें' हीं दर्शकसर्वनामें येतात; व कर्म असतां क्रियापदापुढें 'कीं' हें अव्यय येऊन पुढें तें वाक्य घालितात. उदा० 'रामा आज आला हें चांगलें झालें नाहीं;' असें म्हणतात कीं, हिमालयावर पांढऱ्या रंगाचे कावळे आहेत;' इ०

टीप—दर्शकसर्वनाम व अव्यय कवितेमध्यें व गद्यांतही पुष्कळदा गुप्त असतें. विरामचिन्हांची रीत पडल्यामुळें हे शब्द गुप्त ठेवण्याचा प्रघात जास्त पडला आहे.

७९० विशेषणवाक्याचे आरंभीं 'जो' हें संबंधी सर्वनाम असतें. तें उक्त असतें किंवा गुप्त ठेवितात; उदा० 'जो मनुष्य मीं काल पाहिला, तोच हा आहे' किंवा 'मीं काल मनुष्य पाहिला, तो हाच आहे;'

७९१ क्रियाविशेषण-दर्शक वाक्यें पांच प्रकारचीं असतात; १ स्थानदर्शक; २ कालदर्शक; ३ प्रकारदर्शक; ४ कारणदर्शक; आणि ५ संकेतदर्शक.

स्थान-द०-'[ जेथें कीर्तन करावें, ] तेथें अन्न न सेवावें' तुका०
काल-द०—[ जंव चाले मोठा धंदा ] तंव ब्राह्मण म्हणे दादा' तुका०
प्रकार-द०—'पाणी तेविं न मरणाहि जननयनीं [ व्यसन येविं आणी तें ]' मोरो.

( १ ) या वाक्यांची खूण 'असें कीं,' 'कारण कीं,' 'अशासाठीं कीं,' 'कां कीं,' 'ह्यासाठीं कीं,' 'म्हणून' हे शब्द आहेत. उदा० '[ ज्या अर्थी तूं साफ बोलत नाहींस ] त्या अर्थीं तूं लबाड आहेस;' 'तूं कपटी आहेस, [ कांकीं तूं साफ बोलत नाहींस ]

'कां न मदन बाधावें [ कीं त्यास पुढें दिलें कलिल पुस ]
'प्राकृत-संस्कृत-मिश्रित शास्त्र कोणी म्हणेल, हीं कथा,'
'प्राकृत पंडित पाडत असते, तरी होती कीर्ति न असता,' मोरो०

( २ ) संकेतदर्शक वाक्यापुढें अनुमानदर्शक वाक्य असतें. हीं वाक्यें 'जर' 'तर,' 'जरी' 'तरी' या अव्ययांनीं जोडिलीं जातात. यास अनुक्रमें पूर्ववाक्य व उत्तरवाक्य असेंही म्हणतात. उदा० 'तूं आलास तर मी येईन.' यांत 'तर'च्या मागील वाक्य संकेतबोधक किंवा पूर्ववाक्य; व पुढलें अनुमानदर्शक किंवा उत्तरवाक्य.

( ३ ) संकेतदर्शक वाक्य भूतकाळीं किंवा भविष्यकाळीं असतां त्यांतील अर्थावर खरेपणाचा संशय असतो; व तेव्हां अनुमानदर्शक वाक्य भविष्यकाळीं असतें; उदा०—'जर तूं आलास ( किं० येशील ) तर मी येईन.'

(४) पूर्ववाक्य संकेतार्थीं वर्तमानकाळीं असतां उत्तरवाक्य तसेंच असतें. आणि अर्थ असा होतो कीं, पूर्ववाक्यांतील संकेत खरा झाल्यास उत्तरवाक्यांतील अनुमान खरें होईल. उदा० 'जर मी तेथें असतों, तर त्यांस असें करूं दिलें नसतें;'

'साकृत पंडित पांडव असते तरी हेहि कोणि न भ्रमते.' मोरो.

(५) परंतु जेव्हां दोन्ही वाक्यें स्वार्थी वर्तमानकाळीं असतात. तेव्हां पूर्ववाक्यांतील संकेत खरा असण्याचा संभव असतो; उदा० 'जर गोविंदा येतो (येत आहे), तर मीही येतों.'

(६) 'जर, तर' यांबद्दल 'यास' घालितात, तेव्हां पूर्णवाक्याचे शवटीं भूतकाळवाचक विशेषण असतें; जसें—'तो तेथें गेल्यास मी येईन.' सोयी करितां त्या विशेषणास भूतकाळचें क्रियापद समजून मागील सर्व वाक्याची चतुर्थी झाली असें समजण्यास चिंता नाहीं. (पहा, क० ७९२)

(७) पूर्ववाक्यांत आज्ञार्थ असतां 'जर-तर' यांबद्दल 'म्हणजे' घालितात; जसें—'तूं खरी गोष्ट सांग म्हणजे सुटशील' म्हणजे—'जर तूं खरी गोष्ट सांगशील तर सुटशील.'

(८) पूर्ववाक्यांतील गोष्टीविरुद्ध गोष्ट जेव्हां दुसऱ्या वाक्यांत सांगितलेली असते, किंवा पूर्ववाक्यांतील गोष्ट जेव्हां बोलणारास कबूल असते, तेव्हां 'जर—तर' यांबद्दल 'जरी—तरी' 'यद्यपि—तथापि'—'कितीकां, पण' हे शब्द येतात; उदा० 'राजानें सळा

बोलाविलें, तरी मी येणार नाहीं.' 'यद्यपि तो शहाणा आहे, तथापि त्यास लौकिक नाहीं.' 'तो कितीकां लहान असेना, पण त्याचें धैर्य मोठें.' इ०.

(९) कालदर्शक क्रियाविशेषणवाक्य असतां त्यापुढें पर्यंत, पावेतों, तों, इत्यादि शब्दयोगीअव्ययें येऊन मागील क्रियापद वर्तमानकाळीं असतें; हा कर्तरिरूपला वर्तमानकाळ असतो; परंतु द्वितीयपुरुषीं एकवचनीं व तृतीयपुरुषीं बहुवचनीं शेवटच्या 'ई'चा लोप होतो, व द्वितीयपुरुषीं बहुवचनीं 'जाई' असें रूप होतें. या वाक्यांतून मागला पुढला संबंध असेल त्याप्रमाणें तिन्हीं काळांचा बोध होतो; उदा० 'मी जाईपर्यंत तो थांबला;' 'तूं जासपर्यंत तो अक्षर बोलला नाहीं;' तुम्ही जाईपर्यंत मी बसतों; 'ते जातपर्यंत—;' 'आम्ही जाऊंपर्यंत—;' इ० येथें शब्दयोगीअव्ययें मागील सगळ्या वाक्याला लागलीं आहेत.

७९२ भूतकाळाचें गौणवाक्य—ज्याचे शेवटीं ला, ली, लें-प्रत्ययान्त क्रियापदाचें रूप आहे, अशीं गौणवाक्यें येऊन त्यांचेपुढें तृतीयेपासून सर्व विभक्तींचे प्रत्यय व शब्दयोगीअव्ययें लागतात; हीं लागतांना मागील क्रियापदांच्या रूपाचें सामान्यरूप 'या' लागून होतें; उदा० 'मी तेथें गेल्यानें काम होईल;' 'तूं आल्यास बरें.' 'शिक्षक आल्यावर किंवा आल्यानंतर मुलें गप्प बसलीं;' गुन्हेगारास गुन्हा केल्याचा पश्चात्ताप झाला.' इ०.

टीप—या वाक्याचें व्याकरण करितांना वाक्य संपल्यावर पुढें 'या' हें सर्वनामाचें सामान्यरूप घातलें आहे असें मानितात; परंतु 'ला'प्रत्ययान्त क्रियापद जें मागें असेल, त्याचें कोणच्याही पुरुषीं व कोणच्याही वचनीं रूप असलें, तरी 'या'शीं संधी

होतांना त्याच्या अंत्याचा लोप होतो, असें मानण्यापेक्षां त्याचें सामान्यरूपच होऊन पुढें त्यास प्रत्ययादि लागतात, असें मानणें विशेष प्रशस्त दिसतें. हें मागील वाक्य मूळचें नामवाक्य होय; व पुढील प्रत्ययादिकांनीं त्यास क्रियाविशेषणाचा अर्थ येतो.

(१) या भूतकालवाचक नामवाक्यांस तृतीयेचा प्रत्यय 'नें' किंवा चतुर्थीचा प्रत्यय 'स' लागून संशयार्थाचा बोध होतो; उदा० 'तो आज आल्यानें किंवा आल्यास (म्हणजे जर आला तर) बरें होईल;' 'त्याला शंभर रुपये दिल्यानें किंवा दिल्यास तो आपलें काम करील.' इ०

(२) 'वर,' 'नंतर' हीं शब्दयोगी अव्ययें लागून 'जेव्हां' तेव्हां' हीं कालदर्शक अव्ययें वाक्यांत घातल्याप्रमाणें बोध होतो; उदा०—'मी घरीं आल्यावर (जेव्हां मी घरीं आलों तेव्हां) हें पाहिलें.

(३) 'प्रमाणें,' 'मारखें' हीं लागल्यापासून 'जसें' 'तसें' यांचा बोध होतो; क्वचित् 'ज्यापेक्षा,' 'त्यापेक्षा,' 'ज्याअर्थी' 'त्याअर्थी' यांचाही बोध होतो; उदा० 'तो बोलल्याप्रमाणें (जसें बोलला तसा) वागेल;' 'आम्ही तेथें गेल्यामारखें (म्हणजे ज्यापेक्षां जाव आहों त्यापेक्षा) काम झालें तर बरें;' इ०.

(४) चतुर्थीचे प्रत्यय 'स-ला' हे लागून 'ऊन'—प्रत्ययान्त धातुसाधिताचा, किंवा ती क्रिया झाली आहे असा बोध होतो. उ० 'तो मुंबईस गेल्यास-(ला) चार दिवस झाले;' म्हणजे 'तो जाऊन चार दिवस झाले, किं० चार दिवसांपूर्वी ती (जाण्याची) क्रिया झाली.'

टीप—वस्तुतः या गौण वाक्यांतलें भूतकालिक क्रियापद विशेषण आहे, हें यावरून दिसून येईल.

(९) कित्येक ठिकाणीं शेवटच्या भूतकाळाचे क्रियापदास 'चा-ची-चें-'प्रत्यय लावून किंवा त्याचें रूप 'लेलें' असें करून त्याचें क्रियावाचक नाम किंवा विशेषण करितात. (पहा, कलम ७७८, अ).



## क्रियाविशेषणअव्ययें.

७९३ क्रियाविशेषणअव्ययें हीं क्रियापदाच्या, विशेषणाच्या किंवा दुसऱ्या क्रियाविशेषणअव्ययांच्या अर्थाचें स्पष्टीकरण करितात, किंवा त्यास मर्यादित करितात. उदा०—'तो फार सुशील आहे (वि०).' 'त्यानें हें काम किती चांगलें केलें! (क्रि वि. व क्रिया०)'

टीप—विशेषणें व क्रियाविशेषणें यांच्या उपयोगामध्यें पुष्कळ साम्य आहे, यामुळें पुष्कळ विशेषणांचा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो. याकरितां त्यांचा निर्णय अर्थावरून करावा. कित्येक क्रियाविशेषणास विशेषणाप्रमाणें लिंग-वचनें व सामान्यरूप यांचे विकार होतात. त्याबद्दल मागें नियम दिले आहेत. त्या विशेषणांचे योगानें मागील नामादिकांचें सामान्यरूप होतें, तीच क्रियाविशेषणें झालीं असतांही सामान्यरूप होतें (पहा नि० १०३,१०४,६०६ व ७११).

(अ) कित्येक स्थलवाचक व काळवाचक क्रियाविशेषणांमध्यें अव्ययांचा अर्थ असून शिवाय तीं स्थळ व काळ दाखविणाऱ्या नामांच्या अर्थाचा समावेश करितात; त्यांस 'सर्वनामात्मक क्रियाविशेषणें' असें म्हणावें. तीं अशीं आहेत:—

( १ ) दर्शकसर्वनामात्मक–येथें, इथे, काल, उद्यां परवां, तई, तधीं, एव्हां, इ०

( २ ) संबंधीसर्वनामात्मक–जेथें, जिथे, जेव्हां, जधीं, जई, इ०

( ३ ) प्रश्नार्थकसर्वनामात्मक–कोठें, कुठे, केव्हां, कई, केधवां इ०

( ४ ) केव्हां स्थळदर्शक व कालदर्शक नामांच्या विभक्तींचा उद्देशार्थी संबंध या क्रियाविशेषणांकडे असतो; उदा० 'पुणें येथें विठ्ठलपंत ह्मणून एक गृहस्थ राहत असे;' 'तुह्मी मुंबईस कोठें राहतां?' सकाळीं केव्हां तो तुला भेटला?' 'दिवसास जेव्हां तो घरीं असेल, तेव्हां जा;' इ०.

( आ ) जेथें, जेव्हां, केव्हां इ० संबंधीक्रियाविशेषणें व तेथें, तेव्हां, इ० दर्शकक्रियाविशेषणें यांचा वाक्यांत परस्परांशीं संबंध असतो, ह्मणून एक आलें कीं त्याच्यामागून दुसरें आलेंच पाहिजे. परंतु वाक्यांत पुष्कळदां एक घालून दुसरें गुप्त ठेवितात.

( ई ) 'जेव्हां' याची द्विरुक्ति असतां क्रिया पुनःपुनः झाली असा अर्थ असतो; यांत दुसऱ्या 'जेव्हां'बद्दल क्वचित् 'केव्हां' ही घालितात.

---

## उभयान्वयीअव्यय.

७९४ 'आणि' व 'व':–(१) समुच्चयवाचक उभयान्वयी अव्ययें 'आणि' व 'व' यांच्या उपयोगामध्यें विशेषसा फरक नाहीं. 'आणि' याचा उपयोग बोलण्यांत

व लिहिण्यांत सारखाच होतो; परंतु 'व' याचा उपयोग कचेरी कागदपत्रांत, दस्ताऐवजांत, वगैरे ठिकाणीं विशेष होतोसें दिसतें; साध्या बोलण्यांत 'आणि' याचा उपयोग विशेष आहे.

(२) मराठींत विरामचिन्हें घालूं लागण्याचे अगोदर 'आणि,' 'किंवा' 'व' यांनीं जोडावयाच्या प्रत्येक शब्दांचे किंवा वाक्यांचेनंतर हीं अव्ययें घालीत असत(संस्कृतांतील समुच्चयवाचक अव्यय 'च,' याचे संबंधानें असाच नियम आहे). परंतु आतां फक्त दोन शब्द किंवा वाक्यें जोडावयाचीं असतां हीं अव्ययें मध्यें घालतात. दोहोंपेक्षां जास्त शब्द किंवा वाक्यें असल्यास शेवटच्या शब्दादिकांच्या अगोदर एकंदर मात्र समुच्चयवाचक अव्यय घालून मध्यंतरीं स्वल्पविरामाचें चिन्ह(,)घालितात.

(३) एकामागून एक आलेल्या गोष्टी एकदम सांगावयाच्या असतां पुष्कळदां हीं अव्ययें न घालितां एकमागती हकीगत सांगत जातात; किंवा प्रत्येक गोष्टीकडे एकुणागचें लक्ष जावें, असा उद्देश असतांही असें करितात; उदा० 'यमनीनें सैनेस पिंजऱ्यांत घालून त्याच्या घरभर फिरवुन आईस, बापास, भावास, चाकरास दाखवीत सुटली.' इ०

७९६ पण आणि परंतु:—पण आणि परंतु यांचा अर्थ सारखाच आहे; तथापि 'पण' याचा 'असें असूनही' किंवा 'सुद्धां' असा दुसरा एक अर्थ आहे. उदा० 'तो आला, पण (म्ह० तो आला असतांही) रामा त्यास भेटला नाहीं;' 'तूंपण ये' (म्ह० 'तूं सुद्धां ये.') इ०.

(२) 'पण' आणि 'परंतु' यांनीं जोडावयाचीं मीं दोन वाक्यें, त्यांपैकीं कोणचेंही एक अकरणरूपीं व दुसरें करणरूपीं असलें, किंवा त्यांत एकमेकांच्या विरुद्ध अर्थ असला, म्हणजे हीं अव्ययें गुप्त असतात; उदा० 'वीष खाल्ल्यानें मनुष्य वांचणार नाहीं, मरेल;'

(३) अशा वाक्यांत क्वचित् 'आणि' किंवा 'व' घालून त्यांस त्यांचा स्वतःचा,व खेरीज 'पण' किंवा परंतु यांचाही अर्थ येतो; उदा० 'मुलगा अशक्त आणि मुलगी सदृढ आहे.' 'तो जमदग्नि आणि ती चिडखोर, मग काय!'

७९१ 'जर' आणि 'तर':–(१) 'जर' आणि 'तर यांनीं संकेताचा बोध होतो; म्हणजे यापासून एका वाक्यांतील अर्थावर दुसऱ्या वाक्यांतील अर्थ अवलंबून असतो; उ०–जर तूं घरीं असलास तर मी येईन.'

(२) वाक्यांत पुष्कळदां या दोन अव्ययांपैकीं एक घालून दुसरें गुप्त ठेवितात. बहुधा 'जर' हें गुप्त ठेवण्याचा विशेष प्रघात आहे.

(३) 'जर' आणि 'तर' यांच्याबद्दल 'ल्यास' प्रत्यय लावून केलेलें कृदन्त (असल्यास, गेल्यास इ०) किंवा 'असतां' हें क्रियापदाचें रूप घालितात; उदा० 'मी मुंबईस गेल्यास तुझे भावास भेटेन.' 'तो पुण्यास आला असतां दोघांनाही सोयीचें पडेल.' इ०.

(४) 'जर' आणि 'तर' यांचा ज्या वाक्यांत उपयोग असतो, त्यामध्यें भूतकाळीं किंवा भविष्यकाळीं क्रियापद घातलें असतां संकेत व आज्ञा अथवा (ताकीद, यांचा बोध होतो. उ० 'तूं येथून हाललास (किंवा हाललास तर ) खबरदार.' इ०.

(५) भूतकाळ असतां यांवरून अजमास किंवा अनुमान हीं ध्वनित होतात; उदा० 'तो माझे घरावरून गेला तर मजकडे येईल.' अशा ठिकाणीं 'तर' बद्दल 'म्हणजे' ही घालितात.

(६) 'जर' आणि 'तर' यांचीं 'जरी' आणि 'तरी' अशींही रूपें होतात. 'जरी' आणि 'तरी,' यांचा अर्थ असा असतो, कीं पहिल्या वाक्यांतली गोष्ट घडली आहे, असें बोलणारास ठाऊक असतें; किंवा त्या वाक्यांतील आशय त्यास कबूल असतो; अथवा पहिल्या वाक्यांतील गोष्ट आपणास माहित आहे किंवा ती आपणास कबूल आहे, असें समजून बोलणारा बोलत असतो. 'जर' आणि 'तर' यांमध्यें तो अर्थ नाहीं. तीं ज्या वाक्यांत असतात, त्यांमध्यें पहिल्या वाक्यांतला अर्थ खरा असेल तर दुसरे वाक्यांतला अर्थ खरा मानावयाचा असतो.

उदा० 'जरी तो माझा मित्र आहे, तरी मी त्यास पैसे देणार नाहीं;' यांत 'मित्र आहे' ही गोष्ट बोलणारास मान्य आहे.

(७) 'जर तर' आणि 'जरी तरी' यांच्या अर्थांमध्यें असा फरक आहे, तरी दोहोंपासून ही संकेताचा बोध सारखाच होतो.

उदा० 'इतकें जरी मी सांगितलें, तरी त्यानें माझें ऐकलें नाहीं.' 'जरी त्याची मुद्रा खिन्न झाली होती, तरी त्या मुलानें तें मोठमोठे शब्द ऐकून त्यास हसूं आलें' इ०.

(८) 'जरी' याचे बद्दल 'यद्यपि' आणि 'तरी' याचे बद्दल 'तथापि' असेंही घालितात. 'जर,' 'तर' यांचे बद्दल कवितेंत 'जरी,' 'तरी' असें घालितात, त्यांवेळीं त्या दोहोंमध्यें कांहीं फरक नसतो.

(९) 'अर' व 'तर' यांबद्दल ज्याप्रमाणें गेल्यास, केल्यास, असल्यास व असला इ० कृदंतें घालितात, त्याप्रमाणें 'अरी' आणि 'तरी' यांबद्दलही तीं कृदंतें घालून पुढें 'ही' हें अव्यय घालितात.



## शब्दयोगी अव्ययें.

७९७ शब्दयोगी अव्ययें जशीं नामांस लागतात त्याप्रमाणें वाक्यांसही लागतात. परंतु त्यावेळीं वाक्यापुढें 'हा' हें दर्शकसर्वनाम घालितात; उदा० 'रामाला बक्षीस मिळालें, ह्यावरून कृष्णास वाईट वाटलें.'

टीप—अशा ठिकाणीं शेवटचें भूतकाळाचें जें रूप त्याचें सामान्यरूप करितात, व त्यासच शब्दयोगी अव्यय लावितात. उ०—'रामास बक्षीस मिळाल्यावरून कृष्णास वाईट वाटलें.' परंतु अशा ठिकाणीं क्रियापद भूतकाळींच असलें पाहिजे (पहा, कलम ७०२).

७९८ करून, विना, विणें, वाचून, प्रमाणें, पाडें इत्यादि शब्दयोगी अव्ययें पुढें आलीं असतां पुष्कळदां मागील नामाची तृतीया होते. उदा० 'तुमच्या **कृपेंकरून** आह्मास कशाची वाण नाहीं;'

'**साठवणेंवीण** धान्य, **धान्येंवीण** साठवण,
+ + + कामा नये, वायां जाय ।'
रामदास.

'**क्रियेवीण** वाचालता ते नसावी.' रामदास.

'त्या **कृपेंकरूनियां** अवलोकी।
जन्म-मृत्युहर जो तिहीं लोकीं।।
वामन.

'बहु होऊनि प्रिया मी आलों तव अप्रिया
विनाकलहें ।' मोरो.

टीप—एक विभक्तिप्रत्यय लागल्यावर किंवा एक शब्दयोगी अव्यय लागल्यावर दुसरें बहुधा लागत नाहीं. तसा प्रकार संबंधी विशेषणें—ज्यांना मागून षष्ठीविभक्ति असें म्हणतात—त्यांचे संबंधानें मात्र होतो; तथापि कोठें सप्तमीचा प्रत्यय 'ईं' नामास लागून त्याचे पुढें 'हून' हा पंचमीचा प्रत्यय लागल्याचीं उदाहरणें आहेत:—'दूतांहीं **यमसदनींहुनि** उकलिला वडे तळीं पतन' (मोरो.) येथें 'यमसदनीं' एवढें स्थलवाचकनाम कल्पिलें आहे.'

७९९ घरांत, वनांत इ० ह्यास सप्तमीचीं रूपें मानितात; परंतु वस्तुतः यांत 'आंत' हें शब्दयोगी अव्यय आहे;व या रूपास संबंधी विशेषणाचे प्रत्यय लागून विशेषणें होतात, हें मागें सांगितलेंच आहे.

टीप—शब्दयोगी अव्ययें कित्येक मुळचीं शुद्धच आहेत; जसें, बवळ, पासाव, पाशीं, सह, इ०. परंतु कित्येक क्रियाविशेषणास प्रत्यय लागून झालीं आहेत; जसें, वरून, खालून, आंतून, आंतील, इ०. कित्येक मुळचीं नामाचीं रूपें आहेत; जसें, कड + स = कडेस; प्रमाण, मूळ, + ऍं (तृ.) = प्रमाणें, मुळें; मध्यें, मधें, मधीं, विषयीं, विशीं, पाशीं, ऐवजीं, इ०. कित्येक शब्दयोगी अव्ययें व क्रियाविशेषणें एकच असून त्यांतला भेद उपयोगावरून करावयाचा, हें मागें सांगितलेंच आहे.



## विराम चिन्हें.

८०० वाक्यांत विश्रांति घेण्याकरितां मध्यें थांबतां यावें म्हणून अथवा मागला पुढला संबंध दाखविण्यासाठीं, किंवा अर्थाचे स्पष्टतेकरितां मध्यें चिन्हें देतात, त्यांस विरामचिन्हें असें म्हणतात.

टीप—जुन्या मराठीभाषेंत विरामचिन्हें नव्हतीं, यामुळें तीं कवितेंतही नाहींत. अलीकडे गद्यभाषेंत तीं इंग्रजीवरून घेतलीं आहेत, व पद्यांतही हळूहळू घेण्याचा प्रचात पडला आहे. यांचा उपयोग फार आहे, ह्मणून लिहिण्यांत व कवितेंत देखील तीं उपयोगांत आणणें फार अगत्याचें आहे.

८०१ मुख्य विरामचिन्हें हीं आहेतः—१ **स्वल्पविराम (,), २ अर्धविराम(;), ३ अपूर्णविराम (:), ४ पूर्णविराम (.), ५ प्रश्नचिन्ह (?), ६ उद्गारचिन्ह (!), ७ अपसारणचिन्ह (–), आणि ८ कौंस, ( ) किंवा [ ].**

८०२ स्वल्पविरामः—स्वल्पविराम योजण्याचीं कारणें अशीं आहेत. ( १ ) एक जातीचे शब्द जोडण्याकरितां; ( २ ) भिन्न शब्द निराळे करण्याकरितां; (३) लांब वाक्य आल्यास मध्यें थांबतां यावें ह्मणून; आणि ( ४ ) निरनिराळ्या वाक्यांचा अर्थ परस्परांपासून भिन्न राहून एकमेकांशीं त्यांचा गोंधळ होऊं नये ह्मणून; उदा० 'रामा, गोविंदा व कृष्णा, तशीच मनी, हीं त्याचीं मुलें आहेत. 'जमीनीवर, घरांवर, आणि झाडांवरून बर्फ पडलें होतें.'

( २ ) संबोधन विभक्तींत असणारें नाम इतर वाक्यभागांपासून निराळें करण्यास स्वल्पविराम योजितात. उदा० 'काल कोठें गेला होतास, रे रामा?'

( ३ ) संक्षिप्त वाक्यें स्वल्पविरामानें मुख्य वाक्यांपासून निराळीं करितात. उ०—'फार पाऊस पडून, धान्य नासेल;' 'मला ठाऊक नाहीं, असें तो ह्मणाला.'

टीप—संक्षिप्त वाक्यें नेहमींच निराळीं करीत नाहींत. अर्थ स्पष्ट करण्याची जरूरी असली तर मात्र करितात. गौण वाक्यांत ही त्या वाक्याबद्दल दर्शकसर्वनाम आलें, किंवा 'की' हें अव्यय घातलें असलें तर स्वल्पविराम घालीत नाहींत.

(४) जर वाक्यांत अनेक कर्ते, अनेक कर्मपदें किंवा एकाच प्रकारचे शब्द एकामागून आले, तर त्या प्रत्येकाचे पुढें स्वल्पविराम घालितात; उदा० 'रामा, गोविंदा, कृष्णा व गोपाळा यांनीं कोंबडा, कुत्रा, मांजर व हत्ती पाहिला.' 'हरीस लिहितां, वाचतां, घोड्यावर बसतां, चित्रें काढावयास, गावयास व शिवण करावयास येतात;' इ०.

(५) एक प्रथमा किंवा द्वितीया प्रथम येऊन पुढें उद्देशार्थी प्रथमा किंवा द्वितीया विभक्ती आली, तर प्रत्येकीपुढें स्वल्पविराम घालावा; बाकी हा प्रकार विशेष आहे असें नाहीं; उदा० 'मुसलमानांचा पैगंबर, महंमद, अरबस्तानांत जन्मला;' 'हरीचा भाऊ, रामा, यास बोलाव;' इ०.

(६) नामवाक्याचे आरंभीं असणारें अव्यय 'कीं,' याचे अगोदर स्वल्पविराम घालितात; तें अव्यय वाक्यांत कचित् गुप्त असलें, तरीही स्वल्पविराम येतो; उदा० 'तो ह्मणाला, [ कीं ] मी उद्यां जाईन.'

टीप.—स्वल्पविराम देण्याचे संबंधानें साधारणतः असा नियम ठेवावा, कीं ज्याच्या योगानें भिन्न केलेले शब्द किंवा वाक्यें एकंदर वाक्यांत एका जातीचीं व एकाच प्रकारचीं असावी. भिन्नप्रकार नांवविणे असतां उभयान्वयी अव्ययांचा उपयोग करावा, किंवा निराळीं वाक्यें करावीं हें व्यवस्थित योग्य आहे.

८०३ **अर्धविरामः**–(१) स्वल्पविरामानें जोडण्याचीं वाक्यें मोठीं असलीं, किंवा अगोदर एकदोनदां स्वल्पविराम येऊन गेला असला, तर **अर्धविराम** योजितात; उदा० 'तूं आपल्या गुरूचा अभ्यासाबद्दल दाखला, बापापासून वर्तणुकेबद्दल दाखला, व शाळेंतून आपले परीक्षेबद्दल पत्रक भरून आण; मग पाहतां येईल तुला जागा देण्याचें.'

(२) वाक्य जरी अगदीं पूर्ण झालें, तरी पुढील वाक्याशीं त्याच्या अर्थाचा निकट संबंध असल्यास अर्धविराम देतात.

८०४ **अपूर्णविराम**–मोठ मोठाल्या वाक्यांचे शेवटीं अर्धविराम देण्याचें कारण असल्यास तेथें अपूर्णविराम देतात. परंतु त्याचा प्रघात क्वचित् आहे.

८०५ **पूर्णविराम**–वाक्य पूर्ण झालें, व तेथें बराच अर्थ संपला असला, व त्याचा पुढील अर्थाशीं निकट संबंध नसला, ह्मणजे तेथें पूर्णविराम देतात.

टीप—विरामचिन्हें अमक्यास्थळीं अमुकच द्यावीं, हें पुष्कळाशीं लिहिणाराचे खुषीवर आहे. व ही पद्धति केवळ नवीन असल्यामुळें सध्यास तिचे संबंधानें कडक नियम ठरविणें अशक्य होय.

८०६ **प्रश्नचिन्ह**–हें ज्या वाक्यांत प्रश्न असतो, त्याचे पुढें योजितात; जसें 'रामा आज आला काय?'

८०७ **उद्गारचिन्ह**–हर्ष, आनंद, भीति, चमत्कार, इत्यादि आकस्मिक मनोविकार व्यक्त करणाऱ्या वाक्यां-

पुढें हें चिन्ह देतात; उदा० 'अहाहा! चांदणें कसें स्वच्छ पडलें आहे! वारा किती गार येतो!' इ०.

८०८ अपसारण चिन्ह—सांगितलेली गोष्ट जास्त स्पष्ट करण्याकरितां किंवा एकादी गोष्ट मध्येंच आठवली असतां बोलत असलेली गोष्ट जरा एकीकडे ठेवून जेंव्हां आपण दुसरी गोष्ट सांगतों, तेंव्हां हें चिन्ह योजितात; याच्या अगोदर पुष्कळ वेळ स्वल्पविराम किंवा अर्धविराम देण्याची चाल आहे. उदा० 'रामा असें ह्मणाला खचित;—तो इतका दांडगाच आहे.' 'रात्र निरभ्र आणि शांत होती,—ती शरदृतूंतील रात्र होती.'

८०९ कौंस—वाक्यांतील अर्थ स्पष्ट होण्यासाठीं मध्येंच जें प्रक्षिप्तवाक्य घालितात—जें गाळलें असतां तादृश मुख्य वाक्यास कांहीं धक्का पोचणार नाहीं—तें कौंसांत घालितात. कंस वाटोळा ( ) किंवा चौकोनी [ ] ही करितात; क्वचित् कंसांत वाक्य घालण्याचे ऐवजीं त्याचे आरंभीं व शेवटीं अपसारण चिन्हें घालितात.

८१० अवतरण चिन्हें:—दुसऱ्या ग्रंथकाराचें वाक्य मध्यें घेतलें असल्यास किंवा कोणी काय बोलला तें सांगितलें असतां तशा वाक्याचे आरंभीं व शेवटीं (" ") (' ') अशीं चिन्हें योजितात, त्यांस अवतरणचिन्हें असें ह्मणतात. एक शब्द किंवा लहानसें वाक्यच घेतलें असल्यास (' ') असें एकेरी चिन्ह करितात; अथवा एकादा शब्द बाकीच्या वाक्यांतून निराळा दाखविण्याचा असताही हें चिन्ह योजितात.

उदा०—"मी खचित तुझ्याबरोबर येणार नाहीं," रामा ह्मण-

ला 'ऊन' हा कृदंताचा एक प्रत्यय आहे. 'नाम' ह्मणजे पदार्थ-मात्राचें नांव, इ०.

---

## ग्रंथावरून व्याकरण करणें.

८११ ग्रंथावरून व्याकरण करणें ह्मणजे वाक्यांतील शब्दांचा परस्परांशीं कसा संबंध आहे, हें सांगणें; त्याचप्रमाणें एकादें वाक्य अनेक वाक्यांमिळून झालें असल्यास त्या वाक्यांचा परस्परांशीं संबंध सांगणें, व एकाद्या वाक्यांतील उद्देश्य, विधेय इत्यादि भाग भिन्न करून दाखविणें व त्यांचें विवरण करणें, हाही याच प्रकाराचा भाग आहे. पहिल्या प्रकारास **'व्याकरण करणें'** असें ह्मणतात व दुसऱ्यास **'वाक्य-पृथक्करण'** असें ह्मणतात.

८१२ **वाक्य-पृथक्करण**—कोणचेंही वाक्य पृथक्करण करण्याकरितां घेणें, तें पूर्णविरामापासून पूर्णविरामापर्यंत घ्यावें; मग त्यांत निरनिराळीं क्रियापदें असतील, त्यांप्रमाणें भिन्न वाक्यें किती आहेत तें पाहून त्यांस 'अ' 'ब' 'क' अशीं नावें द्यावीं; व त्या वाक्यांचा परस्परांशीं कसा संबंध आहे, हें सांगावें.

उदाहरणें:—(१) "एका खेडेगावचा रामराव देशमुख एके दिवशीं धान्य विकण्याकरितां कसब्यास गेला होता." या वाक्यांत एकच क्रियापद आहे, ह्मणून हें **शुद्धवाक्य** आहे. (२) "मी आज येणार नाहीं (अ) असें तो ह्मणाला (ब). यांत दोन क्रियापदें आहेत; अर्थात् 'अ' आणि 'ब' अशीं दोन वाक्यें आहेत; 'अ' हें प्रधानवाक्य असून 'ब' वाक्य हें **अवलंबी किंवा गौणवाक्य** आहे; नामासारखा त्याचा उपयोग केला आहे.

व एकंदर वाक्य **मिश्रवाक्य** आहे. त्याचप्रमाणें "डोक्यास कांहीतरी आच्छादन किंवा भूषण घालावें (अ), अशी सर्व लोकांची चाल आहे (ब);" व (२) "गाई गुराखी आल्या, मावळला रवि हि, कच न आढळला (अ), तेव्हां सोडुनि धृतिनग शुक्रसुता-बुद्धि-भूमिला ढळला (ब)"-हीं दोन्हीं मिश्रवाक्यें असून पहिल्यांत 'अ' प्रधानवाक्य आहे, व 'ब' हें विशेषणवाक्य आहे; व दुसऱ्यांत 'ब' हें प्रधानवाक्य असून 'अ' क्रियाविशेषण वाक्य आहे.

(३) "बुडी मारण्याची घाट हें एक मोठें पात्र आहे (अ) त्यांत वायु भरून मनुष्यास आंत बसून खोलपाण्यांत जातां येतें (ब), आणि आंतील वायु नाहींसा होईपर्यंत त्यांत राहतां येतें (क)." यांत अ, ब, क अशीं तीन वाक्यें असून तिन्ही वाक्यांमध्यें प्रधानार्थ आहे, म्हणून हें सर्व **संयुक्तवाक्य** होय.

टीप १.—संयुक्त वाक्यांत जीं निरनिराळीं वाक्यें असतात, त्यास **'समानाधिकरणवाक्यें'** किंवा **'समानवाक्यें'** असें ह्मणतात.

टीप २—मिश्रवाक्य व संयुक्तवाक्य यांमध्यें जीं निरनिराळीं वाक्यें असतात, तीं स्वतः शुद्ध, मिश्र, किंवा संयुक्त अशीं पुनः असतील.

८१३ पूर्ण विरामापासून पूर्ण विरामापर्यंत वाक्य घेऊन त्यांतील निरनिराळीं वाक्यें व त्यांच्या जाती वगैरे सांगितल्या नंतर ज्यांत क्रियापद आहे, असें एकेक वाक्य घ्यावें; व मग त्याचें पृथक्करण करितांना खालीं लिहिलेल्या गोष्टी सांगितल्या पाहिजेत.

(१) उद्देश्य; (२) उद्देश्यविस्तार: हा विशेषण, सविभक्तिक शब्द, अथवा उद्देश्यार्थी शब्द यांचे योगानें, किंवा त्याचा बोध करणारे वाक्यभाग किंवा गौणवाक्य, यांचे योगानें होईल;—(३) विधेय;

(४) विधेयपूरक, किंवा कर्म;-यांत भेद दोन, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष; (५) विधेयविस्तार-हा क्रियाविशेषणादिकांच्या योगानें होतो

टीप १-नाम, विशेषण व क्रियापद यांचे योगानें जीं कार्यें होतात, तींच नामादिकांचें काम करणारीं वाक्यें व वाक्यांश यांचे योगानें ही होतात, हें मागें सांगितलेंच आहे.

टीप २-विधेयपूरकें किंवा कर्मपदें, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष, यांचा ही विशेषण, सविभक्तिक शब्द व उद्देशार्थी शब्द किंवा वाक्यें अथवा वाक्यांश, यांचे योगानें झालेला विस्तार असेल तर तो सांगितला पाहिजे.

## उदाहरणें.

(१) "रामरावाचा थोरला मुलगा हरी, हा आज सकाळीं मला रस्त्यांत सहज भेटला." यांत 'रामरावाचा थोरला मुलगा हरी'— हा **उद्देश्य विस्तार;** 'हा'-**उद्देश्य;** 'आज सकाळीं' (कालदर्शक), 'मला' (प्रयोजनद०), 'रस्त्यांत' (स्थलद०), 'सहज' (रीतिद०), हे **विधेयविस्तार;** व 'भेटला' हें **विधेय.**

(२) "जें तूं मला काल दिलें, तें इंग्रजी पुस्तक मी वाचितों." यांत 'जें तूं मला दिलें (विशेषणवाक्य) तें (उद्देशार्थी सर्वनाम)' व 'इंग्रजी' (विशे०) हे कर्माचे किंवा विधेयपूरकाचे **विस्तार;** 'पुस्तक' हें कर्म किंवा विधेयपूरक; 'मी' उद्देश्य; व 'वाचितों' विधेय.

(३) "शाहूराजानें बाळाजी बाजीरावास पेशवा केलें." यांत 'शाहूराजानें' हें **उद्देश्यपद** (पहा क० १७९, टीप); 'बाळाजी बाजीरावास' **प्रत्यक्ष कर्म;** 'पेशवा' **अप्रत्यक्ष कर्म;** व 'केलें' **विधेय.**

(४) "हरीनें तें पुस्तक वाचिलें आहे." यांत 'हरीनें' हा कर्तृवाचक विधेयविस्तार; 'तें पुस्तक'-विस्तृत उद्देश्य (पहा, क० १७८); 'वाचिलें आहे' विधेय.

(५) "पुनः जर तूं असें करिशील, तर तुला शिक्षा होईल."—यांत 'पुनः जर तूं असें करिशील' हें क्रियाविशेषणवाक्य **संकेतदर्शक विधेयविस्तार** आहे; 'तुला' —**स्थल किंवा प्रयोजनदर्शक विधेयविस्तार**; 'शिक्षा'—**उद्देश्य**; 'होईल' हें **विधेय**.

(६) 'हरीला आज मुंबईस जावयाचें आहे.'—'हरीला जावयाचें'* **उद्देश्य**; 'आज' (कालदर्शक), 'मुंबईस' (स्थल द०) **विधेयविस्तार**; 'आहे'—**विधेय**.

(७) "मला कालपासून मळमळून येत आहे."—मला मळमळून'—**उद्देश्य**; 'कालपासून'—**विधेयविस्तार**; 'येत आहे,' **विधेय**.

(८) "आम्हांस काल पर्वतीजवळ सांजावलें"—यांत 'सांजावलें' या अकर्तृक क्रियापदाचा 'सांजावणें झालें' असा पदच्छेद करावा (पहा, क०२१०); आणि नंतर 'आम्हांस सांजावणें'—**उद्देश्य**; काल (कालवाचक), पर्वतीजवळ (स्थलवाचक) **विधेय विस्तार**; व 'झालें' **विधेय**.

(९) "त्यानें किंवा त्याला† घर बांधावयाचें आहे." 'त्यानें किंवा त्याला घर बांधावयाचें,' उद्देश्य; 'आहे,' विधेय.

---

* क्रियावाचकनामाचीं जीं तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त कर्तृपदें असतात, तीं त्या नामाचीं विशेषणें आहेत असें समजून त्यांस **'उद्देश्यविस्तार'** असें म्हणावें.

† 'त्यानें' आणि 'त्याला' हे शब्द वाक्यांत असतां अर्थामध्यें जरी फरक आहे, तरी व्याकरणरचनेच्या दृष्टीनें या दोन शब्दांत कांहीं फरक नाहीं; व यामुळें व्याकरण चालवितांना त्यांची व्यवस्था सारखीच लागेल.

(१०) "आईनें मुलांस जेवूं वातलें." यांत 'जेवूं' उद्देश्य 'आईनें,' उद्देशपद; मुलांस—अप्रत्यक्षकर्म; 'वातलें,' विधेय.

(११) "मी आज मुंबईस जावयाचा आहें." 'मी,' उद्देश्य 'आज' (काल.), 'मुंबईस' (स्थलद०) विधेयविस्तार 'जावयाचा' उद्देशविस्तार; 'आहें' विधेय.

(१२) "चिवाला मंडळें येथें कैद केलें." ह्या वाक्यांत भावेंप्रयोग असल्यामुळें त्यांत 'उद्देश्य' नाहीं; मुळचें उद्देश्यपद 'इंग्रजांनीं' किंवा दुसरें जें असेल तें; 'चिवाला' प्रत्यक्षकर्मपद 'कैद' (अ०. कैदी) हें उद्देशाचें विशेषण, किंवा अप्रत्यक्ष-कर्म: 'केलें' विधेय; 'मंडळें येथें'–विधेयविस्तार, स्थलवाचक.

८१४ **व्याकरण करणें:—( अ )वाक्य** = व्याकरण करितांना प्रथमतः पूर्णविरामापासून पूर्णविरामापर्यंत वाक्य घ्यावें; नंतर कालदर्शक पूर्ण क्रियापद* ज्यांत आहे. तें एक पोटवाक्य. याप्रमाणें सर्व वाक्यांत निरनिराळीं वाक्यें असतील तीं पाहावीं. वस्तुतः व्याकरण करितांना ज्यांत पूर्ण क्रियापद असेल तेवढ्याच शब्दसमूहास वाक्य समजलें पाहिजे. परंतु प्रत्येक शब्दांना पुढला मागला संबंध कळण्यासाठीं पूर्णविरामापासून पूर्णविरामापर्यंत वाक्य घ्यावें.

---

* मागें जे काळ सांगितले आहेत, त्यांचे प्रत्यय लागून झालेल्या रूपांस मात्र पूर्ण क्रियापदें म्हणावें. त्याशिवाय बाकीचीं जीं धातूंचीं रूपें तीं कृदन्तें किंवा धातुसाधितें होत. ज्या वाक्यांत पूर्ण क्रियापद असेल, तेंच पूर्ण वाक्य; बाकी अनेक शब्द एकत्र येऊन जरी अर्थ पूर्ण झाला असला, तरी पूर्ण क्रियापद नसेल तर त्या शब्दांमिळून वाक्यांश होईल. धातुसाधितावरून क्रियापदाच्या अर्थाचा बोध होतो, परंतु अशा धातुसाधितास पूर्ण क्रियापद म्हणतां येणार नाहीं.

(आ) वाक्याचे संबंधानें खालीं लिहिलेल्या गोष्टींचा विचार करावा.

(१) अर्थावरून होणारे वाक्यांचे भेद (पहा, क० ५१९ व ५२३). (२) वाक्यांतील कर्ता, कर्म व क्रियापद. (३) प्रयोग (४) पोटवाक्य असलें तर व्याकरणदृष्टया दुसऱ्या वाक्याशीं त्याचा संबंध.

टीप—दुसऱ्या वाक्याशीं संबंध पहाणें तो संकेतार्थाचे संबंधानें पाहावयाचा; नामवाक्य असल्यास तें क्रियापदाचा कर्ता किंवा कर्म असेल; बाकीचे संबंध वाक्याचें पृथक्करण करितांना पाहावे. व्याकरण करितांना ते पाहावे लागणार नाहींत.

८२९ वाक्यांतील निरनिराळ्या शब्दांचें व्याकरण करितांना त्यांचे संबंधानें खालीं लिहिलेल्या गोष्टी सांगितल्या पाहिजेत.

(१) प्रथमतः शब्दाची जात ओळखणें; शब्दाची जात अर्थावरून व लक्षणावरून ओळखावी; एकच शब्द पुष्कळदां अर्थावरून निरनिराळ्या जातीचा असूं शकेल, म्हणून त्या शब्दास विवक्षित स्थळीं नामाचें लक्षण लागेल तो नाम, विशेषणाचें लागेल तो विशेषण, इत्यादि समजावें.

(२) नामाच्या संबंधानें नामाची जात, अन्त्यस्वर, लिंग, वचन व विभक्ति या गोष्टी सांगाव्या; प्रथमा विभक्ति असल्यास तो शब्द कोणत्या क्रियापदाचा कर्ता आहे हें सांगावें; द्वितीया असल्यास कोणत्या क्रियापदाचें कर्म आहे हें सांगावें. त्या विभक्ती असून अन्य अर्थ असल्यास किंवा दुसऱ्या विभक्ती असल्यास त्याचे अर्थ व कारकें सांगावीं. शब्दाचें नुसतें सामान्यरूप असल्यास तें कां झालें तें सांगावें.

(३) विशेषणाचे संबंधानें सांगावयाच्या गोष्टी—जात, त्याचें सामान्यरूप झालें, असल्यास कां झालें, किंवा त्यास विभक्तिप्रत्यय लागला असल्यास कां लागला हें सांगावें.

(४) सर्वनाम—जात; लिंग, वचन, विभक्ति वगैरे स गोष्टी नामाप्रमाणें; त्याचें मूळचें नाम.

(५) क्रियापद—मूळचा धातु, जात (सकर्मक, अकर्मक प्रयो जक किंवा शक्य), काळ, पुरुष, लिंग, वचन; क्रियापदाचा कर्ता कर्म; व आख्यातप्रत्यय कर्तरि, कर्मणि किंवा भावीं आहेत हें,—ह्मणजे प्रयोग; ही गोष्ट आरंभींच सांगावी.

टीप—हल्लीं व्याकरण चालवितांना क्रियापदाचे संबंधानें दुस ऱ्या कित्येक गोष्टी सांगतात. परंतु कोणत्याही शब्दाचें रूप ज्या ज्या गोष्टींचे संबंधानें फिरतें, तेवढयाच फक्त गोष्टी सांगावया च्या असतात. क्रियापद करणरूपीं किंवा अकरणरूपीं अ सतें तें अर्थावरून असतें; भेद हा क्रियापदाचे जातीचा प्रकार आहे (पहा, क० ३१३); आज्ञार्थ व विध्यर्थ या दोन अर्थांवरून क्रियाप दाचें रूप फिरतें, ह्मणून ते अर्थ असतांना सांगावे, व ते अ सतां काळाचा भेद नाहीं, ह्मणून तेव्हां काळ सांगू नये. संके तार्थे असतां फक्त वर्तमानकाळीं मात्र रूपें फिरतात. संशयार्थ व इतर काळाचा संकेतार्थ, यावरून क्रियापदाचीं रूपें फिरत नाहींत, म्हणून क्रियापद चालवितांना हे अर्थ सांग ण्याची जरूर नाहीं; सर्व वाक्याचें संबंधानें ते अर्थ सांगावे.

(६) अव्ययें—जात; क्रियाविशेषण अव्यय असल्यास त्याचें विशेष्य, व त्यास लिंगादिविकार झाले असल्यास होण्याचें कारण (पहा क० २७३, २७४). उभयान्वयी अव्यय असल्यास त्यानें काय जोडलें हें सांगावें; शब्दयोगी अव्यय असल्यास त्यानें कोणच्या शब्दाचें सामान्यरूप झालें, हें सांगावें.

(७) कृदन्तें व धातुसाधितें हीं वाक्यांत अर्थावरून नामें विशेषणें किंवा अव्ययें असतील, त्याप्रमाणें सांगावीं. क्रियावाचक नामाचें लिंग व वचन हीं सांगावयास पुष्कळदा अडचण पडेल; कारण त्यावरून फक्त क्रियार्थाचा बोध होतो. विवक्षित वस्तूचा बोध झाल्यावांचून शब्दास लिंगादिक असणार नाहींत. कृदन्तांत कर्ता, कर्म इत्यादि क्रियापदाप्रमाणेंच असतील, तीं मागें ठिकठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें सांगावीं.

८११ वरील नियमांप्रमाणें कित्येक वाक्यांचें व्याकरण करून दाखवितों:—

(१) "अंताजीपंतांचा मुलगा गोविंदा ओटीवर पुस्तक वाचीत बसला आहे, असें त्याजकडे पाहून मी घरांत गेलों."

यांत दोन वाक्यें असून पहिलें नाम वाक्य आहे. दोन्ही वाक्यें स्वार्थी आहेत; व दोन्हींत कर्तरिप्रयोग आहे.

अंताजीपंतांचा—हें 'अंताजीपंत' या विशेष नामापासून साधलेलें संबंधी विशेषण; याचें विशेष्य 'मुलगा.'

मुलगा—हें 'मुलगा' या आकारान्त पुल्लिंगी सामान्य नामाचें प्रथमेचें एकवचन; या प्रथमेचा अर्थ कर्ता,'बसला आहे' या क्रियापदाचा.

गोविंदा—विशेषनाम, आकारान्त, पुल्लिंगी प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश, 'मुलगा' या शब्दाकडे.

ओटीवर—'ओटी' सामान्यनाम ईकारान्त स्त्रीलिंगी सामान्यरूप; 'वर' या शब्दयोगी अव्ययाचे योगानें.

पुस्तक—सामान्यनाम अकारान्त नपुंसकलिंगी द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, 'वाचीत' यांतील 'वाच' धातूचें.

वाचीत—वर्तमानकालवाचक धातुसाधित (किंवा क्रियार्थक) अव्यय.

बसला आहे.—हें कर्तरि संयुक्त क्रियापद; 'बस' या अकर्मक धातूचें पूर्णवर्तमानकाळीं पुल्लिंगी तृतीयपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता 'मुलगा.'

असें—हें मागील वाक्याचें दर्शक-सर्वनाम नपुंसकलिंगी द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, 'पाहून' यांतील 'पाह' धातूचें.

पाहून—भूतकालवाचक क्रियार्थक अव्यय.

मी—प्रथमपुरुष-सर्वनाम पुल्लिंगी प्रथमेचें एकवचन; अर्थे कर्ता, 'गेलों' या क्रियापदाचा.

घरांत—'घर' सामान्यनाम अकारान्त नपुंसकलिंगी सामान्यरूप; 'आंत' या शब्दयोगी अव्ययाचे योगानें; (पहा, क० ७९९).

गेलों—हें कर्तरि क्रियापद; 'जा' या अकर्मक धातूचें भूतकाळीं पुल्लिंगी प्रथमपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता 'मी'

(२) "त्यानें तुला पत्र पाठविल्यास मला खपणार नाहीं."

यांत दोन वाक्यें आहेत. पहिलें नामवाक्य असून त्यास 'स' हा प्रत्यय लागून तें क्रियाविशेषणवाक्य झालें आहे(पहा, क० ७९२); पहिल्या वाक्यांत कर्मणिप्रयोग व दुसऱ्यांत कर्तरिप्रयोग आहे. दोन्ही वाक्यें स्वार्थी असून दुसरें अकरणरूपी आहे. दोन वाक्यें निराळीं केल्यावर सामान्यरूपाचा प्रत्यय 'या' व विभक्ति-प्रत्यय 'स' हे व्याकरण करितांना विचारांत घेऊं नये.

त्यानें—'तो' या दर्शकसर्वनामाचें पुल्लिंगी तृतीयेचें एकवचन; हें 'पाठविलें' या क्रियापदाचें कर्तृपद.

तुला—'तूं' या द्वितीयपुरुष-सर्वनामाचें चतुर्थीचें एकवचन; हें अप्रत्यक्ष कर्मपद. (येथें लिंगनिर्णय होत नाहीं. म्हणून लिंग सांगितलें नाहीं).

पत्र—सामान्यनाम अकारान्त नपुंसकलिंगी प्रथमेचें एकवचन;अर्थे कर्ता,पाठविलें या क्रियापदाचा(मूळचें कर्मपद).

पाठविलें—हें कर्मणिक्रियापद; 'पाठव' या सकर्मक धातूचें भूतकाळीं नपुंसकलिंगी तृतीयपुरुषाचें एकवचन; याचें कर्तृपद 'त्यानें;' 'पत्र' हा कर्ता.

मला—'मी' प्रथमपुरुष-सर्वनाम, चतुर्थीचें एकवचन;

हें 'खपणार' यांतील 'खप' धातूचें कर्तृपद(पहा, क० १२१). [येथेंही लिंगनिर्णय होत नाहीं].

खपणार—हें भविष्यकालवाचक धातुसाधित विशेषण; याचें विशेष्य 'तें' हें अध्याहृत* सर्वनाम.

नाहीं—हें कर्तरि क्रियापद; हें नकारयुक्त 'अस' धातूचें वर्तमानकाळीं नपुंसकलिंगी तृतीयपुरुषाचें एकवचन; याचा कर्ता 'तें' हें अध्याहृत सर्वनाम; हें सर्वनाम 'त्यानें तुला पत्र पाठविलें' या वाक्याबद्दल घातलें आहे.

(२) "तुझ्यानें आपलीं मुलें पोसवत नसलीं तर माझ्या स्वाधीन कां करीनास!" हीं दोन वाक्यें आहेत. पहिलें अवलंबी वाक्य आहे, व दोन्ही वाक्यांमिळून संकेतार्थ आहे. पहिल्या वाक्याचा कर्मणिप्रयोग व दुसऱ्याचा कर्तरिप्रयोग आहे, व एकंदर वाक्य प्रश्नार्थक आहे.

तुझ्यानें—हें 'तूझा' या सर्वनामात्मक संबंधी विशेषणाचें पुल्लिंगी तृतीयेचें एकवचन; हें 'पोसवत नसलीं' याचें कर्तृपद.

आपलीं—हें सर्वनामात्मक संबंधी विशेषण; याचें विशेष्य 'मुलें.'

मुलें—'मूल' सामान्यनाम अकारान्त नपुंसकलिंगी प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, 'पोसवत नसलीं' या क्रियापदाचा.

---

* केव्हां केव्हां वाक्यांत नाम किंवा क्रियापद उघड समजण्यासारखें असल्यामुळें बोलणारा वाक्यांत त्याचा संक्षेप करितो; अथवा कांहीं तशा शब्दावांचून वाक्याचा अर्थ समजण्यास अडचण पडत नाहीं, म्हणून बोलणारा तो शब्द वाक्यांत घालीत नाहीं; परंतु व्याकरण करितांना तो शब्द घेतल्यावांचून वाक्य पुरें होत नाहीं. असा शब्द गुप्त राखणें, यास 'अध्याहार' असें म्हणतात, व त्या शब्दास 'अध्याहृत' शब्द असें म्हणावें.

पोसवत नसलीं—हें शक्यार्थक-कर्मणि संयुक्त क्रियापद; 'पोस' (प्रयोजक पोसव) या सकर्मक धातूचें अपूर्ण संकेतार्थीं (क० २९०) नपुं० तृ० पु० एकवचन. याचा कर्ता 'मुलें', व कर्तृपद 'तुझ्यानें'

तर—संकेतबोधक उभयान्वयी अव्यय.

माझ्या—हें 'मी' या पुरुषवाचक सर्वनामापासून झालेलें संबंधी विशेषण, सामान्यरूप; 'स्वाधीन' या विशेषणामुळें (पहा, नि० ७११).

स्वाधीन—हें विशेषण, 'मुलें' याचें; (हें क्रियाविशेषण अव्ययही करितां येईल; अशा ठिकाणीं विशेषण किंवा क्रियाविशेषण याचा निर्णय करणें कठीण आहे.)

कां—कारणबोधक उभयान्वयी अव्यय.

करीनास [करीस ना; (नि० ७१६)]—करीस हें कर्तरिक्रियापद; कर या सकर्मक धातूचें रीतिभूतकाळीं (पहा, क० ७१६; येथें वर्तमानकाळाप्रमाणें अर्थ आहे) द्वितीय पुरुषाचें एकवचन. 'तूं' हा कर्ता, 'मुलें' हें कर्म.

ना—हें क्रियाविशेषण अव्यय.

(४) "कृष्णानें साहाय्य करून पांडवांचें रक्षण केलें, अशी कथा आम्हीं काल श्रवण केली."

यांत दोन स्वार्थीं वाक्यें आहेत. पहिलें विशेषणवाक्य आहे. दोन्ही वाक्यांत कर्मणिप्रयोग आहेत.

कृष्णानें—'कृष्ण' विशेषनाम अकारान्त पुल्लिंगी तृतीयेचें एकवचन; अर्थ. कर्तृपद, 'केलें' या क्रियापदाचें.

साहाय्य—भाववाचकनाम, नपुं. द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, 'करून' याचें.

पांडवांचें—संबंधी विशेषण, विशेष्य, 'रक्षण.'

**रक्षण**—सामान्यनाम, इ०—प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, 'केलें' या कर्मणि क्रियापदाचा; मूळचें कर्मपद.

**केलें**—हें कर्मणि क्रियापद; 'कर' या सक. धा., भूतकाळीं पु. तृ. पु. एकवचन 'कृष्णानें' हें कर्तृपद; 'रक्षण' हा कर्ता.

**अशी**—हें प्रकारार्थक विशेषण, याचें विशेष्य 'कथा.'

**कथा**—सामान्यनाम, आकारान्त, स्त्री० प्रथमेचें एकवचन, अर्थ कर्ता, 'केली' या कर्मणिक्रियापदाचा.

**आम्हीं**—'मी' या प्रथमपुरुष-सर्वनामाचें पुल्लिंगी तृतीयेचें अनेकवचन, अर्थ कर्तृपद, 'केली' या क्रियापदाचें.

**काल**—कालवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**श्रवण**—हें विशेषण, कथेचें.

**केली**—('केलें' याप्रमाणें चालवावें) 'आम्हीं' हें कर्तृपद; 'कथा' कर्ता.

टीप—'श्रवण करणें,' 'दान करणें,' 'संपादन करणें,' इत्यादि ठिकाणीं संयुक्त क्रियापदें करावीं, असें कित्येक व्याकरणांत लिहिलें आहे. परंतु 'श्रवण,' 'दान,' 'संपादन' इत्यादि शब्द उघड नामें किंवा विशेषणें असतां त्यांना क्रियापदाचे अवयव कां म्हणावें, हें समजत नाहीं. इंग्रजींत अशा ठिकाणीं एकच क्रियापद असतें, यामुळें आम्हांलाही असे जोड क्रियापदें मानण्याची कल्पना सुचली असें दिसतें. दुसरें, कित्येक असें म्हणतात कीं, 'श्रवण करणें' यास जर संयुक्त क्रियापद मानावयाचें नाहीं, तर नुसतें 'करणें' यांत अर्थ कोठें आहे! पण नुसत्या क्रियापदानें किंवा एकाच शब्दानें सर्व वाक्याचा कधींच अर्थ होत नाहीं. वाक्यांतील कर्ता व कर्म यांशिवायही वाक्याचा अर्थ होणार नाहीं; म्हणून त्यांसही संयुक्त क्रियापदांतच घालावें काय! तेव्हां इंग्रजींशीं जुळण्याकरितां अथवा पूर्ण अर्थ होत नाहीं म्हणून, जोड क्रियापदें करण्याची तऱ्हा अगदीं सयुक्तिक नाहीं (पहा, क० ७४८).

'कथा श्रवण केली' या ठिकाणीं 'कथेचें श्रवण केलें' असें असावें, असें के० कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं लिहिलें आहे. शुद्ध प्रकार तसा आहे, यांत शंका नाहीं. परंतु बोलतांना तसें बोलण्याचा प्रचात घालणें जर आतां अशक्य आहे, तर अशा ठिकाणीं 'श्रवण' वगैरे शब्द विशेषणें आहेत असें समजावें हें बरें.

(५) "मी असतां, कां माझ्या तातें केशग्रहासि पावावें;
मग कैसें बापानीं पुत्रांपासोनि सौख्य इच्छावें ?"

या आर्येत दोन वाक्यें असून तीं परास्परांशीं समानाधिकरण वाक्यें आहेत. पहिल्या वाक्यांत भावीप्रयोग आहे, व दुसऱ्यांत कर्मणिप्रयोग आहे.*

**मी**—प्रथमा वि०; 'असतां' याचा कर्ता.

**असतां**—वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय.

**कां**—कारणबोधक उभ. अ.

**माझ्या**—संबं.वि. सामान्यरूप,सविभक्तिक विशेष्यामुळें.

**तातें**—तृतीया वि० अर्थ, कर्तृपद, 'पावावें' या भावी क्रियापदाचें.

**केशग्रहासि**—'केशग्रह,' सामासिक सामान्यनाम; द्वितीया वि०, अर्थ कर्म, 'पावावें' याचें.

**पावावें**—हें भावी क्रियापद; 'पाव' या सकर्मक धातूचें विध्यर्थी नपुं. तृतीय पु. एक. 'तातें,' कर्तृपद; 'केशग्रहासि' कर्म.

**मग**—क्रियाविशेषण अव्यय.

**कैसें**—क्रियाविशेषण अव्यय.

**बापांनीं**—तृतीया वि., अने.; 'इच्छावें' याचें कर्तृपद.

**पुत्रांपासोनि**—'पुत्रां' हें अनेकवचनी सामान्यरूप, 'पासोनी' शब्दयोगी अव्यय.

---

* येथून पुढें प्रत्येक शब्द पूर्णपणें न चालवितां व्याकरणाचे दृष्टीच्या मुख्य मुख्य गोष्टी तेवढ्या सांगितल्या आहेत.

सौख्य—प्रथमा वि०; 'इच्छावें' या कर्मणि क्रियापदाचा कर्ता.

इच्छावें—कर्मणि क्रियापद; 'इच्छ' या सकर्मक धातूचें विध्यर्थी नपुंसकलिंगी प्रथमपुरुषांचें एकवचन; 'बापांनीं' हें कर्तृपद, 'सौख्य' हा कर्ता.

(५) "तो आज आलाच पाहिजे."* यांत 'आला हें 'तो' याचें भूतकाळवाचक विशेषण करून 'पाहिजे' एवढेंच क्रियापद समजावें.

(६) "रामाला आज मुंबईस गेलें पाहिजे."—यांत 'रामाला' हें गेलें याचें कर्तृपद; 'गेलें' हें क्रियावाचक नाम, 'पाहिजे' या क्रियापदाचा कर्ता.

(७) 'हरीनें किंवा हरीला हें काम केलें पाहिजे.' 'हरीनें' किंवा 'हरीला,' 'केलें' याचें कर्तृपद; 'केलें—'भूतकाळवाचक विशेषण,'काम' याचें;'पाहिजे'याचा कर्ता 'काम.'

(८) 'विश्वासराव लढाईंत मारिला गेला.'—'मारिला' भूतकाळवाचक विशेषण, 'विश्वासराव' याचें.

(९) 'अर्जुन कर्णास मारिता झाला.'—'मारिता' हें कर्तृवाचक विशेषण; याचें विशेष्य 'अर्जुन.'

(१०) हरीला मुंबईस जावयाचें आहे.'—'जावयाचें'—क्रियावाचक नाम; 'आहे' याचा कर्ता; 'हरीला' हें 'जावयाचें' याचें कर्तृपद.

(११) 'हरी आज मुंबईस जावयाचा आहे.'—'जावयाचा'—क्रियावाचक संबंधी विशेषण,याचें विशेष्य 'हरी.'

---

*पुढील सर्व वाक्यांत विशेष प्रकारचा किंवा कठीण शब्द कसा वापरावा चालवून दाखविला आहे, किंवा त्याचें व्याकरण कसें करावें हें सांगितलें आहे.

(१२) 'मला पत्र लिहावयाचें आहे;' 'त्याचें पत्र लिहावयाचें झालें.'—पहिल्या वाक्यांत 'लिहावयाचें' विशेषण करावें; किंवा तें क्रियावाचकनाम करून, तो 'आहे' याचा कर्ता करावा, व मग 'पत्र' हें 'लिहावयाचें' याचें कर्म करावें. दुसऱ्या वाक्यांत 'लिहावयाचें' हा 'झालें' याचा कर्ता, व 'पत्र' हा शब्द 'लिहावयाचें' याचें कर्म.

(१३) हें काम तोच करूं जाणें—'तो' हा कर्ता, 'करूं' हें क्रियावाचक नाम कर्म, व 'जाणें' हें क्रियापद.

(१४) 'मला गुजराथी वाचावयास येतें पण बोलतां येत नाहीं.'—'वाचावयास' व 'बोलतां' हीं क्रियावाचक नामें; अनुक्रमें 'येतें' आणि 'येत नाहीं' यांचे कर्ते; 'गुजराथी' हें 'वाचावयास' याचें कर्म.

(१५) 'रामाला घरीं जावें लागलें'—'जावें' क्रियावाचकनाम, 'लागलें' याचा कर्ता. 'रामाला' हें 'जावें' याचें कर्तृपद.

(१६) 'तो घरीं जाऊं लागला.'—'तो लागलाच बोलूं (किंवा बोलावयास) लागला.'—'जाऊं,' 'बोलूं' 'बोलावयास,' हीं धातुसाधित अव्ययें आहेत.

(१७) 'हरीनें बापाचें उगाच बोलून घेतलें'—'बोलून' क्रियावाचकनाम; 'घेतलें' या कर्मणि क्रियापदाचा कर्ता (मूळचें कर्मपद).

(१८) 'तो असें म्हणून बोलून गेला'—'बोलून' भूतकालवाचक धातुसाधित अव्यय.

(१९) 'मी आज येऊं शकत नाहीं'—'येऊं' धातुसाधित अव्यय.

(२०) 'आई मुलास जेवूं घालिते'—'जेवूं'—क्रियावाचकनाम; 'घालिते' याचें कर्म.

(२१) 'माझें असें आहे कीं, मला कोणी बोललेलें खपत नाहीं.' 'माझें'—मूळचें प्रथमपुरुषसर्वनामाचें एकवचनीं संबंधी विशेषण; येथें नाम (उदा० माझा स्वभाव) 'आहे' याचा कर्ता.

(२२) 'या औषधापासून तुला बरें वाटेल.' 'बरें'—(बरेपणा) भाववाचक नाम; 'वाटेल' याचा कर्ता.

(२३) 'तो उपयोगी आहे असेंच म्हटलें पाहिजे'—'म्हटलें' भूतकालवाचक वि०, 'असें' याचें. 'असें' हें मागील वाक्याबद्दल घातलें आहे.

(२४) "घालूं पाहसि दंष्ट्रा उपटाया अहिमुखांत आंगोळी." 'घालूं'–क्रियावाचकनाम, 'पाहसि' याचें कर्म (पहा, मागें १२ वें वाक्य).

(२५) "गेल्याचा शोक वृथा न करावा"—'गेल्याचा'—'गेला' या भूतकालवाचक विशेषणापासून झालेलें (गेल्याचा = गेल्या पदार्थाचा) संबंधी विशेषण; याचें विशेष्य 'शोक.'

(२६) 'तो आज परत आल्यास (आल्याचें, आल्यावर) तुला कळवीन.' या वाक्यांत–'स' हा प्रत्यय किंवा 'वर' हें शब्दयोगी अव्यय 'तो आज परत आला' या वाक्यास लागलेलें आहे. क्वचित् अशा ठिकाणीं 'यास,' 'याचें,' 'यावर' असा पदच्छेद करण्याची ही चाल आहे. परंतु आणखी एक सर्वनाम अशा वाक्यांत अध्याहृत घेण्यापेक्षां विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगीअव्ययें हीं मागील सबंध नामवाक्यास लागलीं आहेत, असें मानणें अधिक प्रशस्त दिसतें.

(२७) "पुणें येथें रामराव ह्मणून एक गृहस्थ राहतो." 'पुणें'—द्वितीया विभक्ति; द्वितीयेचा अर्थ उद्देश, 'येथें' या स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययाकडे (पहा, क० ७९३, अ, ४).

(२८) "तो इतका अशक्त आहे, कीं त्याला नेहमीं वैद्य जवळ बाळगावे लागतात." या वाक्यांत 'लागतात' एवढेंच क्रियापद मानून 'बाळगावे' हें विध्यर्थक विशेषण, 'वैद्य' याचें. या वाक्यांत 'बाळगावे लागतात' या ठिकाणीं 'बाळगिले पाहिजेत' असें असेल तर 'पाहिजेत' एवढेंच क्रियापद करून 'बाळगिले' हें 'वैद्य' या शब्दाचें विशेषण करावें.

(२९) "त्याच्यानें स्वहित किंवा परहित कांहीं व्हावयाचें नाहीं." 'व्हावयाचें'—क्रियावाचक विशेषण, 'कांहीं' या सर्वनामाचें.

(३०) करूं नये, बोलूं नये, करितां नये, इत्यादि शद्ब ज्यांत आहेत अशा वाक्यांत 'नये' हें क्रियापद मानण्याची सध्या वाल आहे. परंतु यांत 'न' हें अव्यय असून 'ये' हं जुन्या मराठींतलें वर्तमानकाळचें रूप आहे (पहा, क० २४४, ३०९); ह्मणून 'बोलूं,' 'करितां' इत्यादि क्रियावाचक नामें 'ये' याचे कर्ते होत.

(अ) 'बोलना,' 'येईना,' 'करीना.' या संबंधानें ही असेंच समजावें; उदा०—'तो येई-ना,' यांत 'तो' हा 'येई' या क्रियापदाचा कर्ता; ना—अव्यय.

(ब) 'नलगे' यामध्यें 'लगे' हें क्रियापद आहे. 'त्याला पुनः सांगणें नलगे,' यांत 'सांगणें' हा शब्द 'लगे' (लागे) याचा कर्ता होय (पहा, क० २४४, ३०७).

समाप्त.

# शुद्धिपत्र.

| पृष्ट | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १४ | पवर्ग | पवर्ग |
| ४ | टीप २ | ।या | त्या |
| ९ | ६ | पन | पन् |
| १५ | २२ | दर्शन | दर्शक |
| ४५ | १ | माहे | मोहन |
| ५५ | ७ | आदरार्थी | आदरार्थी |
| ५७ | खालून २ | गायकानॉ | गायकानीं |
| ५९ | १६ | त्याचें विषयी | त्याचे विषयीं |
| ६५ | २१ | नपुंसकलिंगी | नपुंसकलिंगी |
| ६८ | ४ | होतं. | होतें |
| ६९ | २० | गणार | येणार |
| ७० | १३ | होतें | होतो. |
| ७१ | १६ | नियम न | नियमन |
| ७३ | २१ | म्हणं | म्हणे |
| ८२ | ८ | म्हणे | म्हणे |
| ८६ | ८ | वर्तमानकाळ्या | वर्तमानकाळच्या |
| ८९ | ९ | र्धी | कधीं |
| ९४ | ४ | रुप | रुपें |
| ११५ | १ | मकर्मक | सकर्मक |
| ११७ | खालून ६ | 'ऊ' | 'ऊ' |
| १३३ | १५ | करेल्या | केलेल्या |
| १४४ | खालून १ | शन्नापागोटे | शेल्यापागोटे |
| १४७ | ८ | करावं | करावें |
| १५६ | १२ | अर्थाची | अर्थाचीं |
| १६४ | ११ | चित्तहारक | चित्तहारक |
| १६८ | खालून ३ | अकान्त | अकारान्त |
| १८५ | १४ | उद्देश्या— | उद्देश्या— |
| १८७ | ८ | उद्देश्य | उद्देश |

| | | | |
|---|---|---|---|
| १९२ | खालून ७ | दाने | दोन |
| २०० | १३ | विभक्तान | विभक्तींत |
| २१० | खालून ५ | औणावें | ओडावें |
| २१६ | १ | नयें | नये |
| २१७ | खालून ३ | कावळ्यांत काड | पक्ष्यांत काड |
| २१८ | ११ | विभक्तयथक | विभक्तयर्थक |
| २२८ | खालून ९ | अर्याच्या | अर्थाच्या |
| २३० | खालून २ | विधय | विधेय |
| २३४ | १६ | उदेश्याचे | उद्देश्याचे |
| २३९ | खालून ५ | आकान्त | आकारान्त |
| २४३ | १३ | विषेषणाचें | विशेषणाचें |
| २५७ | खालून १ | भावामयोग | भावीमयोग |
| २६४ | १२ | मागिलें | सांगितलें |
| २६५ | खालून ६ | बोलणारच | बालणाराचा |
| २९३ | २ | पष्ट | स्पष्ट |
| २९७ | १० | आत | आतां |
| ३०२ | खालून ५ | पुष्कदा | पुष्कळदा |
| ३०६ | ३ | एकवचन | अनेकवचन |
| ३०७ | ४ | पु | न. |
| ३०९ | ४ | मथमपुरुषाचें | तृतीयपुरुषाचें |
| ३०९ | ५ | दें. | हें |
| ३१२ | खालून६ | बोलना | बोलेना. |

☞ याशिवाय कित्येक अनुस्वाराच्या वगैरे किरकोळ चुका सहज समजण्यासारख्या असल्यामुळें दिल्या नाहींत. चुका शुद्ध करून मग पुस्तक वाचावें.